The

# Chronicle of the Bhonslas of Nagpu

BY

**Kashirao Rajeshwar Gupte**

*Edited by*

**Y. M. KALE**, B. A., LL. B.
**BULDANA** ( Berar )

*Published by*
The **C. P. Research Society**, Nagpur.

SECOND EDITION

1936

**Price Rs.**

# प्रकाशकाचे चार शब्द

मध्यप्रांत संशोधन मंडळाचें पहिलें प्रकाशन म्हणून **नागपूरकर भोंसल्यांची बखर** हें पुस्तक वाचकांच्या हातीं देतांना आम्हांस अतिशय आनंद होत आहे. ही बखर फार दिवसांपासून दुर्मिळ झाली होती. व ही ह्या प्रांताच्या इतिहासाचे अभ्यासास अत्यंत महत्त्वाची अशी असल्यामुळें हिची सुधारलेली व संशोधलेली दुसरी आवृत्ति काढावयाचें मंडळानें ठरविलें व सुदैवानें आमचे विनंतीस मान देऊन श्री. यादव माधव काळे, वऱ्हाड व नागपूर प्रांताचे तिहासकार, ह्यांनीं ह्या आवृत्तीचें उत्कृष्ट संपादन करून दिलें. पहिल्या आवृतींत ज्या चुका, अपुरी माहिती वगैरे राहिली होती ती नवीन साधनांच्या आधारें ह्या आवृत्तींत पूर्ण केली आहे. व शेवटीं सूचिपत्र व नकाशाही जोडला आहे.

प्रस्तुत आवृत्तीचे विद्वान् व चिकित्सक संपादक श्री. काळे यांनीं संपादन केल्याबद्दल, व प्रथमावृत्तीचे संपादक कै. वामन दाजी ओक यांचे चिरंजीव श्री. गोपाळराव व प्रकाशक कै. रा. ब. साने यांचे वारस श्री. विश्वनाथ सदाशिव साने, कल्याण, यांनीं ही आवृत्ति काढण्यास परवानगी दिली याबद्दल मंडळ त्यांचे फार आभारी आहे. तसेंच न्या.मू. भवानीशंकर नियोगी व श्रीमंत बाबासाहेब घटाटे हे मंडळाचे अनुक्रमें आश्रयदाते व यावज्जीव सभासद झाल्यामुळेंच हें प्रकाशनाचें कार्य सुलभ झालें, यास्तव मंडळ त्यांचेंही फार ऋणी आहे. शेवटीं महाराष्ट्र मुद्रण शाळेचे व्यवस्थापक श्री. शंकरराव दाते ह्यांनीं अत्यंत अल्पावधींत छपाईचें काम सुबक करून दिलें असल्यामुळें मंडळ त्यांचेंही आभारी आहे. ही नवीन आवृत्ति अभ्यासकांस उपयुक्त होईल अशी आशा आहे.

मध्यप्रांत संशोधन मंडळाची माहिती व विनंतिपत्रक शेवटीं जोडलें आहे, तें वाचकांनीं वाचून त्याकडे अवश्य लक्ष द्यावें अशी नम्र विनंति आहे

महाल, नागपूर
ता. १४-१-३७

आपले नम्र
श्री. ल. पांढरीपांडे कार्यवाह
पां. कृ. सावळापूरकर } सह
शां. गो. चटूटे } कार्यवाह
मध्यप्रांत संशोधन मंडळातर्फे

# प्रस्तावना

नागपुरकर भोंसल्यांची बखर इ. स. १८८५ मध्यें कै० वामन दाजी ओक यांनी तयार करून कै० काशीनाथ नारायण साने यांनी छापली. त्यापूर्वी काव्येतिहाससंग्रहांत नागपुरकर भोंसल्यांचीं कागदपत्रें रा. ओक यांनीं मिळवून छापली होतीं. हे कागदपत्र नागपुरच्या इतिहासास अत्यंत महत्त्वाचे आहेत. "ऐतिहासिक पत्रव्यवहार*" या पुस्तकांत हीं पत्रें पुनर्मुद्रित केली आहेत.

कै० वामन दाजी ओक हे विद्वान् गृहस्थ मध्यप्रांतांतील शाळाखात्यांत नोकरीवर होते. ते नागपुरास सिटी स्कुलावर हेडमास्तर होते. काव्येतिहास संग्रहांत अनेक मराठी काव्यें व इतिहासविषयक साधनें त्यांनीं प्रसिद्ध केलीं. त्यांचें अल्प चरित्र या आवृत्तीचे आरंभीं दिलेलें आहे.

रा. ब. साने यांचें चरित्र चित्रमयजगत् जुलै १९२३ व मोनेकृत "मराठी भाषेचे व्याकरणकार" पृष्ठ २३५ यांत पहा. काव्येतिहास संग्रहाबद्दल माहिती "पत्रें यादी "‡ चित्रशाळा प्रत प्रस्तावना पान १ यांत पहा.

नागपुरकर भोंसल्यांची बखर ही नागपुरच्या इतिहासास अत्यंत आवश्यक आहे. परंतु ती आतां दुर्मिळ झाल्यामुळें तिचें पुनर्मुद्रण करणें अवश्य झालें आहे. नागपुरच्या मध्यप्रांत संशोधन मंडळानें तें काम आंगावर घेऊन आम्हांस ही नवीन आवृत्ति तयार करून देण्यास सांगितलें त्याप्रमाणें यथामति ही आवृत्ति तयार करून दिली आहे.

प्रथमावृत्तीची योग्य कल्पना यावी म्हणून ती प्रस्तावनेसहित पुनः छापली आहे. मूळ बखरीतील मोडी वाचनाच्या व इतर चुका दुरुस्त केल्या आहेत. शब्दांचे अर्थ व टीपा फारच विस्तृत होत्या त्या कमी करून शेवटीं लहानसा शब्दकोश दिला आहे. नवीन साधनांच्या आधारानें जास्त टीपा घातल्या आहेत.

---

* सरदेसाई, कुलकर्णी व काळे, समर्थ भारत छा. पुणें १९३

‡ सरदेसाई, काळे व वाकसकर १९३०.

ही मूळ बखर शालिवाहन शके १७४४ ( इ. स. १८२२ ) मध्यें लेखकानें रेसिडेंट मि० जेन्किन्स याचे सांगण्यावरून लिहिली. असाच उपक्रम इतर रेसिडेंटांनींही जागोजाग केलेला आढळतो. जुन्या बखरींतील बरेचसे दोष या बखरींतही आहेत. अंधश्रद्धा, ऐकीव गप्पा, दंतकथा, आवडनिवड हीं कोठें कोठें दिसून येतात. तरीसुद्धां ही बखर अस्सल कागदपत्रांच्या आधारानें बव्हंशीं लिहिलेली आहे व एकंदरींत विश्वसनीय आहे असें प्रत्ययास येतें. लेखकाचे व्यक्तिगत संबंध* व तत्कालीन सर्वसाधारण खालावलेली मनोवृत्ति ही बखर वाचतांना लक्षांत ठेवणें जरूर आहे.

## बखरींतील इतिहास

प्रस्तुत बखरकार पूर्वी प्रसिद्ध असलेल्या सातारच्या राजघराण्याच्या बखरींचा आधार घेऊन आरंभ करतो. चितोडच्या पद्मिनीची गोष्ट, भोंसल्यांचें दक्षिणेंत आगमन, मालोजी, शहाजी व शिवाजीचा उदय वगैरे गोष्टी मागील बखरींप्रमाणें जशाच्या तशा देऊन नागपुरकर भोंसल्यांचे शाखेचा इतिहास देण्यास त्यानें सुरुवात केली आहे. यांपैकीं पुष्कळ गोष्टी इतिहास या स्वरूपाच्या नसून दंतकथावजा आहेत. भोंसले हे उदेपूरचे शिसोदे रजपूत व मुसलमानांचे स्वाऱ्यांमुळें परागंदा होऊन ते दक्षिणेंत आले व निरनिराळ्या जागीं स्थायिक झाले, वतनें मिळविलीं व शेतीभाती करूं लागले. परंतु हत्यारबंद राहून त्यांनी आपला क्षात्रधर्म जागृत ठेविला.

एका शाखेनें जशी वेरूळची पाटीलकी मिळविली तशी दुसऱ्या एका भोंसल्यांच्या शाखेनें पुणें प्रांतांतील पाटस तर्फेतील हिंगणी या ओसाड गांवांत वसाहत करवून तेथील पाटिलकी मिळविली. पहिल्या शाखेंत मालोजी, शहाजी, शिवाजीसारखे पुरुष निर्माण होऊन त्यांनीं राज्य स्थापिलें. त्यांचेच आश्रयानें व त्यांचेच पावलावर पाऊल टाकून हिंगणीकरांनींही, नागपुरास राज्य स्थापिलें.

मराठ्यांची रजपूतकुलोत्पत्ति व भोंसले, घोरपडे यांचा उदेपुरच्या राजघराण्यांशी संबंध वगैरे गोष्टी जरी आज सर्वत्र गृहीत धरल्या जातात तरी तो संशोधनाचा अद्याप एक महत्त्वाचा विषय आहे. त्याचें विवेचन

---

* लेखकाचा आजा महिपतराव विनायक याजविषयींचे उल्लेख पहा.

या स्थळीं करणें योग्य होणार नाहीं. एवढें मात्र खरें कीं, शिवाजीच्या पूर्वीही ही गोष्ट थोडया फार अंशानें गृहीत धरली जात होती. निदान क्षत्रिय मराठे तरी आपणांस रजपूत म्हणवून घेण्यांत भूषण मानीत.

बखरीच्या लेखकाची माहिती मुधोजी व रूपाजी या दोघां बंधूंपासून सुरू होते. त्यांचे पूर्वज पुणें प्रांतांतील हिंगणी या गांवची पाटीलकी संपादन करून शेती करूं लागले. गांव वैराण होता तो त्यांनीं वसविला. मुधोजी व रूपाजी यांचे बापाचें नांव बिंबाजी व आजाचें नांव परसोजी हें बखरीच्या संपादकांनी वंशावळींत दिलें आहे तें बरोबर दिसतें. मुधोजी व रूपाजी शिवाजीचे वेळीं प्रसिद्धीस आले. रूपाजीस संतति नसून मुधोजीस तीन पुत्र. बापूजी, परसोजी, व साबाजी. बापूजी हा घरी वृत्तीवर राहून साबाजी व परसोजी रूपाजीबरोबर शिवाजीच्या सैन्यांत राहून पुढें आले. साबाजीनें तर "पुरातन व एकनिष्ठ सेवक" म्हणून एक सनदही मिळविली. (इ. स. १६७४.) परसोजीनेंही राजारामाचे कारकीर्दीत "सेनासाहेब सुभा" हें पद मिळवून वऱ्हाड व गोंडवण प्रांतांतील चौथाई, सरदेशमुखी वगैरे वसूल करण्याची सनद मिळविली. शाहूच्या कारकीर्दीत परसोजी त्यास प्रथम अनुकूल झाल्यामुळें परसोजीचें वजन फार वाढले व त्यानें वऱ्हाडांत ठाणें दिलें. परसोजीच्या मृत्यूनंतर त्याचा पुत्र कान्होजी यास त्याची सनद मिळाली व वऱ्हाडांत हल्लींच्या यवतमाळ जवळ भाम येथें त्यानें कायमचें ठाणें दिलें.

बखरीच्या अखेरीस त्या वेळच्या संपादकांनीं जी वंशावळ दिली आहे ती आरंभी थोडीशी चुकीची आहे व बखरीतील मजकुराशी ती विसंगत आहे. रूपाजीचे पुत्र संताजी व राणोजी ऊर्फ सवाई संताजी असें जें लिहिलें आहे तें चुकीचें असून रूपाजीस पुत्र नव्हता अशी वस्तुस्थिति आहे. बापूजीस पुत्र बिंबाजी व वर उल्लेखिलेले संताजी व राणोजी ऊर्फ सवाई संताजी असे तिघे झाले. बिंबाजीचा पुत्र प्रसिद्ध पहिला रघूजी म्हणजे नागपुरच्या राज्याचा संस्थापक. संताजी हा बाळाजी विश्वनाथाच्या बरोबर दिल्लीस गेला असतां तेथें गर्दीत मारला गेला. व त्याचा भाऊ राणोजी यास बादशहानें सवाई संताजी म्हणून किताब देऊन त्याचा सन्मान केला. उमरावतीकर भोंसले म्हणून नागपुरकर भोंसल्यांच्या भाऊबंदांची जी एक शाखा आहे तिचा मूळ पुरुष हा राणोजी. वऱ्हाडांतील उमरावती हें गांव राणोजीस

मोकासा म्हणून दिलें होतें व त्याचे वंशांत तें बरेच दिवस कायम होतें म्हणून त्यांस उमरावतीकर म्हणत. वसईच्या मोहिमेंत यानें मोठा पराक्रम केला. त्याचा जो ज्ञात इतिहास आहे त्यापेक्षां त्याची कामगिरी बरीच जास्त असावी.

साबाजीस पुत्र नसल्यामुळें त्याची बायको रामाऊ ही रघूजीस मुलाप्रमाणें मानी व तो तिच्याजवळच साबाजीच्या वतनाच्या गांवी कुमठें येथें ( जि. सातारा ) राहात होता व नंतर वऱ्हाडांत कान्होजीजवळ राहिला.

कान्होजीशीं रघूजीचा बिघाड झाल्यामुळें तो त्याचे जवळून निघून व दुसरे कांही ठिकाणी राहून शेवटीं शाहूजवळ आला. कान्होजीवर शाहूची इतराजी झाल्यामुळें त्याचें पारिपत्य करण्याचें काम शाहूनें रघूजीसच दिलें व तें त्यानें चांगलें बजावलें. कान्होजीचा पराभव करून त्यास कैद करून रघूजीनें साताऱ्यास पाठविलें. त्यामुळें शाहूनें कान्होजीचें पद रघूजीस दिलें व त्यानें पुढें नागपूरची गादी स्थापन केली. कान्होजीचा मुलगा रायाजी हा भाम येथें राहून रघूजीशीं भांडतच होता. पण रघूजीनें नागपुरास आपलें ठाणें दिलें व पराक्रमानें राज्य वाढविलें. त्यामुळें रायाजी व राणोजी हे मागें पडले.

रघूजी व त्याचे वंशज यांची हकीगत बखरींत वर्णन केली आहे. ती आपासाहेबाचें पलायन व त्याचे जागीं बाजीबा गुजर याची तिसरा रघूजी म्हणून स्थापना येथपर्यंत आली आहे. ( इ. स. १८१८ ) त्यापुढील हकीकत आम्हीं शेवटी दिली आहे.

तिसरा रघूजी याने इ. स. १८५३ चे अखेरपर्यंत राज्य केलें व तो ता. ११–१२–१८५३ रोजी मरण पावला. त्याने दत्तक घेतला नाहीं म्हणून राज्य खालसा झालें.

नागपुरकर भोसल्यांची हकीकत वर संक्षेपानें दिली आहे. ती विस्तारानें बखरींत वाचण्यास सांपडेल. इतर मराठी साधनें व शेवटच्या भागाविषयी इंग्रजी साधनें वाचलीं असतां हीच हकीकत जास्त विस्तारानें समजेल. ती येथें देणें अप्रस्तुत आहे. या विषयावर आतां विस्तृत साधनें अन्यत्र उपलब्ध झालीं आहेत.*

---

* प्रस्तुत लेखकाचा “ नागपुर प्रांताचा इतिहास ” पहा.

नागपुरकर भोंसल्यांच्या घराण्यांत पहिल्या रघूजीशिवाय कोणी शूर व धडाडीचा पुरुष झाला नाहीं ही दुःखाची गोष्ट होय. पहिल्या रघूजीनें जो राज्यविस्तार केला तोच अखेरपर्यंत कायम राहिला. उलट १८०३ इ० मध्यें तर त्याचा संकोच होऊन हें राज्य पहिल्या प्रतींतून दुसऱ्या प्रतींत गेलें. राजकारणाच्या दृष्टीनेंही नागपूरचे राजे व मुत्सद्दी हलक्या दर्जाचेच ठरले. नाना फडणविसाची दूरवरची दृष्टि नागपुरच्या देवाजीपंतांत अगर भवानी काळूंत दिसत नाही. श्रीधर बापू मुनशी म्हणजे एकाद्या जहा-गिरदाराचे मुनीम. मुधोजीसारख्या राजास तात्कालिक फायद्याकरितां इंग्रजांस मदत करून—पुणें दरबारच्या नव्हे तर—सर्व हिंदुस्थानच्या, लांबच्या राजकारणावर पाणी ओतण्यास दिक्कत वाटली नाहीं व त्याच्या एका विश्वासघातानें इंग्रज चिरस्थायी होऊन मराठ्यांचें साम्राज्य डळमळून पडलें असे म्हणण्यास हरकत नाहीं. क्रमानें नागपूरचें राज्यही इंग्रजांना मिळून भोंसल्यांचा दुःखकारक अंत झाला.

दुसरा रघूजी दुय्यम प्रतीचा राजा व मुत्सद्दी; पण त्याला नालायकही म्हणतां येणार नाहीं. इंग्रजांशी लढण्याचें अगर आपले राज्याचें रक्षण पेंढाऱ्यांसारख्या लुटारूंपासून करण्याइतकेंही शौर्य जरी त्याच्या आंगी नव्हतें तरी आपली कुवत ओळखून तो इंग्रजांच्या वाटेस गेला नाहीं व त्यांच्या विरुद्ध असलेले शिंदे होळकर यांचे कटांत पुनः शिरला नाही. तसेंच इंग्रजांनी त्याच्याशी तैनाती तह करण्याचा अनेकवार प्रयत्न केला असतांही त्यानें त्या सांपळ्यांत अडकण्याचें मोठ्या युक्तीने टाळलें व कसें तरी आपलें मिळमिळीत स्वातंत्र्य कायम टेविलें. आपला मुलगा राज्य चालविण्यास लायक नाही हें माहीत असतांही त्यानें आपासाहेबास राज्यकारभार देऊन व त्यास मार्गदर्शक नेमून राज्याचें कल्याण करण्याचें दूरदर्शित्व दाखविलें नाहीं. त्यामुळें तंट्याचें बीज कायम राहून त्यानें टाळलेला तैनाती तह रघूजी मरतांच आपासाहेबाच्या स्वार्थामुळें चुटकीसरसा होऊन सर्व लष्करी सत्ता इंग्रजांच्या ताब्यांत गेली व त्या दावाग्नीत स्वतः आपासाहेबच होरपळून गेला व नाग-पुरचें राज्य जाणें अगर राहणें ही इंग्रजांच्या लहरीची अगर खुषीची एक गोष्ट झाली व निमित्त मिळतांच ती साध्य झाली.

तिसऱ्या रघूजीचाही तोच प्रकार. राजा निपुत्रिक मरेल व पुढें राज्याचें काय होईल व कसकसें वागावें याबद्दलचे इंग्रजांचे बेत तिकडे परिपूर्ण होऊन बसले होते; पण इकडे राजा, राण्या व मुत्सद्दी हे अज्ञानांधकारांत लोळत पडले होते. पुढें काय व्यवस्था करावयाची हें कोणासच सुचलें नाहीं. निवळ निमित्त सांपडतांच इंग्रज राज्य गिळंकृत करतील ही गोष्ट कळण्यास मोठीशी अवघड नव्हती पण इतकें दूरदर्शित्व व तळमळ कोणामध्येंही नव्हती. जो तो आपल्या व्यक्तिगत स्वार्थात मग्न होता व त्यापलीकडे कोणासच विचारपूस सुचत नव्हती.

हा सर्व इतिहास दुःखद व उद्वेगजनक तर खराच पण या कटु सत्याकडे डोळेझांक करून चालणार नाही. हे धडे उपयोगी पडावेत एवढाच इतिहासाच्या अध्ययनाचा उद्देश असतो. निराळ्या स्वरूपांत पण इतिहासाची पुनरावृत्ति होतच असते. म्हणून मागील बरा अगर वाईट इतिहास हा पुढें मार्गदर्शकच होतो.

बुलडाणा ( वऱ्हाड )
ता. १-९-१९३६.

**या. मा. काळे**

# वाचकांस सूचना



१. फारच अपरिचित शब्दांचे अर्थ तळाशीं दिले आहेत. इतर शब्दांचे अर्थाकरितां शब्दकोश शेवटीं जोडला आहे.

२. टीपांची जबाबदारी ओळखणें जेथें जरूर आहे तेथें (प्र. आ.) व, (सं.) असें लिहिलें आहे. (प्र. आ.) म्हटलें आहे ती टीप प्रथम आवृत्तींतील जशीच्या तशीच घेतली आहे असें समजावें. (सं.) संपादक म्हणजे प्रस्तुत द्वितीय आवृत्तीचा संपादक समजावा. ह्या टीपा नवीन आहेत.

३. भाग, पदच्छेद, शीर्षकें ही मांडणी या आवृत्तींत नवीन केली आहे.

४. टीपांत "लेखांक" म्हणून नंबर दिले आहेत ते "नागपुरकर भोंसल्यांचे कागदपत्र" या पुस्तकांतील आहेत. हेंही पुस्तक दुर्मिळ आहे. ज्यांना हें उपलब्ध नसेल त्यांनीं "ऐतिहासिक पत्रव्यवहार" हा ग्रंथ पाहावा. त्यांत वरील लेखांक दिलेले आहेत.

५. प्रथमावृत्तींत बखरीत मोडी वाचनाच्या व इतर चुका बऱ्याच झालेल्या आहेत त्या प्रस्तुत संपादकानें दुरुस्त केल्या आहेत. परंतु प्रथमावृत्तींत काय होतें तें पडताळून पाहतां यावें म्हणून तसा तक्ता शेवटीं जोडला आहे.



# अर्पणपत्र

महाराष्ट्राच्या भाषेचा व इतिहासाचा

आस्थापूर्वक अभ्यास करूं इच्छिणाऱ्या सज्जनांस

हा ग्रंथ

परम प्रेमपूर्वक अर्पण करितों.

—ग्रंथप्रकाशक

कै. वामन दाजी ओक



जन्म इ. स. १८४५] [मृत्यु इ. स. १८९७

# कै. वामन दाजी ओक यांचें

# अल्प चरित्र*



वामनरावजींचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यांत चिपळूण तालुक्यांतील हेदवी नांवाच्या गांवीं इ. स. १८४५ मध्यें झाला. विद्याभ्यास रत्नागिरी हायस्कुलांत प्रसिद्ध संस्कृत पंडित डॉ० भांडारकर यांचे हाताखाली झाला. मॅट्रिक्युलेशनची परीक्षा इ. स. १८७० मध्यें उत्तीर्ण होऊन संस्कृतांतील प्रावीण्याबद्दल प्रख्यात जगन्नाथ शंकरशेटची स्कॉलर्शिप मिळाली. पुढील अभ्यास मुबईस एल्फिन्स्टन व विल्सन कॉलेजांत झाला. कॉलेजांतील अभ्यासक्रम मध्येंच सोडून ते मध्यप्रांतांत आले व नागपुरच्या सिटी स्कुलांत प्रथम असिस्टन्ट मास्तर व नंतर हेडमास्तर म्हणून नोकरी केली.

त्यानंतर सरकारी नोकरींत नागपुरचे नॉर्मल स्कूलचे सुपरिंटेंडेंट व नंतर संबलपूर व रायपुरच्या हायस्कुलांचे हेडमास्तर या जागांवर त्यांनीं काम केलें. ते इ. स. १८९७ मध्यें नागपुरास मरण पावले. त्यांचे चिरंजीव गोपाळराव हे नरसिंगपूरचे हायस्कुलांत शिक्षक असून पुतणे दामोदर केशव ओक हे सुपरिंटेंडेंट नॉर्मल स्कूल नागपूर या जागेवर असतांना सेवानिवृत्त झाले आहेत.

नोकरी करीत असतांना कै० वामनराव यांनीं "काव्यसंग्रहाचें" संपादन करून मराठी काव्यप्रकाशनाचा जो प्रचंड उद्योग केला तो चिरस्मरणीय आहे. त्यांच्या या उद्योगानेंच त्या काळच्या पिढीस मराठी काव्याची गोडी लागली. मराठी काव्याशिवाय "नागपुरकर भोंसल्यांची बखर" व "नागपुरकर भोंसल्यांचे कागदपत्र" हे दोन इतिहासविषयक ग्रंथही त्यांनीं "काव्येतिहाससंग्रहांतून" प्रसिद्ध केले. त्यांपैकींच प्रस्तुत बखर ही होय. नागपुरास वास्तव्य असल्यामुळें वामनरावजींनीं अनेक घराण्यांत धूळ खात पडलेले कागद जमवून त्यावर टीपा लिहून ते छापले. हे कागद

* महाभारत, आदिपर्व यांतील दा. के. ओक यांनीं लिहिलेल्या चरित्रावरून.

नागपुरच्या इतिहासास आधारभूत असून अत्यंत महत्त्वाचे आहेत. ते कागद व प्रस्तुत बखर ही वामनरावजींनीं त्या वेळेस छापली नसती तर ती आतां नष्ट झाली असती. त्या वेळेसही खुद्द या प्रांतांतील अनेक सुशिक्षित मंडळी व ऐतिहासिक घराण्यांतील अनेक पुरुष हयात असतांना व त्यांचें हें प्रथम कर्तव्य असतांना परप्रांतस्थ वामनरावजीनी निरपेक्ष बुद्धीनें वरील किचकट व श्रमाचें काम करावें व ज्या पूर्वजांच्या पराक्रमावर आपण पोसले जात आहों व चैन करीत आहों त्यांच्या इतिहासाविषयीं त्यांच्या वंशजांनी बेफिकीर असावें ह्या परस्परविरोधी मनोवृत्ति पाहिल्या म्हणजे कै० वि. का. राजवाडे यांच्या शिवराळ टीकेची आठवण झाल्याशिवाय राहात नाही.

ही बखर व कागदपत्रें यांवर टीपा देतांना स्थानिक माहितीची व इतिहासविषयक पूर्वीं प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांची बारीक माहिती असणें अवश्य होतें. ती वामनरावजींनी मोठ्या काळजीनें जमविली आहे हें त्यांच्या टीपांवरून दिसून येतें. बाहेरचा मनुष्य हें काम करूं शकला नसता.

वामनरावजींनी काव्यमालेंत अनेक संस्कृत काव्यें प्रकाशित केलीं आहेत. तसेंच अनेक मासिकांतून त्यांचे मराठी लेख प्रसिद्ध झाले आहेत. लॉर्ड बेकनचें चरित्र, वासवदत्ताकथासार, कादंबरीकथासार, किरकोळ स्वकृत मराठी काव्यें वगैरे त्यांचे ग्रंथही प्रसिद्ध झाले आहेत.

---

# अनुक्रमणिका

श्री

# नागपूरकर भोंसल्यांची बखर

## उपोद्घात

१. नागपूरकर भोंसल्यांच्या संबंधाचे कागदपत्र छापण्यास आरंभ केला तेव्हांपासून आजपर्यंत सुमारें लहान मोठे चाळीस लेख छापून बाहेर पडले. या लेखांवरून भोंसलेशाहींतील अनेक गोष्टींची माहिती वाचकांस थोडीबहुत झाली असेलच. नागपूरकर भोंसल्यांनीं कोणते पराक्रम केले, त्यांचा उदय कसा झाला, त्यांची मूळपीठिका काय, त्यांनीं गोंडवण, बंगाला वगैरे प्रांत कसे काबीज केले, मूळ मराठी राज्याशीं व इतर संस्थानांशीं त्यांचे संबंध कसे होते, इंग्रज लोकांनी व फरेंच लोकांनीं त्यांच्याशीं कोणत्या प्रकारचें वर्तन ठेविलें, व त्यांच्या राज्यास उत्तरोत्तर कोणत्या कारणांनी उतरती कळा लागली ह्या गोष्टीं-बद्दल फारशी माहिती आपल्याकडील लोकांस नाहींच म्हटली तरी चालेल. तर ही माहिती प्रस्तुत बखरीच्या द्वारें व लेखांच्या द्वारें सादर करण्याचा विचार केला आहे.

२. नागपूरकर भोंसल्यांचे लेख प्रसिद्ध करण्यास .आरंभ केला त्या समयीं दोन बखरी मिळाल्या होत्या. त्यानंतर आणखीही बखरी हातीं आल्या. त्यांच्याविषयीं दोन शब्द येथें लिहिणें इष्ट आहे. आम्हांपाशी एकंदर सहा बखरी आहेत. ह्या अस्सल प्रतीवरून केलेल्या नकला आहेत. अस्सल बखरी आम्हीं स्वत: पाहिल्या असून त्यांच्या नकला मुळांशीं ताडून पाहण्याचें काम जितकें होईल तितकें चोख व निर्दोष करविलें आहे. अस्सल बखरींचें अक्षर सुवाच्य नसल्यामुळें नक्कल करतांना कांही ठिकाणीं जशींच्या तशींच अक्षरें लिहिण्याचा यत्न केला आहे

(अ) **पहिली बखर**—गुजाबादादासाहेब गुजर व नारायण गोपाळ पंडितजी या दोघांस मेहेरबान रेसिडेंट जेंकिन्स साहेब बहादूर यांनीं

विनंति केल्यावरून गंगाधरराव माधव चिटणीस यांनी स्वतः लिहिली. ही सन १२३० फसलीत लिहिलेली असून हिचे मूळ बंद ४९ आहेत. या बखरीमध्यें भोंसल्यांची मूळपीठिका सांगून पुढें जानोजीच्या मरणापर्यंत हकीकत दिलेली आहे.

( आ ) **दुसरी बखर**—या बखरीचे मूळ बंद १२० आहेत, त्यांपैकी ९३, ९४, ९५, ९६ व ९८ असे पांच बंद गहाळ जालेले आहेत. एवढा भाग त्रुटित झाला आहे तरी बखर उपयोगी पडण्याजोगी आहे. ही बखर खंडो भगवंत परभु या नांवाच्या गृहस्थानें लिहिलेली आहे. खंडो भगवंत यांचे वडील भगवंतराव सुदर हे भोसल्यांची व निजामाची "साठ चाळिशी" बद्दल कांही तकरार पडली होती तेव्हां निजामाकडे तह करण्याकरितां गेले होते. खंडो भगवंत हे स्वतः गंगाधरराव माधव चिटणीस ह्यांचे हाताखालीं नायब चिटणविशीचे कामावर होते. यांचे पूर्वज शंकराजी रखमाजी परभु हे थोरल्या रघोजीचे दिवाण व पोतनीस होते. शंकराजीचे पुतणे सुदर बहिराजी हे जामदारखान्यांत व शिलेखान्यांत मुख्य कामदार होते. सुंदरराव यांचे भगवंतराव हे पुत्रचतुष्टयापैकीं द्वितीय पुत्र होत. खंडो भगवंतकृत बखरींत जानोजीच्या मरणापासून तों दुसऱ्या रघोजीच्या मरणापर्यंत समग्र वृत्तांत आहे.

( इ ) **तिसरी बखर**—हिचे १९ बंद आहेत. परंतु पहिले दोन बंद गाहाळ जालेले आहेत. बाकी सर्व पत्रें शाबूद आहेत. ही केव्हां, लिहिलेली हें हिचा आद्य भाग उपलब्ध नसल्यामुळें समजत नाहीं. हींत आरंभापासून तों जानोजीच्या मरणापर्यंत संक्षिप्त हकीकत दिलेली आहे. हींतील उतारे टिपांच्या रूपानें कोठें कोठें देतां येतील. ही कोणी लिहिली हेंही समजण्यास मार्ग नाहीं.

( ई ) **चवथी बखर**—ही शके १७३८ धातानाम संवत्सरी मे० जेंकिन्स साहेबांसाठीं व स्वमित्र मंडळासाठी यजुर्वेदाधिकारी विनायक आनन्दराव औरंगाबादकर यांनीं लिहिली. ही मोठ्या बंदावर लिहिलेली असून ते २०८ आहेत. हिजमध्यें तहनामे, यादी, सवाल जबाब, हिशेब, पत्रव्यवहार, सनदा इत्यादि अनेक उपयुक्त लेखांचा थोडासा समावेश केला आहे. हीच बखर छापण्यास आरंभ केला असता, परंतु हिच्या लेखनपद्धतींत

फार गोंधळ झालेला आहे. या बखरीत पेशव्यांच्या बखरीचाही कांही अंश मधून मधून आलेला दिसतो, हिचाही टिपांतच पुष्कळ उपयोग होईल. या बखरीत यशवंतराव रामचंद्र, अमृतराव पांडूरंग, साबाजी बारीदार, बळवंतराव सालपेकर यांच्या लेखांचाही समावेश केला आहे. विनायकराव औरंगाबादकर यांचे वंशज नागपुरास आहेत.

आनंदराव हा जेंकिन्स याचे पदरी होता व आपासाहेब भोंसल्यांचे वेळी मध्यस्थ होता. ( सं. )

( उ ) **पांचवी बखर**—ही पूर्वोक्त विनायकराव औरंगाबादकर यांनी लिहिलेली आहे. ही फार लहान आहे. हिजमध्यें चवथ्या बखरीसारखा गोंधळाचा प्रकार नाहीं; ही बखर प्रसंगविशेषीं जो मजकूर साहाव्या बखरीत दुर्बोध आहे तो सुबोध करण्यास साधनीभूत होईल. ही शके १७३८ मध्येंच लिहिलेली आहे व हीत सन १८०९ पर्यंत हकीकत दिली आहे.

( ऊ ) **सहावी बखर**—ही बळवंतराव महिपत गुप्ते यांचे पुतणे काशीराव राजेश्वर गुप्ते यांनीं लिहिली. ही प्रतीवरून तयार केलेली प्रत आहे. ही शके १७४४ त मे० जेंकिन्स साहेबांसाठीं लिहिली. हीच छापण्यास आरंभ केला आहे. हीत आरंभापासून दुसऱ्या रघोजीच्या मरणापर्यंत हकीकत असून परसोजी ऊर्फ बाळासाहेब व मुधोजी ऊर्फ आपासाहेब यांच्या कारकीर्दीचें वर्णन आहे.

---

श्री

# नागपूरकर भोंसल्यांची बखर

## भाग १

## मूळपीठिका

**प्रस्तावना**:—श्रीनृपशालिवाहन शके १७४४ फसली सन १२३२ चित्रभानुनाम संवत्सरे या सालीं मिस्तर रिचर्ड जेंकिन्स[1] साहेब आलीशान बाहादूर यांणीं मिस्तर वल्किंसन साहेब बाहादूर यांस सांगितलें कीं, श्रीमंत राजेश्री सेनासाहेब सुभा यांचा सिलसिला व हे पद प्राप्तीचें कारण काय याचा तपसील, सेनासाहेब यांचे दौलतींत कोण कसे वागले, कोणते वेळेस कोणता मुलूख प्राप्त झाला, याचा बयाण, जे कोणी वाकबगार असतील त्यांजला, विचारून लिहावा, याजवरून त्यांणीं विनंती लिहिली ऐसीजे. आमच्या चुलत्या पासोन सिलसिला पेशजी श्रीमंत सेनासाहेबसुभा यांणीं तयार केला होता तो सिलसिला तयार करून साहेबांचे स्वाधीन केला. त्यांपैकीं कागदपत्र गाहाळ झाले व जुन्या सनदाच्या नकला पाहिल्या व वडिलांची माहिती वागणूक अव्वल पासोन त्यांच्या मुखें ऐकिल्या होत्या,

---

१. रिचर्ड जेकिन्स—हे नागपुरास रेसिडेंटच्या कामावर होते. यांचा भोंसले घराण्याशीं संबंध कोणत्या प्रकारचा होता ही गोष्ट ३६ वा लेख ( नागपुरकर भोंसल्यांच्या संबंधाचे कागदपत्र ) पाहिला असतां समजेल. या साहेबानें राजघराण्याची सर्व माहिती मे० ग्रांट डफ साहेबांकरितां मिळविली होती. विल्किन्सन हा रेसिडेंटाच्या हाताखालचा अधिकारी होता. तो पुढें रेसिडेंटही झाला.

त्याजवरून आमचे चुलते बळवंतराव[१] महिपत गुप्ते यांचेही तोंडानें ऐकिलें; व कांहीं कांहीं यथामति जें सुचलें व वागणुकींत पाहिल्यावरून विनंति लिहिण्यांत आली असे.

**भोंसल्यांचें राजपुतान्यांतून आगमनः**—श्रीशालिवाहन शकांत यवनीपातशाही झाली. त्यांत अकबर पातशाहा झाले. यांजला समजलें कीं, उदेपूरवाले राणाजी यांचे सासरे पन्हाळ रजपूत यांचे येथें चितोडगडास पद्मिण[२] उत्पन्न जाहली. याजवरून हिंदु लोकांवर पेशजी पासोन कोशिस करून होते. तसियांत पद्मिणीची बातमी येतांच चितोडगडावर अकबरशहा[3] यांणीं स्वारी करून लढाई केली. त्या समयीं रजपूत लोकांनीं पादशहाची फौज भारी व जुलमाना होऊं लागला. याजवरून रजपूत लोक वगैरे हिंदू यांणी शीक लोक आणि तमाम राजेरजवाडे हिंदू एकत्र होऊन अकबराशी लढाई केली. यवनाचा जोर भारी पाहून उदेपूरवाले राणाजी आदिकरून परागंदा जाहले. तथापि फौजबंद सरदार यांजला जेथें जशी जागा मिळाली तेथें त्यांणी एकमेकांचा आश्रय करून जागोजागीं थाऱ्यास राहिले. त्या हंगामांत[४] भोंसल्यांचें घर व अवांतर कोणी कोणी निघाले व दक्षिणेंत आले. तेव्हां उदरनिर्वाह तो झाला पाहिजे याजकरितां शेत करून रहावें. यावरूनच मौजे हिंगणी ( पाटस प्रांत ) हा गांववैराणींत होता. सबब त्या परगण्याचे हाकमाकडे जाऊन मौजे मजकूरची वसाहत

१. बळवंतराव गुप्ते यांनी गंगाधरराव माधव चिटणीस यांच्या सांगीवरून नागपूरकर भोंसल्यांची जी बखर लिहिली, ती प्रस्तुत बखरीच्या कर्त्यानें म्हणजे काशीरावानें पाहिली असावी.

२. पद्मिनी ही चितोडचा राणा भीमसिंग याची स्त्री. इच्या सौंदर्याबद्दल सर्व राजपुतान्यांत मोठी ख्याति होती. तिच्या अभिलाषानें अल्लाउद्दीन खिलजी यानें चितोडावर दोन स्वाऱ्या केल्या. शेवटच्या स्वारींत सर्व रजपूत स्त्रियांनीं पद्मिनीसह जोहार केला व पुरुष हल्ला करून लढून मेले. नंतर पुढें रजपुतांनीं चितोड पुनः जिंकून घेतला. ही गोष्ट अकबराच्या वेळची नसून अल्लाउद्दीन खिलजी याचे वेळची आहे. इ. स. १३००. —टॉड, व्हॉ. १, भा. ६ पा. २१७ पहा. **(संपादक)**

३. अल्लाउद्दीन खिलजी.

४. हंगामा, हागामा—धामधूम, गर्दी.

कबूल करून पाटिलकी वतनी मुधोजी[१] भोंसले ( यांनीं ) व रूपाजी[२] भोंसल्यांचे पूर्वजांनीं कबूल केली. तेथें उदीम करून होते.

**शहाजीचें लग्नः**—इतक्यांत मालोजी[३] व विठोजी भोंसले यांजपैकीं मालोजी भोंसले यांजला वरप्रसाद झाला कीं, "तुजला पुत्र होईल तो विजयी होईल. त्याचे पोटीं शककर्ता शिवाचा अवतार, उत्पन्न होऊन लौकिक विशेषोत्कारें वाढेल, त्याचे हस्तें तुमचे शत्रूचें पारिपत्य घडेल." याजप्रमाणें ( वरप्रसाद ) होऊन दैववान शाहाजी[४] राजे जाहले. यांचे लग्नप्रकरणावरून मालोजी भोंसले, व लुखजी[५] जाधवराव यांत कलह उभा राहून निजाम[६] पातशहा दौलताबादेचा यांजकडे शहाजी राजे गेले. याजवरून पातशहांनीं जाधवराव यांजला पत्र पाठवून आणिलें आणि सोयरिकीचा मजकूर करावा म्हणून सांगितलें. त्यांनीं उत्तर केलें कीं, शरीरसंबंध ठरला नाहीं. याजवरून पातशहांनी म्हटलें कीं, जातीपेक्षां कोणी मोठा नाही तेव्हां वाद कोणता ? तेव्हां याणी उत्तर केलें की, आमचे बराबरीचे दौलतदार नाहींत. याजवरून पातशहा कृपावंत होऊन, जहागीर

---

१. हे नागपूरकर भोंसल्यांचे मूळ पुरुष.

२. रूपाजी व परसोजी भोंसले हे पागांचे सरदार असून शिवाजी-पाशीं होते. कृष्णाजी अनंत विरचित शिवछत्रपतींचें चरित्र पृ. ८० पाहा.

३–४. मालोजी, विठोजी व शहाजी यांचे जन्म व मृत्यु यांच्या कालाविषयीं अलीकडे मतभेद झाला आहे शिवचरित्रप्रदीप पहा. (**सम्पादक**)

३. मालोजी व विठोजी हे सखे भाऊ. मालोजीचा जन्म शके १४७२ व विठोजीचा जन्म १४७५ त झाला. ( प्र. आ. )

४. शाहाजी राजे यांचा जन्म शके १५१६ मध्यें जयनाम संवत्सरीं झाला. ( प्र. आ. )

५. लुखजी जाधवराव शिंदखेडकर हा निजामशाही मनसबदार होता. हा पंचवीस हजार स्वारांचा सरदार असून वऱ्हाडांतील शिंदखेड येथील देशमुख होता.

६. निजाम पातशाहा—अहमदनगरचा पातशाहा. ह्या राज्याची समाप्ति सन १६३७ मध्यें झाली. निजामशाही दरबारचा मुख्य सरदार शहाजी भोंसले हा शहाजहानास शरण आला, तेव्हां त्यानें अहमदनगरच्या सिंहासनावर बसविलेल्या बाळराजास मोंगलांनी कैद करून ग्वाल्हेरच्या किल्ल्यावर ठेविलें.

शहाजी राजे यांस देऊन, पुत्र म्हणोन सोयरिकीचा निश्चय लग्नसमारंभ[१] करविले. व बारा हजार मनुष्य बाहदारींत दाखल करून कृपावंत होऊन, कुल पुणें प्रांत, जुन्नर व चाकणचा किल्ला, तहद सिरवळ, वाई, सुपें, इंदापूर वगैरे चाळीस लाख होनाचा मुलूख सरंजाम जाहला. सनदा करून दिल्हया व पातशाहांनीं आपुले ( म्हणविले. ) या उपर कांहींएक दिवसांनीं निजाम-शाहा पातशा शांत झाले.

**शहाजीचा उदयः**—पातशाहाजादा[२] मूल लहान, दौलतीचा बयदा, ( असें ) पातशाहाचे स्त्रीनें पाहून शहाजी राजे यांजला आज्ञा केली की, " पातशाजादे तुमचे बंधु लहान आहेत. तुम्ही मुलास तक्तावर बसवून समीप आपण बसत जावें, आणि दौलतीचा राज्यकारभार चालवावा.[३]" अशी आज्ञा होऊन कांहीएक दिवस चालत असतां, लुखजी जाधवराव यांजला वैषम्य वाटून, दिल्लींतून फौज यांचे पारपत्यास बोलाविली. तिकडून दक्षिणेंत सहा[४] हजारनिशी मीरजुमला नामें सरदार येऊन शाहाजी राजे यांस उपद्रव केला. याजवरून राजे मशारनिल्हे यांनी विजापूरचे पातशाहा सुलतान शिकंदर यांजकडे संधान[५] करून फौजेसुद्धां जाऊन राहिले. तेथील पातशाहांनीं शाहाजीचें चातुर्य पाहून जहागीर दिली आणि करनाटक[६] प्रांतीं बंदोबस्तास पाठविलें.

**शिवाजीचा जन्मः**—तेसमयीं जिजाई[७] आऊ इजला सहा

---

१. हा लग्नसमारंभ दौलताबादेस शके १५२५ मध्यें झाला. (प्र. आ.)

२. पादशहास आठ वर्षांचा व सहा वर्षांचा असे दोन मुलगे होते.

३. ही गोष्ट १५४१ मध्यें घडली. ( प्र. आ. )

४. पंचवीस हजार. ( प्र. आ. )

५. शहाजी राजे यानीं बाळकृष्णपंत हनुमंते यांच्या मार्फत विजा-पूरकरांचा दिवाण मुरारपंत जगदेव याजपाशी संधान लाविलें. शके १५४८ त शहाजी राजे विजापूरकरांकडे आले. निजामशाहीकरितां म्हणजे अहमदनगरच्या पादशाहीसाठीं शहाजी पुष्कळ लढला व निरुपाय होऊन विजापुरकरांच्या चाकरीस राहिला. ( प्र. आ. )

६. कर्नाटकामध्यें कोल्हार, उसकोटा, बाळापूर, सेरा आणि बंगलोर हे प्रांत शाहजीस विजापुरच्या बादशहानें जहागिर दिले होते.

७. शहाजीची बायको व लुखजी जाधवरावाची कन्या. शहाजी

महिन्यांची गरोदर सोडून गेले.* ती शिवनेरीस होती. तिजला पुत्र शिवाजी राजे शके १५४९ प्रभवनाम संवत्सरे वैशाख शुद्ध २ गुरुवारीं झाले. शके १५४९ चे साली[१] महाप्रतापी यांचा बयाण जागजागी लेख व दाखले (यांमध्यें) आहेच. पूर्व वृत्तांत शिवाजी महाराजांस मातोश्रींनीं समजाविलाच होता. अलीकडे शिवाजी महाराज यांचे वेळेस अलमगीर पातशाहा अवरंगजेब यांचे बापानी[२] आपले लेकीशीं बदनियतेची नजर ठेविली सबब अलमगीर यांनीं त्याचे पारपत्यास जाण्याची तयारी केली, आणि बोलावणें पाठविलें[३] होतें की, आमचे इकडे जमावासुद्धां येऊन हाजर होणें. असें पत्र शिवाजी महाराज यांस आलें असतां गेले नाहींत सबब दुशमनीचा सिलसिला अलमगीर यांनीं चालविला. हिंदुस्थानांत फौज दक्षिणेंत जागजागीं तयार करण्यास पाठविलें त्यांत राजश्रीचें पारपत्य करून धरून आणावें हा अलमगीराचा संकल्प, व शिवाजी महाराजांचे मनांत दिल्लीवाल्यास जरब बसवावी, असे दोघांचे मनांत दोन प्रकार होते.

**नागपूरकर भोंसल्यांचे पूर्वज** :—पेशजीपासून शिवाजी महाराजांचे समागमें मुधोजी भोंसले व रूपाजी[४] भोंसले हे वडिलोपार्जित

---

व जाधवराव यांचें राजकारणावरून नीट नव्हतें. शहाजीचे दुसऱ्या बायकोचें नांव तुकाबाई आऊ असें होतें.

* अलीकडील शोधांवरून हीही गोष्ट वादग्रस्त आहे. (सम्पादक)

१. ह्या संबंधानें दुसऱ्या बखरीत उल्लेख आहे तो—"शुभचिन्हे झाली. विजापुरी महाराज यांस शुभशकून जहाले. सहा ग्रह उंच पडले. सर्व लक्षणसंपन्न नांव शिवाजी ठेविले." जिजाबाईनें शिवनेरीच्या शिवाई देवीस नवस केला होता, म्हणन पुत्राचें नांव शिवाजी ठेविलें. शिवाजीच्या जन्मतिथीसंबंधानें अलीकडे मतभेद झाला आहे. (सं.)

२. ही गोष्ट दंतकथावजा आहे. (सं०)

शहाजहानास दोन कन्या होत्या. वडील पादशहा बेगम व धाकटी रोशनारा. पहिलीची सौंदर्याविषयीं ख्याति असे. दुसरी आपल्या भावास म्हणजे औरंगजेबास साहाय्य करी.

३. ही गोष्ट खरी नाहीं. (सं०)

४. रूपाजी व परसोजी शिवाजीपाशीं होते असा लेखाधार अन्यत्रही आढळतो.

सेवा करूनच होते. मुधोजी भोंसले[१] व रूपाजी भोंसले मूळ पुरुष, यांजपैकीं मुधोजी भोंसले यांस पुत्र सात जण पैकीं तपसील.

३ लौकिकवाले--१ बापूजी भोंसले, २ साबाजी भोंसले, ३ परसोजी भोंसले.

४ कित्ताचौघे.*

---

७

रूपाजी भोंसले यांस संतति नाहीं, सबब मुधोजी भोंसले यांचे पुत्र त्रिवर्गांपैकीं वडील बापूजी[२] भोंसले तीर्थरूपांजवळ वृत्तीवर होते. व परसोजी भोंसले व साबाजी भोंसले, हे उभयतां रूपाजी भोंसले यांचे जवळ असतां, साबाजी भोंसले यांजवर पुत्रवत् लोभ केला. व रूपाजी भोंसले याचे पेटचांत राहून चाकरी करून महाराजांची मर्जी जागजागीं प्रसन्न करून घेतली. याजवरून राजेश्रींनी कृपाळूपणें आज्ञा केली की, "यवनांनीं हिदु लोकांचा उच्छेद मांडला आहे याजकरितां आपले फौजेशी व त्याचे फौजेशी लढाया हमेशा होत आहेत, त्यांत तुम्ही जमियत ठेऊन बरोबर असावें" यास्तव रूपाजी भोंसले यांचे पेटचांत कांहीएक जमाव ठेऊन बराबर राहिले.

**शिवाजीचे पराक्रम**:--तों विजापुरवाले पादशाहा यांजकडील सरदार फाजीलखान[३] नामें ऐंशी हजार फौजेनिशी महाराजांवर चालून

---

१. वंशवृक्षावरून मुधोजी व रूपाजी हे भाऊ होत असें समजतें. यांचा आजा परसोजी व बाप बिबाजी. बिबाजीस थोरल्या बायकोच्या पोटी मुधोजी व धाकटया बायकोच्या उदरी रूपाजी झाला.

* ह्या चौघांची नांवांशिवाय कांही माहिती आढळत नाही. कान्होजी, दुरगोजी, आबाजी आणि हाबाजी अशीं ह्यांचीं नांवें एका वंशवृक्षांत दाखल केलीं आहेत. (प्र. आ.)

२. (अ) बखरीत बापूजी, परसोजी आणि साबाजी असा अनुक्रम दिला आहे. परसोजी, बापूजी आणि साबाजी असा अनुक्रमही कोठें कोठें आढळतो.

३. फाजिलखान--हा आफजलखानाचा मुलगा. फाजिलखानाचा पराभव बाजी देशपांडे यांनीं केला. खानाचे ५००० लोक रणीं पाडिले. देशपांडे यांस गोळी लागून मरण आलें.

येऊन पन्हाळयांत वेढा घातला. ते वेळेस लढाई मातब्बर जाहाली. शेवटीं पन्हाळयाहून महाराजांनीं मोर्चे तोडून उधळून दिले. तेव्हां फाजीलखान शिकस्त होऊन गेले. हें वर्तमान दिल्लीचे पादशहास समजलें कीं, शिवाजी राजे यांनीं मोठा प्रताप करून विजापूरवाले पादशाहाकडील फौजेची शिकस्त केली. याजवरून अलमगीर पादशहा यांनी शास्ताखान[१] नामें सरदार मातब्बर फौज देऊन रवाना केले. त्यांनी मुलूक मारीत व किल्ले घेत जागजागी ठाणें बसवून, पुण्यास येऊन राजवाडयांत राहिले. ते वेळेस महाराज राजगडास होते. तेथें वर्तमान ऐकून कूच करून येऊन शास्ताखानावर छापा घातला. याजमुळें शास्ताखान परागंदा होऊन निघाले. दिल्लीस जात राहिले. तसेंच फौजेसहित महाराजांनीं सुरत अठ्ठाविशी* मारली. खजिना माहामूर आणिला. याजवर औरंगाबादेस अलमगीर पादशाहा यांनीं मोहकमसिग रजपुत दाहा हजार फौजेनिशी ठेविले होते, त्यांशीही युद्ध फार जाहालें. मोहकमसिंग रजपुत याचा मोड महाराजांनी केला. अशांत दिलेलखान[२] मनसबदार व मिरजा[३] राजा जयसिग पातशाहा अलमगीर यांजकडून महाराजांवर फौजेसुद्धां चालून आले होते. त्यांणी पुरंदरास वेढा घालून महाराजांशीं मिरजा राजे जयसिग यांनी दिलेलखान यास न समजतां महाराजांशी भेटीचा संदर्प लावून तहाचा विचार केला. त्या वेळेस भेटी होऊन २७ किल्ले महाराजांकडून त्यांणीं तहांत घेतले, व बोलण्यांत आणलें की, "तुम्ही पातशाहाचे मुलाजमतीस चलावें. अलमगीर पातशाहा, तुम्हास सर्फराज करतील." हें ऐकून महाराजांनीं संशय, मानिला. तेव्हां मिरजाराजा जयसिग यांनी दगा होणार नाही म्हणून इमानप्रमाण केलें.

**शिवाजीची दिल्लीस कैद व सुटका** (इ. स. १६६६):—याजवरून महाराजांनीं आपल्या प्रांतांचा बंदोबस्त करून सरदार लोक प्रांतांत ठेवून,

---

१. कृष्णाजी अनंतकृत शिवचरित्र पृष्ठें २७–३०.

* अशीं संख्यादर्शक नांवें इतरहि आढळतात. जसें बावनवऱ्हाड ही संख्या कशावरून हें समजत नाहीं.

२. दिलेलखान हा ८०००० स्वारांनिशीं आला.

३. कृष्णाजी अनंतकृत शिवचरित्र पृष्ठें ३२–३८ पाहा.

आपण चिरंजीव संभाजी[१] राजे यासमवेत थोडकेसे जमियतीनिशीं दिल्लीस चालले. ते वेळेस मिरजाराजे जयसिंग यांनीं आपले तर्फेनें रामसिंग[२] समागमें देऊन महाराजांस रवाना केलें. हे पातशाहाजवळ जाऊन पोंहचल्यावर भेटीचे वेळेस सलामावरून पातशाहाचे मनांत विक्षेप[३] आला. याजकरितां नजरबंद करून कैद-दाखल ठेविलें.. महाराजांसहित जमावाभोंवते पातशाही फौजेच्या चौक्या[४] बसल्या. तेव्हां हिंदु लोकांस अंदेशा आला कीं इमान देऊन आणलें असतां असें केलें, हें नीट नाही. तेव्हां जयनगरवाले यांनीं पातशहास अर्ज केला जे, " महाराजांनीं कोंकण प्रांतीचे जिन्नस मेवामिठाई आणिली आहे, हुकूम जाहल्यास येथील उमरावजादे यांचे येथें पाठविण्यांत येईल." असें बोलले असतां " फार चांगलें " म्हणून आज्ञा जाहली. हें वर्तमान महाराजांस सांगितलें, तेव्हां दररोज मेवामिठाईचे[५] पेटारे भरून अमीर उमराव यांचे येथें हमेशा पाठवीत असावें. असें होत असतां एके दिवशीं त्या पेटाऱ्यांत पितापुत्र उभयतांही बसून वेष पालटून निघून ते मथुरेस[६] येऊन चिरंजिवांस[७] ब्राह्मणाचे घरी गुप्त वेषें ठेवून,

---

१. संभाजीशिवाय मोठमोठी मंडळी शिवाजीबरोबर गेली होती. त्यांचीं नांवें पूर्वोक्त शिवछत्रपतीच्या चरित्रांत दिली आहेत. पृष्ठ ३९ पहा.

२. मिरजा राजे जयसिंग याचा मुलगा.

३. ह्या प्रसंगाचें वर्णन कृ अ. कृत शि. चरित्रांत आहे. पृ. ३९–४० पाहा.

४. पोलादखान कोतवाल शिवाजीच्या डेऱ्याभोंवती चौकी देऊन ५००० स्वारांनिशी उभा राहात असे.

५. मजुरांच्या डोक्यांवर पेटारे देऊन मेवामिठाई पाठवीत असे.

६. 'कृ० अ० कृत शि० चरित्र' पृ० ४२–४५ पहा.

७. " संभाजी राजे लहान. त्यांचा पायीं निभाव पडणार नाहीं, म्हणून मथुरेंत काशीपंत पेशवे यांचे आप्त विश्वासु रोजगारी तेथें होते त्यांचे जवळ उपाध्ये यांचे विचारें ठेवून आम्ही आमके मार्गे जाणार तें समजूं न देतां 'आम्ही अमूक स्थळीं आल्यावर सांगून पाठवून त्यांस घेऊन जाऊं' असें सांगून ब्राह्मणाचा वेश संभाजी राजे ह्यांस देऊन गुप्तपणें ठेविलें. समागमें विसाजीपंत व चोबे उपाध्ये यांस घेतलें. आपण सर्व मंडळीसह बैरागी वेष धारण केले होते. तसेंच बैराग्यांचे मेळांत मिळून तेथून कुरुक्षेत्रास गेले.

आपण जातीनें काशीचे मार्गे निघून, भागानगरास[१] जाऊन, तेथून आपल्या देशास महत् प्रयासानें महाराज दाखल झाले. वर्षानंतर चिरंजीव संभाजी-राजे यांजला ब्राह्मण घेऊन येत असतां मार्गात गलबला झाला जे, संभाजी राजे यांजला ब्राह्मण आपला पुत्र म्हणून घेऊन जातो. तर ते काळीं समुदाय ब्राह्मणांचा यास अटकाव झाला. याजकरितां ब्राह्मणास चौकीदार बोलले कीं " तुम्ही पितापुत्र जेव्हां अहांत तेव्हां एक जागीं भोजन करावें." यांनीं उत्तर केलें कीं, " हा आमचा धर्म नाहीं, दूध पोहे म्हणाल तर असो." असा प्रकार होऊन निभाऊन संभाजी महाराजांस ब्राह्मणांनीं आणिलें. पितापुत्राच्या भेटी झाल्या,[२] फार संतोष झाला. राजश्रीनी आपले पाठी-मागें कुटुंबाचा व प्रांताचा बंदोबस्त चांगला राहिला हें पाहून, आपले जागीं फार खुष झाले. मागती राजश्रीनीं फौजेचा घाट घालून पातशाही फौजेशीं

---

तेथून उत्तर मानस, हरिद्वार करून गंडकी अयोध्यादर्शन करून श्रीकाशी व प्रयाग यात्रा करून गयेस आले. तेथें गयावर्जन केलें. त्रिस्थळी यात्रा कार्तिक स्नानें, माघस्नानें सांग करून बराबरचे सर्व यांजपासून यात्रा वगैरे करून देवगड, चांदें, येथें येऊन श्री गंगातीरचीं क्षेत्रें करीत करीत वीस बावीस महिन्यांनी महाराज निभावून आले."–वि. ज्ञा.वि.पु. १० पृ. २०२ पहा

१. हैदराबाद.

२ " मथुरेस पत्र पाठविलें जे, देशीं सुखरूप पावलों. याउपरि सावधपणें संभाजी राजे ह्यांस घेऊन येणें, असें काशी पंतास लिहिलें. त्यांनीं संभाजी राजे ह्यांस घेऊन येतां वाटेनें त्यांचें स्वरूप सुंदर व सतेज तेव्हां हा कोणी मातबर आहे अशी चौकशी पडली. ते समयीं आम्हीं ब्राह्मण हा आमचा मुलगा असें सांगून एकजागां बसून काशीपंतांनी फराळ केला; असे प्रकारें संकटें करून निभावून आल्यावर महाराज फार संतोषी होऊन विश्वासू खरे म्हणून विश्वासराव असा काशिनाथपंतास किताब देऊन वाढविलें. " ( विविधज्ञानविस्तार पुस्तक १० पृष्ठ २०२ पहा. ) कृष्णाजीपंत व काशिराऊ व विसाजीपंत ह्या त्रिवर्गांनीं आपले कुटुंबासहित संभाजी राजे ह्यांस जानवें धोतरें नेसवून आपला भाचा म्हणवून राजगडास आले. आणि राजियांसि भेटले. मग राजे पुत्रास भेटले. आनंद थोर जाहला. मोठा दानधर्म केला आणि कृष्णाजीपंत त्रिवर्ग बंधूंस " विश्वासराव " म्हणवून नांव किताब दिला ( कृ. अ. वि शिव छ. चें च. पृष्ठ ४७ पहा. )

लढाई घेऊन २७ किल्ले[1] मिरजा राजे जयसिंग यांनीं घेतले होते ते पुनः राजश्रींनीं मोठा पराक्रम करून घेऊन जवामर्दीनें ठाणेंठाणीं जाग जागीं बसविलीं.

**रामदास स्वामींची भेट व राज्याभिषेकः** नंतर कोणे एके दिवशीं स्वारी शिकारीस अरण्यांत गेले असतां तेथें, रामदासस्वामींचें दर्शन झालें. सत्पुरुष पाहून सेवा करावी हें चित्तांत येऊन कांहीं दिवस सेवाही केली. त्याजवरून स्वामी प्रसन्न होऊन अनुग्रह दिला. याजवरून राजश्रींची मर्जी बहुत संतोषास पावली. नंतर गागाभट[2] आदीकरून ब्राह्मणांची संमति घेऊन सिंहासनारूढ झाले. शके १५९६ आनंदनाम संवत्सरे ज्येष्ठमासीं शुद्ध १३ स तख्तनशीन होऊन अष्टप्रधानादिक[3] स्थापित केले. याविषयींचा दाखला सातार्‍यास राजमंडळांत बहुत ठिकाणीं आहेच.

**साबाजीस सनदः**—त्या प्रसंगीं भोंसले त्रिवर्गबंधू यांची सेवा पेशजी जागजागीं झाली ती लक्षांत होती असें असतां साबाजी भोंसले यांनी विशालगडाचे मुक्कामीं विनंति केली याजवरून मुलांलेकरांस राहावयास जागा सनद १ नेमून दिली.

स्वती श्री राज्याभिषेक शके १ शा. शके पंधराशें शहाण्णव आनंदनाम संवत्सरे आश्विन बहुल दशमी मंदवासरे क्षत्रिय कुलावतंस श्री राजा शिवछत्रपति स्वामी यांनीं राजेश्री साबाजी बिन मुधोजी भोंसले यांसि दिलें. इनामपत्र ऐसीजेः—तुम्ही स्वामींचे पुरातन सेवक, एकनिष्ठपणें सेवा करून स्वामींस संतुष्ट केलें. तुमचे चालविणें स्वामींस अवश्यमेव तुम्ही विशालगडाचे मुक्कामीं दर्शनास आले ते वेळेस प्रसंगीं तुम्ही विनंति केली कीं, आपणास इनाम लेकरानलेकरी चालेल असा दिला पाहिजे, म्हणोन, त्याजवरून स्वामी

---

१. सत्तावीस गड मोंगलास दिले होते ते मागती घ्यावे अशी शिवाजीनें तजवीज केली. मोरोपंत पेशवे वगैरे मंडळीनें हे सत्तावीस किल्ले परत घेतले.

२. काशीकर विद्वान ब्राह्मण. हा महाशास्त्रज्ञ पंडित होता. यास शिवाजीनें केशव पंडित, भालचंद्रभट्ट आणि सोमनाथ भट्ट कात्रे यांस पाठवून पैठणाहून रायगडास राज्याभिषेकाचे वेळीं आणविलें.

३. अष्टप्रधानांचीं नांवें संस्कृत आहेत. प्रत्येकाच्या कामाची फोड चिटणीसांकडील शिवाजीच्या बखरीत केली आहे.

तुम्हावर कृपाळू होऊन, तुम्हास नूतन इनाम देह, कुलबाब, कुलकानू, खेरीज[१] हक्कदार व इनामदार करून पूर्वमर्यादेप्रमाणें गांव बितपशील :--

१. मौजे राक्षसवाडी तर्फ रासिन तर्फ कडेवळीत देह १.

२. मौजे पिंपरी कान्ही तर्फ कडेवलीत देह १.

एकूण देहे २ रास अजरामरात करून दिल्हे असे, तरी सदर्हू गांव तुम्ही आपले मुलां लेकरीं, घेऊन इनाम तुम्ही वडिलांचे वंशपरंपरेनें अनुभवून स्वामीचें सेवन मनोभावें करून सुखरूप राहणें. जाणिजे. लेखनालंकार.

**शिवाजीचा मृत्यु इ. स. १६८०:**--याप्रमाणें सनद एक करून दिली व पुढें कांही एक दिवस राज्य करून शके १६०२ रौद्रनाम संवत्सरे चैत्र शुद्ध १५ रविवासरी दोन प्रहरीं रायगडीं राजश्रीचें देहावसान होऊन परलोक साधन केला. देहावसानाचे पूर्वी महाराजांचे चित्तांतील संकल्प जे, संभाजी महाराज अल्पबुद्धि, उग्र फार याजकरितां कैद ठेवून राजाराम राजे संभाजीचे सापत्नबंधु वय लहान, सौम्यरूप व राजेश्रींची दयाही त्याजवर बहुत, याजकरितां त्याजला मालकी देण्याचा सिद्धांत देहावसान होण्याचे पूर्वीच केला होता.

## संभाजी

**संभाजीचे अत्याचार:**--आणि शिवाजी महाराजांचें देहावसान झाल्यावर प्रतिनिधि[२] व बाळाजी[३] आवजी प्रभु चिटणवीस यांनीं राज्य-

---

१. वजा करून.

२. प्रल्हाद निराजी.

३. बाळाजी आवजी--हे शिवाजी महाराजांचे प्रसिद्ध चिटणीस, उपनांव चित्रे. यांचे वाडवडील हबसाणांत दिवाणगिरीवर होते. त्यांनीं घोलवाडी नांवाचा गांव इनाम मिळविला म्हणून हे आपणास 'घोलकर' असें म्हणवू लागले. बाळाजी आवजीचे वडील आवजी हरि यांस विषाचा पेला पिऊन मरावें लागलें. बाळाजी आवजी, शामजी आवजी व चिमणाजी आवजी ह्यांस समुद्रांत बुडवून टाकावें असा राजाचा हुकूम झाला. परंतु ते आपल्या आईसह राजापूर बंदरास गेले. तेथें ते आपल्या मामाजवळ लिहिण्यास होते. शिवाजी महाराजांनीं बाळाजी आवजीचें सुरेख अक्षर पाहून त्यास चिटणीशीचीं वस्त्रें सन १६४८ त दिलीं. यांनीं महाराजांची

कारभार राजाराम साहेब राजांनीं करावा, असा नेम करून पन्हाळगडास[१], सोमाजी[२] नाईक हाकम व बहिरजी फरजंद व जनार्दनपंत होते त्यांस पत्र लिहून खंडोजी जासूदाचे नाईकाचे हातीं पाठविलें कीं, " संभाजीराजे यांस कैद करून ठेविणें, आणि राजाराम साहेब यांस, सोईराबाई[३] आई साहेब यांचे आज्ञेवरून मंचकारूढ[४] करून कारभार चालविला." हा मजकूर खंडोजीनीं जासूद यांजबरोबर पत्रें पाठविलीं होतीं तीं पत्रें घेऊन पन्हाळगडास गेला. तों संभाजी महाराज दरवाज्यांत बसले होते. त्यांनीं वर्तमान पुशिलें जे, " महाराज क्षेमकुशल आहेत ? " यांणी उत्तर केलें कीं, " सुरक्षित आहेत." खलबतास संभाजी राजे यांस नेऊन सर्व वर्तमान सांगितलें. " महाराजांस

---

सेवा एकनिष्ठपणें केली व अनेक कामी हे फार उपयोगी पडले. तेव्हां, महाराजांनी त्यांजकडे चिटणिशी वंशपरंपरें कायम केली; पुढें संभाजीनें सोनगांवाजवळ बाळाजी आवजी यांस शके १६०३ मध्यें हत्तीचे पायीं मारिलें. ( कायस्थ प्रभूच्या इतिहासाची साधनें ).

१. संभाजीच्या दुर्वर्तनाबद्दल शिवाजीनें त्यास पन्हाळा किल्ल्यावर अटकेंत ठेविलें होतें. तो पळून दिलेलखानास जाऊन मिळाला व परत आल्यावर पन्हाळे किल्ल्यावर पुन: नजर कैदेंत होता.

२. प्रस्तुत प्रकरणास अनुसरून संभाजीराजे ह्यांच्या चरित्रांत पुढील उल्लेख आहे. " पन्हाळ्यास हवालदार बहिरजी नाईक इंगळे होते. व सोमाजी नाईक बंकी व हिरोजी फरजंद यांस खंडोजी जासुदांचा नाईक व गणोजी कावळा यांजबरोबर पत्रें पाठविलीं, व जनार्दन पंत सुमंत करविरी होते यांसही पाठविली की, " येथील प्रसंग एक प्रकारचा आहे. संभाजी महाराज ह्यांस कैद करून बहुत सावधपणें असावें. महाराजांचें वर्तमान फुटूं देऊं नये." संभाजी महाराज ह्यांसही पत्र त्यांजपाशींच दिलें. परंतु बंदोबस्त झाल्यावर द्यावें असें सांगितलें. त्यांनीं जाऊन त्याअन्वयें पत्र देऊन कांही बंदोबस्त जाहला."

३. ही शिवाजीची दुसरी बायको, ही शिरके ह्यांची कन्या. हिचा पुत्र राजाराम याचा जन्म चैत्र शुद्ध नवमीस झाला म्हणून त्याचें नांव राजाराम ठेविलें. हा पालथा उपजला तेव्हां शिवाजी म्हणाला कीं, दिल्लीची पादशाही पालथी घालील. ज्योतिष्यांनींही असेंच भाकित केलें होतें. ( शि० छ० च० पृष्ठ ५९–६० पहा. )

४. राजाराम शके १६०२ वैशाख वद्य ३ स सिंहासनारूढ झाला.

देवआज्ञा झाली. राजाराम साहेब मंचकारूढ झाले, आणि पत्रें घेऊन आलों तुम्हांस कैद करावें, आपण सोमाजी नाईकास आणून पुसावें." याजवरून सोमाजी नाईक किल्यावरील हाकम याजला आणून पुसूं लागले. तुम्हास महाराजांचे व तेथील कारभारी यांचे कागद आले ते दाखवावे. त्यांनीं कृत्रिम कागद होते ते दाखविले. याजवर खंडू जासूद आणून रुजुवात केली; सकल वर्तमान सांगितलें, तसेच क्रोधें करून सोमाजी[१] नाईकास व हवालदारास[२] कोंडून ठेविलें. आणि लष्करचे सुभेदारास[३] व किल्लेदारांस जागजागीं पत्रें लिहून पाठविलीं. आणि बंदोबस्त करूं लागले. त्यासहित शेंदोनशें लोकांनिशीं संभाजी महाराज निघाले. मार्गांतही अवांतर लोक मिळविले आणि एकाएकीं रायगडास आले. दरवाजे किल्याचे मोकळेच होते. तंव महालांत जाऊन वाड्यांत सोयराबाईराणीवर[४] राग केला आणि बाहेर आले. याजवरून तिणें गळफांस लावून मृत्यु पावली. नंतर बाळाजी आवजी चिटणवीस यांजला बोलावून पुसिलें कीं, अशीं[५] पत्रें काय म्हणून लिहिलीं ?" त्यांनीं विनंती केली कीं, "राणी साहेब व महाराजांची आज्ञा होती म्हणोन लिहिलीं."

---

१. सोमाजी नाईक बंकी व सूर्याजीपंत कावळा ह्या दोघांस मारून टाकिलें असें अन्यत्र ठिकाणी आढळतें.

२. बहिरजी नाईक इंगळे.

३. या समयीं संभाजीनें जी धुमाळी उडविली तिचें वर्णन संभाजी राजे ह्यांचें चरित्र, पृष्ठ ४ ह्यांत सविस्तर दिलें आहे.

४. सोयराबाई साहेब हिजवर शिवाजी महाराजांस विषप्रयोग केल्याचा आरोप संभाजीनें करून तीस पुष्कळ जांच केला. एका भिंतीच्या कोनाड्यांत तिला चिणून घालून दूध देऊन ठेविली होती. तेथें ती तीन दिवस होती. तिसरे दिवशीं तिचा प्राण गेला.

५. या पत्रांविषयीं संभाजी राजे ह्यांच्या चरित्रांत पुढील मजकूर आढळतो. "बाळाजी आवजी ह्यांस बोलावणें करविलें जे, सरदार व पन्हाळा येथें बंदोबस्ताचीं पत्रें लिहावीं म्हणून सांगितलें त्यांनीं उत्तर केलें कीं, "आम्ही दरकदार राजाचे. खावंद वडील संभाजी महाराज असतां अशीं पत्रें आम्ही लिहिणार नाहीं तेव्हां तुम्हास हा आग्रह करण्याचें कारण नाहीं. तुमचे हातचें पत्र नसल्यास लोकांस पत्राचा विश्वास पडणार

तेव्हां आज्ञा जाहली कीं, आम्ही मालक नाहीं ? पूर्वापार विश्वासुक असतां तुमची लेखणी कशी वाहिली ? असा शब्द लावून हत्तीचे पायीं देऊन जिवें मारिलें.[1] पुरुष एक ठेविला नाहीं. त्यांतून मूल लहान[2] त्याचें आजोळ मातेचें माहेर, तेथें जाऊन माय समागमें हापसाणांत, नामें खंडो बल्लाळ वांचला.

इकडेस परसोजी भोंसले हेही कांहीं जमावानिशीं तेथें होते त्यांजला बोलावून विचारिलें कीं, तुम्ही प्रबुद्ध वडिलोपार्जित सेवक आहांत असें असतां तुमचे समक्ष असें व्हावें हें तुम्हास योग्य नव्हे. असो तुम्ही आतां येथें न राहतां कूच करून जावें. याजवरून परसोजी भोंसले आपले जमावानिशीं गेले. ते खानदेशांत पुंडवाले लूट करीत होते तेथें त्यांत मिळून राहिले व बापूजी भोंसले व साबाजी भोंसले हे वृत्तीवर गेले.

मग संभाजी महाराज यांनी राज्याचा बंदोबस्त करून अम्मल[3] करूं लागले. तों चिटणवीसाचा मूल[4] मोठा जाहला. हुशार होऊन सर्वत्र

---

नाहीं. यास्तव तुम्हांकडे दरक त्या अर्थी बरीं वाईट पत्रें तुम्ही लिहावीं हें तुम्हांस पात्र. लिहून द्यावीं." ते समयीं निरुपाय व साहेबांची इतराजी दिसून आली. त्यावरून "मी लिहीत नाहीं मूल आवजी आहे त्यास स्वाधीन करितों–पाहिजे तसें करवा" म्हणोन उठोन गेले. आवजी बोवापासून पत्रें लिहून रवाना केलीं.

१. संभाजीची बायको येसूबाई ही बाळाजी आवजी ह्यांस मारल्याचें वर्तमान ऐकून फार रागावली व तिनें संभाजीची फार निर्भर्त्सना केली. संभाजीसही ही गोष्ट वाईट वाटली व स्वकृतीचा पश्चात्ताप झाला. ( प्र. आ. )

२. खंडो बल्लाळ व निळो बल्लाळ असे बाळाजी आवजीचे दोन मुलगे होते. खंडो बल्लाळ यांचें वय १०–१२ वर्षाचें होतें. येसूबाई ही आपले कागदपत्र खंडो बल्लाळ याजकडून लिहवीत असे. व त्याजवर लोभ करी. ( प्र. आ. )

३. शके १६०२ रौद्रनाम संवत्सरे माघ शुद्ध १० गुरुवारीं संभाजीस राज्याभिषेक झाला.

४. खंडो बल्लाळ हा गोव्याचें राजकारण निघालें तेव्हां संभाजी बरोबर गेला होता, त्या वेळेस तो संभाजीच्या उपयोगी पडला म्हणून संभाजीनें त्यास चिटणविशीचीं वस्त्रें संतुष्ट होऊन दिलीं.

मनाई करीत असतां राजेश्रीं जवळ आला, सरकारांत प्रवेश होईना. इतक्यांत कोंकणांत एक किल्ला बदलून होता. तेथें हपशी आले होते हें वर्तमान ऐकून त्याचे पारिपत्यास कांहीं लोक पाठविले. लौकर शरण ( न ) होय या करितां महाराज जातीनें चालले. मार्गात विचारिलें कीं, कोणी लिहिणार कारकून समागमें आहे कीं काय ? एक चिठ्ठी आपले फौजेंत पुढें पाठविली पाहिजे. त्या वेळेस चिटणविसाचें मूल कलमदान घेऊन धांवत होता. तें हुजुरास सांगितलें जे, चिटणविसाचा मूल हजर आहे त्यावरून आज्ञा झाली जे, चिठ्ठी लिहिणें कीं, स्वारी येऊन पोहोंचली तुम्ही घाबरे होऊं नये, असें लिहिण्याचा हुकूम झाला. तंव सरकार स्वारी पावकोस निघोन गेली. मार्गांतून चिटणविसाचे मुलानें धांवत जाऊन स्वारी आटोपून, चिठ्ठी पालखींत टाकली. महाराजांनीं ( चिटी ) पाहून ( पुढें ) पाठविली. ती जलद स्वारीचे आधीं पोहोंचली, हें पाहून, लोकांस धैर्य जाहलें, आणि हल्ला केला त्यांत किल्ला फत्ते जाहला. तंव स्वारीही सरकारची पोहोंचली. सर्वांनीं विनंती केली जे, आज चिठ्ठी समयास आली. त्याजमुळें कार्य सिद्ध झालें, हें ऐकून फार संतोष झाला. तेच दिवशी स्वारी, माघारी फिरली. चिटणविसाचा मूल[१] रक्त ओकून मार्गात पडला होता, तो महाराजांनीं पाहून मुलास सावध करून पुढें घेऊन स्थळास आले. त्याचें काम पूर्ववत् त्यास देऊन ताम्रपत्रही करून दिलें.

**कलुषा :**—कारभारांतही घेऊन कांहीं दिवस चालत असतां, कनोजी ब्राह्मण कबजी[२] दिल्लीहून पातशहाकडून सरकारांत आला. त्यानें

---

१. यासंबंधानें संभाजीचे चरित्रांत पुढील उल्लेख आहे. "खंडो बल्लाळ चिटणीस धांवत येत आहेत ते समयीं हाक मारविली. तों धांवून येऊन पावले त्यांस जाब लिहून देणें असें सांगितलें. तो बसून लिहून दिला. स्वारी पुढें गेली. पुनः धावून निशाण करून दिलें तों रक्त ओकले. तें पाहून अस्ताव्यांतून पाणी देववून खांसा घोडा जिलबीस होता तो देऊन बसा म्हणून सांगितलें."

२. हा कलुषा प्रधान. हा कवि होता म्हणून त्याचें नांव कबजी किंवा कविजी असें पडलें. कलुषा हा औरंगजेबाकडून संभाजीराजास धरून नेण्याच्या इराद्यानें विडा उचलून आला होता. असा प्रवाद होता. याजविषयीं संभाजीचे चरित्रांत पुढचा उल्लेख आहे:—"कवि कलुषा कबजी

राजाची मर्जी बहुत प्रसन्न करून घेतली. राजास वश केलें. जसें सांगत जावें तसेंच महाराज राजश्रींनीं ऐकत जावें. असें झालें असतां दिल्लीहून पातशहा अलम्गीर फौजेसहित शके १६१४ व हिजरी सन १०९३ चे सालीं दक्षिणेंत आले. त्यांनीं मुलूख जेर केला. हें वर्तमान जागजागचें आलें. म्हणजे कबजींनीं म्हणावें कीं, हें वर्तमान मिथ्या आहे. कारण कबजी याजला कारभार सोंपिला व वशीकरणामुळें राजा वश जाहला होता. त्याजवरून कबजीचें बोलणें वारंवार पडत असावें कीं, आपले जवळ फार फौज इतका खर्च कशास पाहिजे याप्रमाणें म्हणत असावें.

**संभाजीचा मृत्यु–शाहू**:—बातमी पातशाही फौजेची आली. नंतर त्यास मारावें असें होतें. तों एकाएकी संगमेश्वरचे[1] मुक्कामीं, पातशाही फौजा आल्या. त्यांत संचार कबजीचा होता. त्यावरून संभाजी महाराज व त्यांचे पुत्र शिवाजी[2] साता वर्षांचे यांजला धरून, अलम्गिराजवळ तुळापूरचे मुक्कामास गेले. नंतर संभाजीस पातशहा अलम्गीर यांणीं समक्ष नेऊन म्हणाले कीं, "तूं आमचे समागमें भोजनास ये." त्याजवरून यांणीं उत्तर केलें कीं, "तुमची लेंक मजला लग्न[3] करून द्याल तर मी जेवितों."

---

म्हणोन कनोजी ब्राह्मण बहुत विद्वान् मंत्रशास्त्रविद्या आगम त्यास बहुत गम्य असे होते. त्यांची स्त्रीही चतुर होती. त्यांनीं महाराज वश्य करावे म्हणून कर्णमंत्र प्रयोग करून महाराजांची बहुत जवळीक व कृपा संपादून अगोदर समीप राज्याभिषेक पूर्वीं होतेच. वाममार्गविशीं अनुष्ठानें प्रयोग, संपत्ति करणें व राज्यवृद्धि होणें, यश येणें असें समजावून प्रयोग अनुष्ठान करविलें. पुढें दिवसेंदिवस बुद्धीस भ्रंश पडून त्या मार्गांत अनुसरावें असें केलें. रेडे मारून त्यांचे ओले कातड्यांवर अनुष्ठानें व मद्यमांस पशुवधाचीं बहुत करूं लागले."

१. इलाची बेग नामक सरदार संभाजीस पकडण्याकरितां संगमेश्वरास आला होता. तेव्हां येसूबाई साहेब व शिवाजी राजे हे रायगडीं होते. त्यानें संभाजीस कबजीबावास व इतर मंडळीस कैद करून तुळापुरास आणिलें.

२. हा संभाजीचा पुत्र. याचा जन्म शके १६०२ रौद्रनाम संवत्सरे मार्गशीर्ष शुद्ध १० स येसूबाईचे पोटीं झाला. हाच शाहू महाराज.

३. पातशहानें संभाजीस विचारावयास पाठविलें कीं, तुम्ही बाटावें म्हणजे जीव वांचवून तुमची दौलत तुमचे स्वाधीन करितों. त्याजवरून राजे यांनीं उत्तर केलें कीं, बाटा म्हणतां तर ही गोष्ट घडावयाची नाहीं.

याजमुळें अलम्गीर पातशहा खपा होऊन संभाजीस जिवें मारण्याची परवानगी दिली. याजवर संभाजीस तुळापूरचे मुक्कामीं सेवकांनीं नेऊन जिवें मारिलें.[१] नंतर शिवाजी वय लहान[२] हें वर्तमान पातशहाचे कन्येस समजलें. त्याजवरून मुलास पातशहाजादीनीं पाहण्यास बोलाविलें, पाहून बहुत दया आली व पातशहास विनंति केली कीं, "तुमचे समक्ष या मुलाचे बापांनीं माझें[3] नांव घेतलें. तेव्हां हा पुत्र माझा आहे याजवर आपण कृपा करीत असावी व मुलास जनानियांत येण्याची परवानगी द्यावी." याजवरून "उत्तम आहे" म्हणून हुकूम जाहला. असें असतां कोणे एके दिवशीं पातशहा खवासांत बसले तेथून दुसरे स्थलीं जाऊं लागले तेव्हां जोडा पायांतील टाकिला. ते समयीं पातशहाजादीनीं मुलाचे हातून जोडा[४] उचलविला व इषारा केला कीं, मस्तकीं घेणें, यांणीं तसेंच केलें. हें पातशहानीं पाहून विचारिलें कीं, हें काय ? तुझे बाप, आजे मुफसद होते. त्यांची वर्तणूक अणीक रितीची असतां तुझा विचार असा" तेव्हां मुलांनी विनंति केली की, "त्यांची त्या सात गेली. मी सरकारांतून आहे. स्वामींचे पायांतील जोड्याचें स्थान माझें मस्तक आहे. तेव्हां मी मस्तकीं धरिलें आतां मला उणें काय आहे ?" हें ऐकून बहुत संतोष होऊन विचारिलें कीं, "तुझें नांव काय ?" त्यांनीं

---

ज्या अर्थी कैदेंत आलों तेव्हां वांचणें तें काय ? तुमचे विचारास येईल तें करावें. तथापि तुमची बेटी द्यावी म्हणजे बाटतों. हें उत्तर ऐकून औरंगजेबास राग आला व संभाजीचा शिरच्छेद करावयास त्यानें सांगितलें. संभाजी राजे यांचें चरित्र पृष्ठ २० पहा.

१. शके १६१० विभवनाम संवत्सरे फाल्गुन वद्य अमावास्येस संभाजी व कलुषा यांस मारिलें.

२. या समयीं शिवाजी राजे ह्यांचें वय ६–७ वर्षांचें होतें.

३. संभाजीचें म्हणणें औरंगजेबाची मुलगी बेगम हीस समजलें तेव्हां ती म्हणाली, "त्याचा प्राण माझे नांवें करून गेला. या उपरि आपण दुसरा भ्रतार करणार नाहीं." संभाजी राजे यांचें चरित्र पृष्ठ २१ पहा.

४. थोरले शाहूमहाराज ह्यांचे चरित्रांत शाहूनें पादशहाचा जोडा उचलला ही गोष्ट आढळत नाहीं. पातशहा सिंहासनावरून उठत असतां त्यांचे मखमाली पायमोजे शाहूनें हात लावून पुढें केले. तेव्हां त्यानें संतुष्ट होऊन हांतांतील रुमाल त्यास बक्षीस दिला. असा उल्लेख थोरले शाहू महाराजांचे चरित्रांत आहे. ही बखरकाराची मखलाशी दिसते. (सं)

विनंति केली जे, माझें नांव शिवाजी आहे." यावर हुकूम जहाला कीं," चोर शिवाजी होता तू शाहू[१] आहेस." त्या दिवसापासून त्याचें नांव "शाहू" झालें.

**शाहूचें लग्नः**—असें होऊन त्या समयीं पादशहाचे[२] कन्येनें विनंति केली कीं, यांचें लग्न करावें, सोयरीक शिरक्याची कन्या[३] आणून लग्न लाविलें पाहिजे." पातशहांनीं मुलगी पाहण्यास बलावली. तेव्हां मराठे[४] यांणी विचार केला की, "या समयीं यवनाचे येथें आपली कन्या पाठवावी हें नीट नाहीं. काय करावें! न पाठवितां गति नाही." हें जाणोन दासीची कन्या[५] तिजवर वस्ता[६] भारी घालून पाठविली. ती व महाराज (शाहू) बादशहाजवळ आले. बादशहांनीं जवळ घेऊन

१. मल्हार रामरावकृत "थोरले शाहू महाराज यांचे चरित्रांत" पुढील उल्लेख आहे:—"हे जाले. आमचे बेगमेनें पुत्र म्हणविले, ते नातु जहाले. यांचें नांव शाहू असें म्हणावें असें शाहू राजे म्हणों लागले." पृष्ठ ३ पहा.

२. औरंगजेब याच्या मुलीचें शाहूवर फार प्रेम होतें. "शाहू महाराज वयस्क जहाले (तेव्हां) यांचें लग्न करावें असा बेगमेनीं अर्ज केला. तेव्हां पातशहांनी उद्धव योगदेव राजाज्ञा व मोरोपंत सबनीस व जोत्याजी केसरकर यांस आज्ञा केली की, "आमचे पदरीं मातबर उमराव, सरदार आहेत त्यांत राजाचे शरीर-संबंधी पूर्वी पासून होत असतील, त्यांच्या कन्या पाहून उत्तम ऐश्या योजाव्या, आणि लग्न करावें म्हणून समारंभास खर्चास लाख रुपये देवविले." म० रा० कृ० थो० शा० चरित्र पृष्ठ ४ पहा.

३. शाहूचें एक लग्न रुस्तुमराव जाधव शिंदखेडकर यांच्या कन्येशीं व दुसरें शिन्दे कण्हेरखेडकर यांच्या कन्येशीं झालें; अंबिकाबाई व सावित्रीबाई अशी अनुक्रमानें त्यांचीं नांवें ठेविलीं, असें शाहूच्या चरित्रांत लिहिलें आहे. (पृष्ठ ५) शिर्के व मोहिते यांच्या कन्या योजिल्या असेंही कोठें आढळतें. (वऱ्हा. इति. पा. ३२६ पहा.) (सं०)

४. "येसूबाई साहेब यांनीं बेगमेचे विचारें शिंदे यांजकडील आंदणी दासीची कन्या होती ... ...तिजला वस्त्रें जवाहीर अलंकार देऊन महाराज व तिजला पाठविली." (शा० च० पृष्ठ ५ पहा)

५. विरूबाई हें दासीपुत्रीचें नांव.

६. दागिने.

आशीर्वाद[१] दिल्हा. बादशहा अवलिया होता. त्यानें कृत्रिम जाणोन हीच मागें राज्य करील ही आज्ञा जाहली.[२]

**औरंगजेबाचें दक्षिणेंत आगमन**:—बादशहाची स्वारी कांहीं एक दिवस राहून दौलताबाद[३] वगैरे गोवळकोंडें[४] हैदराबाद[५] घेतलीं. तानाशा[६] वगैरे धरले. असा मोठा प्रताप करून औरंगाबादेची छावणी मुकरर केली. साताऱ्यास आले, तों पेशजी संभाजी व शाहू राजास धरून नेलियावरि राजाराम[७] साहेब मालक जाहले. आईसाहेब[८] कारभार करीत होत्या. तेव्हां कोणी पुरुष कारभारी चांगला पाहिजे याजकरितां खंडेराव बल्लाळ चिटणविस यांस सांगितलें "तुम्ही कारभार करावा." यांनी विनंति केली आणि आपले चित्तांत आणिलें कीं, राजांनीं मागें जसा सलुका केला असा पुढें आमचें पारिपत्य करील. त्यास दूरच असावें हें जाणोन आईसाहेबांस विनंति केली कीं, "आम्ही पदरचेच पूर्वापार खरे, परंतु या समयास मनुष्य चांगला पाहिजे. एक मनुष्य थोर परशुरामपंत यांस प्रतिनिधि करावे, आणि कारभार चालवावा. वरकड अष्टप्रधान आहेतच." यावरून परशुरामपंत कारभारी केले. त्यांनी राज्याचा बंदोबस्त करून कारभार चालविला होता. तों

---

१. "तुमचें राज्य तुम्ही बहुत दिवस उभयतां कराल असें आशीर्वादात्मक बोलले." शा० च० पृष्ठ ५ पहा.

२. शाहूचे कारभारांत विरूबाईचें फार प्रस्थ होतें त्यास अनुलक्षून(सं.)

३. दवलताबाद—महंमद तघलखानें देवगडच्या मुसलमान सरदारास मारून त्या शहरास् दिल्लीहून राजधानी नेण्याचा विचार केला व त्यासच दवलताबाद हें नांव सन १३४० त दिलें. जुनें देवगिरी.

४. सन १६८८ सालीं गोवळकोंडें घेऊन तेथील राज्याची समाप्ति औरंगजेबानें केली व तंजावरपर्यंत मुलूख घेतला.

५. जदुनाथ सरकार यांचे औरंगजेब भा. ४ पान ४१३.

६. तानाशाहा—हा गोंवळकोंड्याचा शेवटचा राजा. याचेंनांव अबुल हसन असें होतें. गोंवळकोंडा घेतल्यावर औरंगजेबानें त्यास दौलताबादेच्या किल्ल्यांत ठेविलें. तेथेंच तो बंदिवासांत मरण पावला.

—सरकार औरंगजेब भा. ४ पान ४५३.

७. हा संभाजीचा सावत्र बंधु.

८. ताराबाई साहेब, ही राजारामाची स्त्री. राजारामानंतर ती फार प्रसिद्धीस आली. (सं.)

बादशहाची स्वारी आली. फौजा साताऱ्यास[१] लागल्या. किल्याचे बुरुज मंगळाईचा[२] तेथें सुरंग लावून उडविला. ते समयीं प्रयागजी प्रभू[३] त्या बुरुजांत सुभेदार होते ते उडाले. येथपर्यंत केलें परंतु किल्ला स्वाधीन न जहाला. बहुत दिवस खटपट करीत राहिले. किल्ला आल्यानंतर[४] दुसऱ्या किल्यास[५] लागले. तेथें

१. मल्हार रामरावकृत 'थोरले राजाराम यांचे चरित्रांतील पुढील उल्लेख " खासा स्वारी साताऱ्यास आली " इत्यादि प्रस्तुत प्रसंगासच अनुलक्षून आहे. रा० च० पृष्ठ ४४ पहा.

२. " किल्लेचे पूर्वभागीं ईशान्य कोनेस मंगळाईच्या बुरुजाखालीं बादशहानीं सुरुंग करविला. पाटीभर माती काढून आणतील त्यांस एक मोहर द्यावी असे लक्षावधी रुपये खर्च करून सुरुंग करविला. उडवावा ते वरच्यास बातमी न समजावी, असा बेत राखून, बुरुजाखालीं दारूचे बुधले पुरून, मोर्चे हुषार राखून, आपण खांसा तक्तराव्यावर बसून स्वारी बाहेर आली. .......... किल्यावरील लोक पादशहाची स्वारी पाहणेस मंगळाईचे बुरुजावर उत्तरेकडील तटावर उभे राहिले. त्या समयीं मंगळाईचे बुरुजाची सोंड शें दोनशें हात वरती उडोन जेथील तेथें कायम झाली. त्या काळीं वरील लोक शें दोनशें तटाखालीं पडून मेले. खालील लोक मोर्चेबंदीचे बहुत मेले व जायां झाले. " राजारामाचें चरित्र पृष्ठ ४५ पहा.

३. " सुरुंग उडाला ते समयीं प्रयागजी प्रभू सुभेदार बुरुजानजीक झाडा खालें बसले होते तेथें दगड येऊन पडले. त्यांचें आयुष्य बलोत्तर तीन धोंडे तिहींकडे मोठा धोंडा वरता एक, आंत घराप्रमाणें झालें आणि वर मातीचा ढीग पडला .....ते समयी लोकांनीं चोहोंकडे पाहतां हरळी (ओरड) झाली जे सुभेदार दिसत नाहींत तेव्हां सर्व दरकदार व लोक मिळून ज्या स्थळीं बसले होते त्या स्थळीं येऊन पाहतां मातीचा ढीग बुरुजाप्रमाणें पडलेला. उकरून पाहतात तों झग्याचा पदर दृष्टीस पडला. त्याजवरून येथें आहेत असें ओळखून माती काढू लागले तों दगडाच्या आंतून ते बोलले कीं, मी जिवंत आहें. असें म्हटल्यावरून लोकांनीं माती, दगड युक्तीनें काढून आंतून बाहेर काढिले ते खैर होऊन निघाले.पुनर्जन्म झाला." राजारामाचें चरित्र पृ.४५-४६.

४. सातारा किल्ला कसा घेतला या गोष्टीचें वर्णन 'थोरले, राजाराम यांचे चरित्रांत ४६–४७ पृष्ठीं आहे. या किल्याचें नांव 'अझिमतारा' असें औरंगजेबानें ठेविलें. साताऱ्याचा वेढा ८ डिसेंबर १६९९ ते २१–४–१७०० पर्यंत चालू होता. ते वेळीं राजाराम दुसरीकडे होता. तो इ. स. १७०० चे मार्च महिन्यांत सिंहगडास मरण पावला. (सं.)

५. हा परळीचा किल्ला. 'सज्जनगड' थोरले राजाराम चरित्र ४७–४८ पृ.

किल्ला भांडूं लागला. बादशहास बातमी लागली कीं, या किल्यांत परशुरामपंतच[१] आहेत. ज्यांनीं साताऱ्याचा किल्ला भांडविला तेच येथें आहेत. तेव्हां बादशहा लाचार होऊन अहमदनगरास येऊन अहमदनगर घेतलें.

( याप्रमाणें ) यश येऊन औरंगाबादेस आले. तोफेच्या नजरा सर्वत्रांनीं केल्या. व बादशहाजादीनी नजर केली नाहीं सबब बादशहानीं विचारिलें की, " बादशहाजादी नजर कां करीत नाहीं ? " यावरून उत्तर केलें की, " औरंगजेब बादशहा कायम होता. म्हणून तुम्ही सहलशाहा होता, आतां जागजागीचे बादशहा बुडवून तुम्ही घातशहाच राहिले. तेव्हां सहलशाही उडाली. याजकरितां आतां तरी आपला नवासा[२] शाहू म्हणविला आहे. याजला स्थापित करावा म्हणजे त्याजपासून नजर तुम्हास करवीन. " याप्रमाणें बोलणें होऊन कांहीं एक दिवसांनी बादशहाजादी शांत होते समयी बादशहाचें वचन तिनें घेतलें कीं, याजला स्थापित करून मग दिल्लीस जावें. असें वचन घेऊन बादशहाजादी शांत झाली.

**औरंगजेबाचा मृत्यु** इ. स. १७०७—याजवर तीन वर्षांनीं सरदेशमुखीच्या सनदा व वस्त्रें शाहूस दिली. फौज देऊन रवाना करावें तों अकस्मात बादशहाचें देहावसान[३] शके १६२८ व्ययनाम संवत्सरीं नगरास झालें. पातशहाजादे[४] जवळ होते. ते दिल्लीवर स्वार होऊन चालले. हे पंजाबांत बाहदुरशहा अलमगीर दक्षिणेंत आल्यावर, गेले होते. ते तिकडून दिल्लीस येतात हे ऐकून, मोजमशा पातशहाजादा याजपाशी वजीर झुल्फिकारखान होता. त्याचे व बादशहाजादीचे पूर्वीचे संकेत ठरले होते की, शाहूराजे यांजला दक्षिणेंत आपला म्हणवून स्थापित करावा. त्या अन्वयें

---

१. परशुराम त्रिंबक—हा किन्हईचा कुळकर्णी. हा रामचंद्रपंत अमात्य यांजपाशी कारकून होता. हा स्वपराक्रमानें वाढला. राजारामाची बायको ताराबाई हिनें परशुरामपंतांस प्रतिनिधि पदाचीं वस्त्रें दिलीं.

२. नातू ( मुलीचा मुलगा).

३. इ. स. १७०७, फेब्रुवारी ता. २१ रोजी औरंगजेब मरण पावला.

४. शाहाजादा बहादूरशहा हा पंजाबांत होता व अझमशहा हा दक्षिणेंत होता. 'थोरले शाहू महाराज यांचें चरित्र' पृ. ६ टीप २७ पहा. शाहजादा मोअझिम यानें बहादूरशहा असें नांव धारण केलें होतें.

यवन बादशहाजादीशीं वजीरानें अर्ज केला जे, "आपल्यास पुढें दिल्लीस कारण असे, आणि इकडे समदान खालीं टाकणें सल्ला नाहीं. शाहू याजला पूर्वीं अलमगीर पातशहा कृपावंत होऊन इकडेस स्थापित करण्याविषयीं सनदा व वस्त्रें दिलींच होतीं तेच आपण आपलेसे करून ठेवावे."

# शाहू

**शाहूचें दक्षिणेंत आगमनः**—याजवरून शाहू याजला खिलत व सरदेशमुखीच्या सनदा[१] दक्षिणेंत चौथ[२] घेण्याविषयीं दिल्या, त्या कायम करून देऊन साताऱ्यास फौज देऊन रवाना केले ते पांच सात हजार फौजेनिशीं आपले मुलुखांत खानदेशच्या मार्गे चालले, हें परसोजी भोंसले यांजला समजलें. यावरून हेही आपल्या जमावानिशीं[३] जाऊन महाराजांस अनुकूळ जहाले, दरकुच महाराज राजश्री साताऱ्यास चालले, ते गंगातीरास आले.[४] मुक्काम केला; हें वर्तमान मातोश्री ताराबाई[५] आई साहेब व परशुरामपंत प्रतिनिधि यांस कळल्यावरून तोतिया आहे म्हणून ठरविले. जर खरा असला तरी लबाड होय, असे मनुष्य योजून पाठवावे, याजकरितां, खंडेराव बल्लाळ[६] चिटणविस ठीक आहेत. आमचे स्नेही आणि राजांनीं[७] यांचे वडील मारले त्याचा सूड हे घेतील हे आपले मनांतील म्हणून, बरोबर पांचशें लोक देऊन रवाना केलें. यांसि व राजाशीं भेटी झाल्या. राजा रांगडी बोली व हिंदुस्थानी चाल अशी वर्तणूक तेव्हां खरा खोटा कशावरून ओळखावा.

---

१. थोरले शाहू महाराज यांचें चरित्र पृष्ठ ७ पहा.

२. प्रांताच्या एकंदर वसुलाचा चतुर्थांश.

३. परसोजीपाशीं १५००० फौज होती. थो० शा० च. पृ. १० पहा

४. गोदावरी.

५. राजारामाची वडील बायको. हिचें लग्नांतील नांव 'सीताबाई, होतें. तथापि ही माहेरच्या 'ताराऊ' ह्या नांवानेंच प्रसिद्ध आहे. राजारामाच्या मृत्युची हकीकत बखरकारानें अजीबात गाळली आहे. (सं.)

६. 'थो. शा. च.' पृ. ११ पहा.

७. संभाजी राजे.

तंव केसरकर[१] खिजमतगाराचा नाईक, याजला ओळखिलें. आणीकही खिजमतगार बरोबर होते ते ओळखीचे पाहून चौकशी केली. केसरकरांनीं वर्तमान सांगितलें. बहुत दिवस कैदेंत, संबंध अष्टौप्रहर हिंदुस्थानी लोकांपाशीं, तेव्हां सहज बोलण्यास व चालीस फेर. वरकड विचार पाहतांना प्रत्यक्ष शिर्क्यांची कन्या यांस दिली, ते शिर्के इकडचे आहेत, ते पक्केपणें ध्यानास आणून राजा खरा जाहला. चिटणविसांनीं आईसाहेबांस पत्र लिहिलें व परशुरामपंतास व तसेंच अष्टप्रधानांस व जाधवराव[२] आदिकरून सर्वत्रांस पत्रें लिहिली जे, राजा खरा आहे असें झालें. राजाची कृपा खंडेराव[३] बल्लाळ चिटणवीस याजवर फारच झाली.[४]

**शाहूकडे बापूजी भोंसल्याची रवानगीः**—मग परशुरामपंतास संकट झालें. फौजेवर हुकूम करावा तरि फौज कोणी जाईना. राजा-खरा असल्यास वाईट. चिटणविसांनी खरा केला तेव्हां खराच आहे यामुळें सरकारचे सरदार कोणी अघाडी घेईनात. तेव्हां पुढें हा तोतिया खरा कसा होय. यासि माणूस चांगलें पाठविलें पाहिजे. सारे फंदांत मिळाले. आई साहेबांस विनंती पंतांनी केली याजवरून आज्ञा दिली कीं, हिंगणीकर भोंसले बापुजीबुवा हे पहिले पासून वडिलोपार्जित इतबारी प्रबुद्ध आपले जवळ आहेत. यांजला पाठवावें. शिवाजी महाराजांसमागमें कामाकाजास आलेले हे खरे म्हणतील तर राजा खरा. यांजला पाठवावें. म्हणजे आपले भावास[५] सूचना करतील, असें होऊन त्याजबरोबर हजार बाराशें लोक देऊन रवाना करण्याचा निश्चय झाला, आणि आई साहेबांनीं समक्ष बोलावून आज्ञा केली जे,"तुम्ही वडिलापासून (आहां) तुमचे वडील पूर्वापार सेवा करीत, विश्वासुक प्रबुद्ध याजकरितां पाठवितों. तोतिया मनुष्य पाहून यावें म्हणजे सर्वांची खातरजमा होईल. मग पारपत्य केलें जाईल. तुम्ही आपले कुळास बट्टा लाऊं नये, रांगडा कोण आहे, चिटण-

१. जोत्याजी केसरकर. हा शाहूचे कैदेपासून त्याचे जवळ होता.
२. धनाजी जाधवराव, हा ताराबाईचा सेनापति.
३. 'थोरले शाहू महाराज यांचें चरित्र' पृष्ठें ९–१६ पहा.
४. सरदेसाई मध्यविभाग १ प्र. १ पहा (सं०).
५. परसोजीस.

विसांनीं शाहू केला आहे याजवर न जाणें. तुम्ही सांगाल तसेंच होईल." असें सांगून हजार लोक बरोबर देऊन रवानगी केली. भेटी झाल्या. राजा रांगडा, ठिकाण नाहीं. अंदेशांत पडले. चिटणविसांनीं एकांतीं नेऊन केसरकर खिजमतगारांचा नाईक, याचें बोलणें सांगितलें. हेही बोलले कीं, तुम्ही या प्रसंगीं अनुकूल झाल्यास तुमचा सन्मान होऊन पद मातबर देण्यांत येईल. प्रसंग हाच आहे एका ताटांत जेवावें व तुमचे बंधु परसोजी भोंसले यांची भेट घ्यावी. याजवरून उभयतां बंधु भेटून विचार केला आणि सर्वां-देखत उभयतांनीं ताटांत जेवले[1] हें सर्वत्रांनीं पाहिलें. तेव्हां राजा खरा झाला. तोतया नाहीं. याजवरून धनाजी जाधवराव यांजकडून बाळाजी विश्वनाथ पहावयाकरितां आले. राजाशीं भेटून चिटणवीस खंडेराव बल्लाळ होते त्यांणीं बाळाजी विश्वनाथ यांस सांगितलें कीं, "तुम्ही अनमान कोणताही एक करूं नये. जाधवराव यांजला फौजेसुद्धां आणवावें व तुम्ही आपले पतकासहित येऊन महाराजांस अनुकूल झाल्यास तुमचे जातीस पद मातबरीचें सेनापतीचे बरोबरीचें देण्यांत येईल. परशुरामपंत आजवर दौलत आपण करीत आले, तशीच करावी यास्तव हे खोटे म्हणतात याजकरितां तुम्हीं त्यांचे म्हणण्यावर न जावें. हिंगणीकर भोंसले उभयतां बंधु यांचे ताटांत जेवले तेव्हां खोटें कसें म्हणाल ? जाधवराव सेनापति हेही सोयरेच आहेत. आतां यश तुम्हीं घ्यावें" याजवरून बाळाजी विश्वनाथ जाऊन धनाजी जाधवराव यांजला फौजेसुद्धां घेऊन आले. भेटी झाल्या.

**शाहूनें सातारा घेतला**:— तेथून पुढें दरकूच जाऊन साताऱ्यास लागलेच गेले. शनवारचे दिवशीं प्रातःकाळीं राजा शाहू व धनाजी जाधवराव हे महाराजांचे मामा[2] एकत्र बसले होते तंव यांना बोलिला कीं, "आजचे आठवे दिवशी याच वेळेस किल्ला घेऊं." हें ऐकून जाधवराव हंसले. पातशहा अलमगीर अवरंगजेब बहुत दिवस खटपट करीत असतां साध्य झाला नाहीं.

---

१. ही गोष्ट शाहूचे चरित्रांत आढळत नाहीं.

२. वऱ्हाडचा इतिहास पृ. ३२९ पहा. धनाजी जाधवाचे भाऊबन्द म्हणजे शिंदखेडकर जाधवांचें घराणें शिवाजीचें मामेकुळ. त्यावरून हें नातें. प्रत्यक्ष मामाचें नातें नव्हतें. शिवाय रुस्तुमराव जाधवाची मुलगी शाहूस दिल्यामुळें सासरा नात्यानें मामा. ( सं. ).

तोच परशुरामपंत आहे. कसा किल्ला साध्य होईल ? याजवर महाराजांनीं हास्यवदन जाधवराव यांचें पाहून, उत्तर केलें कीं, " मामासाहेब आजचे आठवे दिवशीं किल्ला यावेळेस आला हें जाणावें." उगीच राहिले. दुसरे दिवशीं वाईकर शेखमिरा किल्लेदार वगैरे किल्लयावरचे माणसांचीं मुलें लेकरें होतीं, बातमी लागतांच धरून तेथून आणिलीं, आणि किल्लयाखाली उभीं करून मोर्चास पुढें देतों असा एकच हाहाकार केला. हें पाहून शेखमिराभाई परशुरामपंतांशी बोलले, जे, " मुलें माणसांची ही गति तेव्हां जिंदगी कशास करावी ? आम्हांस निरोप द्यावा. " याजवरून पंत बोलले जे, " दुसरें लग्न करावें, रुपये देतों. " अशीं नानाप्रकारें बोलणीं झालीं. शेखमिरांनीं तेव्हां त्यां सारखेच बोलून कबूल केलें, तेव्हां पंतास भरंवसा वाटला कीं, हे माझे झाले. तों आठवे दिवशी शनवारी प्रातःकाळींच शेखमिरा जाऊन बोलले कीं, कांहीं बोलावयाचें आहे. तेव्हां खलबतास जाऊन तेथें शेखमिरानीं आपली शिवबंदी बोलावून पंतांस[१] गफलतीनें (धरलें) आणि किल्लयावर दरवाज्याजवळ पटका[२] फिरविला. तों सहा घटका दिवस आला. राजांनी लष्करांतून पाहिलें तेच वेळी पांच हजार फौज तयार होती, त्या फौजेनिशी जातीनें[३] किल्ल्यावर गेले. शेखमिरा दरवाज्यांत होता, त्यांचा हात धरून बोलले जे, "तुम्ही आमचे भाऊ आहांत. ब्राह्मण फंदी, त्याचा अन्याय तुम्हाकडेस काय आहे. आमचे तुम्ही आहांत. " असें म्हणून सर्वत्र मंडळी सुद्धां किल्ल्यांत आले. तों पहिला प्रहर दिवस आला. फत्तेची नौबत तेथेंच वाजविली. त्या दिवसापासून मराठे यांचे राज्यांत शनवारची नौबत वाजत आहे व नजरा होऊन सारे आपआपले स्थळास गेले.

नंतर महाराज राजेश्री क्रोधयुक्त होऊन परशुरामपंतास बोलाऊन जीवें मारण्याचा हुकूम दिला. हें वर्तमान खंडेराव बल्लाळ चिटणविसांस समजलें तेव्हां स्नान करीत असतां तसेच राजेश्रीकडे जाऊन विनंति केली कीं, परशरामपंत होता म्हणून किल्ला भांडविला. अलमगिरास साध्य झाला नाहीं, व याचा पुत्र श्रीपतराव फौजेनिशी हैद्राबादेस मोहिमेस आहे, याजवर

१. प्रतिनिधीस गफलतीनें धरल्याची गोष्ट शाहूच्या चरित्रांत नाहीं.

२. किल्ला शरण आल्याची खूण.

३. ' थोरले शाहू महाराज यांचे चरित्रांत हें प्रकरण सविस्तर आहे.

कृपा करावी. सक्त रदबदली पाहून वांचविले.[१] नंतर चिटणवीस घरास जाऊन स्नान, संध्या भोजन करून, दरबारास गेले. बोलणीं बहुतां प्रकारे राजेश्रीशीं झालीं. दुसरे दिवशीं मातोश्री आई साहेबांच्या भेटी झाल्या. राज्याचा बंदोबस्त करूं लागले. तेव्हांपासून सातारा येथील वस्ती होऊन किल्याखालीं मातबर शहर वसविलें. तेथेंच राजधानी झाली. राजकारणी बंदोबस्त करण्यास आरंभ केला. शके १६२९ सर्वजितनाम संवत्सरे माघ शुद्ध पक्षीं सातारेस येऊन राज्याभिषेक सिंहासन करून समारंभ विधिपूर्वक केला. पट्टाभिषेक जाहला.

**बाळाजी विश्वनाथास पेशवाई**:—नंतर खंडेराव बल्लाळ चिटणवीस यांनीं विनंती केली कीं, " बाळाजी विश्वनाथ व परसोजी[२] भोंसले या उभयतांस सरफराज करावें " या उभयतांचें लक्ष सरकाराकडेस हें जाणून, व चाकरीही तशीच केली याजवरून धनाजी जाधव सेनापति, यांजकडून बाळाजी विश्वनाथ याजला मागून घेतलें असतां, कोंकणांत समुद्र-तीरीं आंग्रे[3] नांवाचे सरदार हापसाणाचे बंदोबस्तास पेशजी होते त्यांचें

---

१. या समयीं प्रतिनिधीचा जीव वांचविला, हा चिटणिसांचा उपकार प्रतिनिधीचें घर भवानरावाचे कारकीर्दीपर्यंत स्मरत होतें. चिट-णिसांस मांजगांव इनाम दिला व श्राद्धाचे दिवशीं चिटणिसांकडील एक खांसा नेऊन त्यास श्राद्धाचे ब्राह्मणांबरोबरच भोजनास बसवीत असत. हा क्रम बरेच दिवस चालला व नतर बंद पडला. हल्लीं औंधकरांनीं तो पुनः सुरू केल्याचें समजतें. परशुरामपंताच्या बचावाविषयीं मल्हाररामरावकृत शाहूमहाराजांचें चरित्र पृ. २५–२६ ( प्र. आ. )

२. परसोजी विषयीं मल्हाररामरावकृत राजारामाचे चरित्रांत पुढील उल्लेख आहेत.

(१) " परसोजी भोंसले यांस सेनासाहेब सुभा दिला. सन्मान सेनापति प्रमाणें, वस्त्रें, जरीपटका दिला. " पृष्ठ ३६.

(२) " परसोजी भोंसले बहुत कर्ते मर्द म्हणोन सेनासाहेब सुभा पद देऊन, सन्मान सेनापति प्रमाणें, वस्त्रें, अलंकार, जरीपटका, चौघडा देऊन, गोंडवण, देवगड, चांदे, वराड वगैरे येथें अंमल ( त्यांनी ) बसविला तो सुभा त्यांस दिला. " पृष्ठ ३८.

३. कान्होजी आंग्रे ताराबाईच्या वतीनें लढत होता. यानें

लक्ष आईसाहेबांकडेस फार असून जागजागी पुंडावे करावे. यास्तव जुने पेशवे पिंगळे[१] यांजला त्यांची मोहीम सांगितली. त्याजवर गेले. आंग्रे यांणीं लढून याजला धरून अटकेंत[२] ठेविलें. तेव्हां पिंगळे यांजवर मर्जी गेली. एक तो अपयशी दुसरें राजश्री आले ते समयीं गैरहजर होते, याजमुळें अनास्था होती. सबब पिंगळ्यांची पेशवाई काढून बाळाजी विश्वनाथ यांजला देऊन याजवर रवानगी केली. आंग्रे यांशीं व बाळाजीपंताशीं, पूर्वीचा स्नेहभाव फार होता. त्याजमुळें त्याजकडे निरोप पाठविला कीं, तुमच्या भेटी घडाव्या आणि ही पेशवाई तुमचीच जाणावी, असें स्नेहभावाचें बोलणें ऐकून आंग्रे भेटीस आले. ते समयीं बाळाजीपंत बोलले जे, "तुम्ही राजश्रीशीं[३] भेटावें, तुमचा अधिकार व पद याचीं वस्त्रें राजश्रींपासून तुम्हांस देववितों. राजाज्ञेंत असावें मातोश्री आई साहेब व राजेश्री एकाचे एकच आहेत. एक विचार होईल, यास्तव आपण आपली सफाई करून घ्यावी." आंग्रे यांच्या मनास येऊन किल्ले दिले. ते घेऊन पिंगळे अटकेंत होते ते सोडून आणिले हें वर्तमान समग्र राजश्रींस बाळाजीपंत यांनीं लिहिलें. राजश्री संतोषित होऊन सेवेंत असावें, अशीं आज्ञापत्रें पाठविलीं[४] याजवरून आंग्रे यांजला समागमें घेऊन आले. याजवरून राजश्रींस बहुत संतोष झाला. पेशवाई वस्त्रें बहुमान बाळाजी विश्वनाथ[५] यांजला दिलीं.

**परसोजी सेनासाहेब सुभा व सनद १७०७** :—आणि परसोजी भोंसले यांजवर कृपावंत पेशजीचे दयेवरून होऊन "सेना साहेब सुभा" असें पद व वस्त्रें बहुमान देऊन पूर्वेकडेस रवाना केले, ते काळीं सनद परसोजी[६]

---

बहिरोपंत पिंगळे पेशवे यास कैद करून साताऱ्यावर चालून येण्याचा घांट घातला होता.

१. बहिरोपंत पिंगळे. थोरले शाहू महाराज यांचें चरित्र पृ. २९

२. पिंगळे व निळो बल्लाळ यांस कान्होजी आंगरे यानें कैद केलें.

३. शाहू महाराज यांस.

४. ह्या गोष्टीचें सविस्तर वर्णन शाहूच्या चरित्रांत आहे. पृष्ठें २८–३२ पहा.

५. शके १६३५ सन १७१३–१४ यांत बाळाजीस 'पेशवे' पद मिळालें.

६. परसोजीची ही हकीकत शाहूच्या चरित्रांत नाहीं. तरी

भोंसले सेना साहेब सुभा यांचे नांवें शके १६२९ सालीं अखेरः—

१. प्रांत रितपूर व सरकार गावेल प्रांत वराड, प्रांत देवगड, चांदगोंडवण

१. आनागोदी[१] वगैरे वराड प्रांतीचे माहाल बितपशील.

| | | |
|---|---|---|
| १. | सरकार गावेल माहाल | ४६. |
| १. | सरकार नरनाला माहाल | १९. |
| १. | सरकार माहूर माहाल | ३७. |
| १. | सरकार खेडले[२] माहाल | २१. |
| १. | सरकार पवनार माहाल | ५. |
| १. | सरकार कळंब माहाल | १९. |
| ६ | | १४७ |

एकूण सहा सरकार दर शेंकडा नऊ रुपये आक्रा आणे मोकाशाचे[३] आकारास असे.

२

**परसोजीचा** मृत्यु १७०९ :—सदहू प्रमाणें सनद एक करून देऊन रवाना केले ते फौजेसहित गंगेपलीकडेस मृत्यु[४] पावले.

# कान्होजी

समागमें पुत्र कान्होजी भोंसले होते. त्यांनीं तसाच फौजेस ग्रह घालून गंगथडीस घांसदाणा वगैरे खंडण्या घेत वराडांत आले. आज्ञेप्रमाणें बरोबर

---

पुढील उल्लेख आहे:—" तसेंच भोंसले सेनासाहेब सुभा यांजकडे वराड, गोंडवण, कटक व हिंदुस्थान पैकीं कांहीं महाल, ऐसा सुभा नेमून दिला. त्यांची नेमणूक वगैरे त्याचप्रमाणें बंदोबस्त जाबते करून दरकदार हुजूरचे सर्वांस नेमून दिल्हे. " पृष्ठ ३७ पहा.

१. आनागोदी वऱ्हाडांत नाहीं. येथें नकलेंत चूक दिसते. ( सं. ).

२. बैतूल जवळील गांव व किल्ला. ( सं. ).

३. मोकासा—ना. इ. पा. ४८ पहा. ( सं. ).

४. परसोजीचा मृत्यु शके १६३२, फ. ११११, इ. स. १७०९ मध्यें कृष्णावेण्यासंगमीं खेड ( साताऱ्याजवळ ) येथें झाला. ( ना. इ. पृष्ठ ५० ) (सं.)

बंदोबस्त राखून रितपूर वगैरे प्रांत वराड येथें ठाणें बसविलें. नंतर गांव दारव्हें येथेंही अंमल करूं लागले. हें वर्तमान राजेश्रीस सातान्यास कळून बहुत संतोष झाला.

**बाळाजी विश्वनाथाची दिल्लीवर मोहीम**[१] इ. स. १७१९:— तंव तिकडेस बाळाजीपंत राजश्रीचे जवळ होते, तों दिल्लीस शाहजादा अझीम व मोहझीम बाहदूरशा यांशीं लढाई होऊन बाहदूरशा[२] फत्ते पावले. अझिमशाहा शिकस्त होऊन ठार झाले. नंतर पुन: एक पातशाहांचा खिसा आपसांत होऊन फरोकशिर[३] शाहाजादे झाले. बंगाल्यांत पाटण्याचा मुलूख याचेकडे होता. कारभारी फरोकशिराजवळ सय्यद[४] होते; त्यांनीं शाहाजाद्यास फौज देऊन जमा करून दिली. दिल्ली तक्तनशीन बादशहा फरुकशीर झाले. कारभारी[५] वजीर सय्यद झाले; यांनीं जुने कारभारी वजीर अमीर व मुलखी सुभेदार हे सारे स्थापित आपले केले. बादशाहा[६] पुरातन काढले. त्यांत दक्षिणेंत दाऊदखान[७] पन्ही पन्नास साठ हजार

---

१. सरदेसाई मध्यविभाग १ प्र. ३ पहा. Later Mughals, Siyarul Mutakherin.

२. औरंगजेब यास मोअज्जीम, अजीम आणि कामबक्ष असे तीन पुत्र होते. मोअझीम आणि अझीम यांची मोठी निकराची लढाई आग्र्याच्या दक्षिणेस झाली, तींत अझीम यास व त्याच्या दोन मुलांस मारलें आणि, मोअझीम बहादुरशाहा हा किताब घेऊन गादीवर बसला.

३. बाहादूरशाहा सन १७१२ मध्यें मरण पावल्यावर त्याचा मुलगा जहांदर गादीवर बसला. फरुकशीर हा जहांदराचा पुतण्या.

४. सय्यद हुसेन अल्ली आणि सय्यद अबदुल्ला हे मोठे पराक्रमी भाऊ होते. हे दोघे बंधु फरूकशिराचे पुरस्कर्ते होते. या दोघां भावांपैकीं वडील हुसेन अल्ली हा बहादरचा सुभेदार व धाकटा अबदुल्ला हा प्रयागचा सुभेदार होता. यांच्या साहाय्यानें फरूकशीर यानें जहांदरशहाचा आग्र्या-जवळ पराभव केला व सन १७१२ मध्यें सिंहासनाधिरूढ झाला.

५. धाकटा सय्यद वजीर झाला. व वडील सय्यद सेनापति झाला.

६. जहांदरशाहा.

७. दाऊदखान पन्ही—हा दक्षिणचा सुभेदार झुलफिकारखान याचा मुतालिक होता. हा दक्षिणेंत असे. परंतु त्या समयीं याची नेमणूक

फौजेनिशीं जबरदस्त होते. याजवर सय्यद जातीनें हुसेन अल्लीखां व हसनरेजाखानाचा पुत्र अलमअल्लीखां[१] असे मिळून फौज घेऊन आले. तंव दाऊदखानाकडेस बादशहाचें लक्ष आंतून कीं, तुम्हीं त्यास न धरावें. हा विचार, बाहेर अंगीं सय्यद प्रबल, तेव्हां बोलतां नये. येथें बादशहाचे, भरंवशावर दाऊदखान सय्यदाशीं भांडूं लागले, त्याला अमीर वगैरे दाऊदखानाकडील सय्यदावर जबरदस्त होते. त्यास दाऊदखान आटपेना. या संधींत महाराज शाहूराजे यांणीं दूरवर पल्ला बांधून सय्यद प्रबळ; बादशहाचे हातींचा बंदोबस्त सर्व लाहोर आदीकरून जाहला व बंगाला याजकडेसच होता तेव्हां दक्षिणेचा विचार काय; हें सहजांत घेतील; या समयीं आपण कुमक पाठवून सय्यदांशीं स्नेहभाव संपादन करून अनुकूलता करावी, हें लक्षांत. आणून धनाजी जाधवराव मातबर सरदार पन्नास साठ हजार फौजेनिशीं व आणीकही सरदार तैनात करून बऱ्हाणपुरावर पाठविले. ते, सय्यदांशीं भेटले व कामकाजही केलें. यामुळें सय्यदाची मर्जी फार संतोष होऊन नंतर दाउदखानाकडील सरदारांनीं पाहिलें ( कीं ) मराठे तिकडेस मिळाले, व फौजही सय्यदाची भारी व सय्यद दिल्लींत सर्व आटोपून, याजपाशी राहणें ठीक नाहीं. हें जाणोन पैगाम तेव्हां करून आले, व बाकी राहिली फौज हावालदील पाहून दाऊदखानानें सर्वत्रांस रजा दिली; त्यांत खानदानीचे कुलीन असे होते कीं, त्यांनीं मरण कबूल करून दाउदखानाजवळ राहिले. फौज वीस हजार पर्यंत ठरली. सय्यदाची लढाई झाली. बहूत अमीर सय्यदाकडील कामास आले. ते समयीं जातीनें सय्यद चालून गेले. तेव्हां अलम अल्लीखानास तीर मारला. त्या संधीत धनाजी जाधवराव कमरग्यांत येऊन पन्नास हजार फौजेनिशीं दाऊदखानाशीं तरवार चालली. हें सय्यदानीं पाहून बहुतच खुष झाले. त्यांत अंबारी चालून जाधवराव यांचे फौजेचे बलकंबल सहजांत येश सय्यदास आलें. दाऊदखानाचें शीर

---

गुजराथचे सरसुभ्यावर झाली होती. हा हुसेन अल्लीशीं लढत असतां गोळी लागून मरण पावला.

१. हा सय्यदांचा हस्तक.

कापलें. सय्यद यशवंत झाले. फत्तेचे सैदोन वाजूं लागले. धनाजी जाधवराव यांस लूट माफ झाली. त्याजवर सरफराजी सर्व प्रकारें होऊन आप्त जाणून, शाहूराजे थोर, या समयीं कुमक केली, या प्रयोगें फत्ते झाली. राजास बहुमान वस्त्रें वगैरे पाठवून आप्तत्वाचा विचार ठरवून अलम् अल्लीखां दक्षिणेचे सुभे आमचे चिरंजीव ते तुमचे असे बोलून फौजेसहित ठेविले, परंतु लेकरें, सर्व भरंवसा तुमचा आहे, हे व तुम्ही मिळून असावें. हा बंदोबस्त राखून हुसेन अल्लीखान दिल्लीस गेले. दाऊदखानास बादशाहा फरूकशीर यांचें आंग म्हणून असें झालें. तो बादशाहा कामाचा नाहीं म्हणून फरूकशीराचे[१] डोळे सय्यदांनीं काढिले. दुसरा बादशहा[२] करून अंमल केला. त्यांनीं आपले आंगास महा मगरूरी आणली. यामुळें त्याचेंही पारपत्य करून सय्यद दोघे भाऊ हुसेन अल्लीखां आणि हासन रेजाखां यांणीं बादशाही करण्याचें मुकरर होऊन वडील भावास तक्तावर बसविण्यास गेले. ती पायरी तक्ताची चढतां आंधळे झाले. डोळ्यानें दिसेना. धाकटे भावानीं विनंती केली जे, आपण लवकर बसावें. त्यांनीं उत्तर केलें की, "तुमची इच्छा तक्तनसीन असावें. परंतु ईश्वर इच्छा नाही. आतां तुम्ही पातशहा दुसरा करावा." याजवरून यांनीं महमदशाहा[३] वयातीत चांगला गरीब पाहून पातशहा केला; तो आर्जव सय्यदांचा करून होता. त्याजवर मर्जी सय्यदांची प्रसन्न असे.

**निजाम उल्मुल्क याचा उदय** इ. स. १७२४:—असें असतां जुने वजीर याचे घराण्यांतील निजाम ऊल्मुल्क चीन किलीचखान[४] नामें मूल वय लहान, सय्यदाचे आर्जवांत होता. लोभांत विशेष. असें असतां

१. इ. स. १७१९.

२. सय्यदांनीं रफीउदर्जात व रफीउद्दवला अशा दोघां मुलांस गादीवर बसविलें, परंतु ते दोघेही चार पांच महिन्यांचे आंत मरण पावले.

३. महंमदशाहा—याचें मूळचें नांव रोशन अख्तर असें होतें. हा इ. स. १७१९ त गादीवर आला.

४. हाच निजामाचा मूळ पुरुष. फरूकशीर यानें आपला साहाय्यकर्ता असोफजा ऊर्फ चीन किलिचखान यास निजाम उल्मुल्क ही पदवी देऊन दक्षिणेची सुभेदारी दिली. नंतर हा माळव्याचा सुभेदार झाला. हें सर्व कृत्य सय्यदांचें होतें.

सय्यद कृपावंत होऊन माळवा प्रांत वगैरे येथील सुभ्याचें काम सांगितलें. तेथें राहून कांही नजर नजराणा पाठवून मर्जी बहाल करून घेतली आणि फौजबंदी केली. सय्यदांकडे लिहिलें जे, हा प्रांत दंडेल आहे. माळवे वगैरे यांची तंबी करावी लागती. फौज पाहिजे. तेव्हां सय्यदांची आज्ञा आली की, तुम्ही फौज ठेवून मुफसदाचें पारपत्य करणें. यावरून फौज ठेवून एकाएकीं चाल दक्षिणेंत धरली. माळव्याहून भोपाळास आली. तेथील जमाव घेऊन सत्वरच चार दिवसांत बऱ्हाणपुरास[१] आले. इकडील ही जमाव तसाच अवरंगाबादेचे सुमारें निघोन अलम अलीखान यांजला एकाएकीं वर्तमान समजलें. यांणीं मराठे, वडिलांचे स्नेही, त्यांची फौज बोलाविली. साताऱ्याहून बाळाजी विश्वनाथ पेशवे फौजेसहित रवान झाले. अलम अल्लीखां साकरखेडल्यास आले. साताऱ्यास राजांस पत्रें आलीं. अंदेशा केला कीं, बादशाहाच्या वजीराचे पुत्र याजकडेस फौज पाठवावी किंवा निजाम उल्मुलूक याजकडेस असावें. तेव्हां दोन्ही दळें राहून संधान ठेवणें प्राप्त आहे. ही योजना करून बाळाजी विश्वनाथ प्रसंग पाहून मिळतील. याजमुळें दरकूच निघाले तों निजाम उल्मुलकासीं पैगम केला कीं, तुमचे मदतीस महाराजांनीं पाठविलें असे. पुढें वकील पाठविले तो अलम अलीखानाकडे सांगून पाठविलें की, आम्ही येऊन पोहोंचलों तों इतक्या संधीस साकरखेडल्यावर[२] उभयतां यांनीं फौजेशीं लढाई होऊन निजाम ऊल्मुलुक यांणीं आलीखानाचें शीर कापिलें.[३] निजाम ऊल्मुलुकाची फत्ते जाहली. दौलताबाद वगैरे दक्षिणेंत अम्मल बसविला. पुढें कसें होईल, हा अंदेशा निजाम ऊल्मुलुकास तेव्हां मराठे यांसीं स्नेह संपादन केला,

---

१. दिलावरखान नामक सरदार निजामावर माळव्यांत आला होता, त्याचा पराभव बऱ्हाणपुरानजीक सन १७२१ मध्यें निजामानें केला.

२. वऱ्हाडांत सक्करखेर्डा येथें सन १७२४ त मुबारिजखान व निजाम यांजमध्यें लढाई झाली. वरील लढाई बाळापूरची. ( १७२१ ).

३ ही हकीकत चुकीची आहे. ही बाळापुरची लढाई इ. स. १७२० मध्यें झाली. साखरखेडर्याची लढाई इ. स. १७२४ मध्यें झाली. (व. इ. पा. १४६ व १४८ पहा.) तेथें मुबारीजखानाचें थडगें आहे. (सं.)

व बाळाजी विश्वनाथ पेशवे याजला मदत खर्च देऊन माघारे रवाना केलें. तसेंच दिल्लींत सर्व झालेलें वर्तमान समजलें. सय्यद रोषांनीं तमाम फौज व पातशाहा अमीर घेऊन दक्षिणेवर आले. इतक्यांत वाटेवर निजाम, उल्मुलुक यांनीं आपलेकडून मारेकरी सय्यदांस मारण्याकरितां जाहागिरा देऊन चौघे जण पाठविले. त्यांनीं स्वारींत सय्यदाचे अर्ज फिर्याद निजाम उलमुलुकाची केली कीं, आमचे वडिलांचेवर जुलमाना निजाम उलमुलुक् करीत आहे. नालकी उभी करून अर्जी घेऊन वाचूं लागले, तंव चौघे जणांनी पेषकबजे उपसून सय्यदास[१] जिवें मारिलें. मारेकरी पळून निघोन गेले. स्वारींत बोलवा एकच जाहला. तेव्हां महंमद पातशाहा यांणीं फौजेचा बंदोबस्त राखून कमरुद्दीनखां वजीर करून माघारे दिल्लीकडेस फिरले. कारण हासन रेजाखान सय्यद लाहोर काश्मीराकडे गेले होते त्याचा सरंजाम प्रबल, येथें फौज भारी, दिल्ली आटपतील, आपण जाऊन त्याचें पारपत्य करावें. या उद्देशें दिल्लींत पोहोंचले. पुढें फौजा रवाना केल्या.

तों इकडेस निजाम उलमुलुक यांणी बाळाजीपंतासीं सख्य भाऊपणा करून माघारें जाण्याचा बेत केला होता. परंतु बाळाजीपंतांनी निजाम उलमुलुकाशीं बोलले जे, "आम्ही फौज घेऊन बादशाहाचे चाकरीस हजर होण्यास जातों." असे सल्यानें साताऱ्यास जाऊन वृत्तांत सांगून, राजश्रींनी मनांत आणिलें, सय्यदांचा भाऊ हासन रेजाखां लाहोरांत बलाढ्य फौज तो सूड घेईल, कठीण आहे. आपलेकडे बदमामली येती. दुसरे निजाम उलमुलुक. येथें कसें करावें. हें जाणोन बाळाजीपंताची रवानगी[२] केली. यांजबरोबर कान्होजी भोंसले सेनासाहेब फौजे सुद्धां देण्याकरितां बलाऊ पाठविलें. हरवक्त यांचें पोहोंचणें न झालें. सबब संताजी भोंसले व राणोजी[३] भोंसले हे सेनासाहेबांचे सखे चुलत बंधु तेही आपले हुजुरांत

१. मीर हैदर हा अर्ज देण्याच्या मिषानें हुसेनाच्या पालखीजवळ गेला, आणि तो अर्ज वाचीत असतां आपल्या परिवारास इषारा केला आणि आपली कट्यार भोंसकली. हा घाय वर्मी लागल्यामुळें हुसेन प्राणास मुकला.

२. येथें कालक्रम चुकून घोंटाळा झालेला आहे.

३. संताजी भोंसले हा परसोजीचा दासीपुत्र असें ग्रांट डफ म्हणतो. पण

मातबरीनें होते, त्यांजला जमावासहित पेशवे यांचे बरोबर दिले. बाळाजी विश्वनाथ पेशवे शहाणे दूरंदेशा करून बादशहाशी मंधान ठेवतील, याजकरितां रवानगी होऊन दिल्लीस गेले. हिकडून सय्यदही दिल्लीवर चालून आले.

**संताजी भोंसल्याचा मृत्यु** इ. स. १७१९:—कांहींएक चव मजलीच्या फासला होता; हें जाणोन संताजी बोवा भोंसले याणीं ध्यानांत आणिलें की, आतां ह्या प्रसंगी दिल्लीवर चालोन जावें, कीर्ति मिळवावी. तसें बाळाजी विश्वनाथ यांजकडे इषारा न करितां चालून गेले, सय्यदास कळावयाकरितां दिल्लीस जाऊन आघाडीस लढाईचें तोंड लाविलें. साधकबाधक विचार न पाहतां जवामर्दीस फरमाविलें. हसन रेजाखानाची प्रबलता. ते प्रसंगास दाखल झाले असते तरी बरें होतें. तें न होतां त्वरेनें आपले जमावानिशी पातशाही फौजेशी लढाई घेऊन दिल्लीत माणिकचौकांत संताजी भोंसले कामास आले. पातशाहांनी पाहून आश्चर्य केलें. चित्तांत विचार केला कीं, सैय्यद तिकडून येतात व मराठे हिकडून आले आहेत तेव्हां आज काळीं मराठ्यांस एक होऊं देणें सल्ला नाही. जर मराठ्यांनीं आपलेकडून बिघडविलें आहे तरी या प्रसंगी समेट करून माघारे रवाना करून द्यावें. पुढें सय्यदास पाहून घेऊं. असे कित्येक अंदेशे मनांत आणून लढाईत जे जखमी राहिले होते, त्यांस पुसलें की, संताजी भोंसले याचें कोणी आहे कीं,

---

तें चुकीचें आहे. (सं.) यास दिल्लीच्या रस्त्यांत तेथील लोकांनीं ठार केलें. "संताजी भोंसले परसोजी भोंसले सेना साहेब सुभा यांचे पुत्र" असा लेख मल्हाररामरावकृत शाहूच्या चरित्रांत आहे. पृष्ठ ४० पहा. पुढील मजकूरही लक्षांत ठेवण्यासारखा आहे. "संताजी भोंसले सेनासाहेब सुभा यांणी लढाईंत चालून घेतलें. सैदाचे फौजेचा मोड जाहला. तेथें संताजी भोंसले यांस गोळा लागून (ते) पडले. सैदाची फौज मारून लुटून गारद केली. •फरीकशहाचे पुत्र कैद करून आपण तख्तावर बसले. महमदशहा याणीं महाराजांकडील प्रधानपंत व सेनापति, सेनासाहेब सुभा व सरलष्कर व सर्व सरदार यांस वस्त्रें, जवाहीर, हत्ती, घोडे देऊन बहुमान केला. संताजी भोंसले पडले असतां, त्यांचे पुत्र राणोजी भोंसले याणीं तरवार लढाईत केली म्हणून त्यांस सवाई संताजी (हा) किताब दिला." पृष्ठ ४२ पहा.

काय ? मग त्यांनी विनंती केली जे यांचा भाऊ राणोजी[१] आहे व राजेही[२] भोंसले व हेही भोंसले आहेत. बाळाजी विश्वनाथ आपले फौजेंत मुक्कामींच होते. तेव्हां पातशहांनीं दूरवर दृष्टि देऊन त्यांजकडे सांगून पाठविलें जे, जवामर्द माणूस संताजी चांगला याचे भावास सरफराज करावें. राजेश्री बाळाजी विश्वनाथ यांजला खातरजमेचीं पत्रें पाठविलीं कीं, " तुम्ही आमचे हुजुरांत दृष्टि देऊन असावें. निजाम उल्मुलुख दक्षिणेंत आहे त्याचे विचारें चालावें. हुजुरांतून तुमचे राजास सरफराज केलें. परवाने इनायतनामे[३] पाठविले आहेत. हे घेऊन सर्व लक्ष पातशाहीकडे ठेवून असावें. " म्हणोन वस्त्रें आदि करून बहुमान देऊन बाळाजी विश्वनाथ यांची रवानगी माघारें दक्षिणेंत करून दिली. याचे समागमें राणोजी भोंसले संताजीचे भाऊ म्हणोन कलगी व सवाई ढाल खिलात बहुमान देऊन बाळाजी विश्वनाथ यांजला सांगून पाठविलें कीं, " शाहूराजे यांस सांगावें कीं, याचा सांभाळ सर्व प्रकारें करावा. " याप्रमाणें सन्मान होऊन बाळाजी विश्वनाथ यांची रवानगी सातान्यास केली. दिल्लीहून बाळाजी विश्वनाथ सातान्यास माळवे प्रांताहून येऊन स्वस्थानास येऊन दाखल जाले.

**कान्होजीची कारकीर्द**:—तेव्हां इकडेस कान्होजी भोंसले सेनासाहेब सुभा यांनी वऱ्हाड प्रांतीं अंमल बसवून चंद्रपूरपर्यंत एक स्वारी देवगड येथें करून कांहीं परगणे लुटून फौज माघारे वऱ्हाडांत गेली. भांब चांगली जागा पाहून मुख्य राहावयास स्थळ केलें. अंमल बहुत क्रूरतेचा सेनासाहेब सुभे करूं लागले. परंतु वडिलांचे पाठीमागें फौज समेटून सारे गोष्टीचा बंदोबस्त राखून खंडण्या घेत चालले. हें राजेश्रींस वर्तमान कळून, बहुत संतोष जाहला. वस्त्रें बहुमान जरीमंदिल व जरीची चादर इत्यादिक नजर न घेतां पाठविली. ती कान्होजी बोवा सेनासाहेब सुभा

---

१ हा उमरावतीकर भोंसल्यांचा मूळपुरुष (ना. प्रां.इ.पृ.५४ पुढें पहा)

२. शाहू महाराज.

३. चौथ व सरदेशमुखी ह्या हक्काच्या सनदा शाहूस दिल्या. 'पेशव्यांची बखर' पृष्ठ १७ टीप २३ पहा. या सनदेची नक्कल शाहूच्या चरित्रांत आहे. (पृष्ठ ४३), त्यांत " कान्होजी भोंसले यांणीं गोंडवण, वऱ्हाड कटक अमल बसविला, त्याप्रमाणें चालावें. " असें वाक्य आहे.

यांनीं पाहून बहुत आनंदयुक्त जाले. पोटीं संतति नाहीं ही चिंता करीत असतां कांहीं एक अनुष्ठानें शतचंडच्या कित्येक होमहवनें ब्राह्मणद्वारां व आपण जातीनें सोवळें फारच करावें. ब्राह्मणाचे हातचें जेवावें. असें चाललें.

**रघूजीचें लहानपणः**—यांचे चुलते बापूजी भोंसले. त्यांचे पुत्र बिबाजी भोंसले. यांचे पुत्र रघोजी भोंसले, हे पुतणे सेनासाहेबांचे, पांडववाडीस ( होते. ) रामाबाई[१] आवा साबाजी बोवाची स्त्री, मशारनिल्हेची आजी, तिजला संतति नव्हती. सबब पुत्रवत् लोभ करून रघोजी बोवाचा सांभाळ करून होती. तेथून कान्होजी बोवानीं आपले जवळ रघोजी बोवांस आणिन्हें. ते वेळेस वय बारा वर्षांचें होतें. ते समयीं पागा वगैरे जिमेस करून स्वारी शिकारींत हजर, पुत्रवत् लोभ सर्व गोष्टीनें प्रतिपाल असें चाललें असतां, कान्होजी बोवास पुत्र जाहला. त्याचें नांव रायाजी[२] बोवा भोंसले ठेविलें असतां, रघोजी बोवाकडे ( अनास्था ) दिसों लागली.

**रघूजी शाहूकडे जातोः**—बायकोची वगैरे अनास्था पाहून, रघोजी बोवा उदास होऊन देवगडचे राजे चांद सुलतान यांजकडे रुसोन शंभर स्वारांनिशीं आले. तेव्हां यांनीं सेनासाहेबांचे पुतणे, थोर माणसें जाणोन सन्मान केला. बंदोबस्त करून बहुत खातरजमा केली. "घर तुमचें आहे. येथें असावें" असें झालें. तेथें कांहीं दिवस राहोन वऱ्हाडांत आळजपुरचे[३] सुभे यांजकडेस गेले. ते समयीं त्यानींही कान्होजी, भोंसले यांचे पुतणे मोठे माणसें सबब ठेविले. तेथून साताऱ्यास महाराजांकडेस गेले. तेथें राजेश्रीचा आर्जव व गोविंद[४] खंडेराव चिटणवीस, राजेश्रीचे प्रीतिपात्र, त्यांचे व यांची वडिलावडिली घरोबा असेच. प्रतिनिधीचे येथें श्रीपतराव यास व फत्तेसिंग राजे भोंसले, महाराजांचे लेंकवळे

---

१ रामाबाई ऊर्फ रामाऊ ही कुमठें येथें राहात होती. साताऱ्यास रामाऊचा गोट म्हणून एक पेठ इच्या नांवाची अद्याप आहे. (सं.)

२. प्रथमावृत्तींत रामाजी असें आहे तें चुकीचें आहे.

३. एलिचपूर.

४. गोविंद खंडेराव—हे खंडो बल्लाळ यांचे तिसरे पुत्र. हे व पेशवे एक विचारें वागत असत. हे मोठे हुषार व सुस्वभावसंपन्न होते. का. प्र. इ. साधनें—पु. १ अंक १ पृ. ११–१२ पहा.

त्यांचाही प्रेम विशेष संपादिला. कर्नाटक प्रांतीं फत्तेसिंग[१] राजे भोंसले यांजला राजेश्रींनीं फौज सुद्धां रवाना केलें. त्यांनीं राजेश्रींस विनंति करून रघोजी बोवा भोंसले याजलाही सडेच मागून घेऊन बरोबर नेलें. थोडकासा जमावट्टी होता. तेथें लढाईचे प्रसंगीं कर्नाटक प्रांतीं कामकाज चांगलें केलें; सबब रघोजी भोंसले यांशीं स्नेहभाव, लोभाची वृद्धि अत्यंत, फत्तेसिंग राजे भोंसले करूनच होते. तिकडेस एक वर्ष राहून जागजागीं खंडण्या घेऊन फत्तेसिंग राजे भोंसले यांचा लौकिक तिकडे भारी झाला. मागती फौज सुद्धां फत्तेसिंग राजे भोंसले स्वमुलुकीं आले. तिकडील वृत्तांत अवग्र[२] राजे मशारनिल्हेनीं राजेश्रीस[३] कळविलें त्यांत यांचाही मजकूर सुचविण्यांत आला. कांहीं एक दिवस गुजरले. इतक्यांत राजश्रींस बहुत शौक[४] शिकारीचा छंद होता. तो रघोजी बुवा भोंसले यांणीं बरोबर घोड्यावर बसून एकटे रहात होते. कोणे एके काळीं शिकारीस गेले. तों जंगलांत वाघांनी घाला राजश्रीचे पालखीवर चालून घेतलें. जागा अडचणीची. राजश्रीस आटोपिलें, हें पाहून रघोजी बोवांनी घोड्यावरून उडी टाकिली, आणि पटा चढवून वाघ जिवें मारिला. राजश्री बहुत संतोष पावून अत्यंत लोभ करूं लागले. इकडेस विचार पाहतांना राजश्रींची स्त्री धाकटी राणी आणि रघोजी बोवाची स्त्री सुलाबाई या दोघी चुलत बहिणी. बऱ्हाणजी मोहिते याची बहिण. याप्रमाणें असतां दिवसेंदिवस प्रीतिपात्र झाले.

**कान्होजीवर शाहूची अवकृपाः**—कांहीं एक दिवसांनी राजश्रीस समजलें कीं, कान्होजी भोंसले सोंवळे फार करितात. मराठ्यांचे हातचें जेवीत नाहींत हें पहावें. (असें) मनांत आणून बाळाजी विश्वनाथ पेशवे यांजला दिल्लीस पेशजी पाठविले ते काळीं कान्होजी भोंसले सेनासाहेब सुभा यांजला फौजेसुद्धां येण्याविषयीं लिहिलें असतां, प्रसंगास आले नाहीत. याजकरितां राजश्रींनीं बलावू पाठविलें. यावरून राजदर्शनास कान्होजी भोंसले

---

१. ना. भों. का. लेखांक (१) पहा. 'थोरले शाहू महाराज यांचें चरित्र' पृ. ३७ पहा.

२. समग्र.

३. शाहू महाराज.

४. लेखांक (१) पहा. (ना. भों. का.)

सेनासाहेब सुभा आले. भेटी अंतीं आनंद झाला. त्यानंतर एक दिवशीं राजवाड्यांत जेवावयास कान्होजी बुवास राजश्रीनीं आज्ञा केली. तसेंच रघूजी बुवास आज्ञा दिली. परंतु रघोजी बोवा अनमान न करितां भोजनास गेले. सेना साहेबांनीं अनमान केला. परंतु आक्षेपामुळें राजश्रींचे ताटांत सेनासाहेबांस बसणें प्राप्त झालें. भोजन करून सेनासाहेब आपले बिऱ्हाडीं येऊन बोटें घशांत घालून वमन केलें. हें वर्तमान राजश्रीस बातमीचे द्वारें समजलें. नंतर पेशजी हुकुमास उजूर झाला होता सबब निमित्य ठेवून शिक्के कटार[१] मागावयास कान्होजी भोंसले सेनासाहेबसुभा याजकडेस राजश्रीनीं पाठविलें. यानें आपले मनांत संशय मानिला की, राजश्रीचे मनांत विक्षेप आला त्या अर्थी येथें राहणें ठीक नाहीं. कूच करून निरोप न घेतां दरकूच कान्होजी भोंसले पळून आपले स्वस्थळास आले. तंव राजश्रींची मर्जी खपा होऊन फत्तेसिंग राजे भोंसले व गोविंद खंडेराव चिटणीस यांजला आज्ञा केली कीं, कान्होजी भोंसले यांचें पारिपत्य करावयाची योजना केली पाहिजे. सेनासाहेब सुभा कोणास द्यावा. यावरून उभयतांचें म्हणणें की, " रघुजी बुवा भोंसले हे त्यांचे पुतणे परंतु सरकार चरणीं लक्ष आणि सेवा ही स्वामीची केली आहे. यांजला आज्ञा व्हावी. " यावरून राजश्रींनीं आज्ञा केली जे, " हे अवग्र कुटुब सुद्धां तिकडे गेल्यास हेही तशीच वर्तणूक करतील. सबब समजून सांगावें. याजकरितां सडे फौजसुद्धां जाण्याचें करावें. आणि कुटुंबास राहण्यास दरोबस्त देऊर[२] हा गांव मोकासा देववितों, " याप्रमाणें ठरलें. यावर फत्तेसिग राजे भोंसले व चिटणीस याणीं रघोजी बोवा भोंसले, यांजला बोलावून विचारिलें की, " तुमचे चुलते बेकैदी बेहुकमी गेले याजवरून त्यांचें पारिपत्य करणें जरूर राजश्रीचे मनांत येऊन तुम्हांस पदाधिकारी करितील. " त्यांनी उत्तर केलें कीं, " सर्व स्वामीचा

---

१ शिक्केकटचार ही त्या हुद्याची खूण असल्यामुळें ती मागणें म्हणजे कामावरून काढून टाकणें. कान्होजीस काढण्याचें हें कारण कल्पित दिसतें. (ना. इ. पा. ५६ पहा.) (सं.)

२. हा गांव भोंसल्यांचे विद्यमान वंशज यांजकडे अद्याप चालू आहे. लेखांक (२) टीप १८ पहा. विद्यमान वंशजास " देऊरचे राजे " असाच किताब आहे.

प्रताप करील." यावरून राजश्रींस उभयतांनीं विनंति केली जे, "आज्ञेप्रमाणें सर्व घडेल." तेव्हां जामिनीचा आक्षेप राजश्रीचा दिसला. ते समयीं कोन्हेरराव मुजुमदार[१] समक्ष होते. राजश्री लहानपणीं दूध ज्याचे आईचें प्याले त्याचे जामात कोन्हेरपंत[२] यांणीं विनंति केली "यांस जामीन, सर्व प्रकारें मी हुजुरांत राहतों व भाऊ समागमें देतों. त्यांचीं मुलें माणसें हजर आहेत, त्यांस राहण्यास जागा जवळची असावी. आज्ञा व्हावी." अशी विनंति ऐकून मशारनिल्हेनीं देऊर हा गांव वाई परगण्याचा मुलामाणसांस राहण्यास मोकासा करून दिला व सेनासाहेब यांचे पदास सरंजाम पूर्वेकडील बितपशील सनद एक शके १६४४ चे अखेर साल. ( दिली )

**रघूजीस सनद:**—सनद एक शके ४९ शुभकृतनाम संवत्सरे (२८–२–१७२३) ते सालीं परगणे रीतपूर सरकार गोंवळ, प्रांत वऱ्हाड, व देवगड व चांद प्रांत गोंडवण, मूळतापी प्रांत,वरघांट प्रांत, व छत्तीसगड प्रांत, बस्तर प्रांत, मकसुदाबाद प्रांत, पटणें, इलाहाबाद तारीख फाल्गुन शुद्ध ५ चौथ मोकाशास सनदा करून दिल्या. तपशील लावणें असे.

---

# भाग २ रा

# पहिला रघूजी याची कारकीर्द

**साताऱ्यास तयारी:**—सदहू प्रमाणें सनद एक याशिवाय मौजे देऊर प्रांत वाई येथें रघूजी बोवा भोंसले यांचे कुटुंबास राहण्यास जागा नेमून दिली. व बजिन्नस सनद पुढें कांहीं एक दिवसांनीं (इं. २२–११–१७३३) राजशक ६० करून दिली. वर्ष दोन वर्षांनीं हुजुरांत येत असावें, असें ठरलें. याच्या आगाऊ परसोजी भोंसले यांजला सेनासाहेब सुभा जाहला त्या वेळेस साबाजी इत्यादि मुधोजी भोंसले यांलाही चार गांव कऱ्हाड प्रांतीचे व चार

१. लेखांक (२) पृ. ७–८ पहा. ना. भों. का.
२. कोन्हेरराव हे विठ्ठल कान्हो ठोसर यांचे जामात.

गांव वाई देश प्रांतीचे व दीड चाहूर जमीन पांडववाडीस, याप्रमाणें इनामपत्र मशारनिल्हेचे नांवें करून दिलें असतां साबाजी भोंसले यांची स्त्री रामाबाई आवा इनें वहिवाट करून होती, ते रघूजी भोंसले प्रसंगीं होते त्यांचे लक्षांत होती. याअन्वयें यानींही सेनासाहेब सुभ्याचा अधिकार प्राप्त झालेवर अनुभव घेतला व सरकार मुत्सद्दी बरोबर नेमिले. निश्चय झाला. सरकार नजर वगैरे याजकरितां सावकार रघुनाथभट[१] झिपरे पटवर्धन यांचा व कान्होजी भोंसले याचा देण्याचा पेंच होता. यास वैमनस्य. तेव्हां कोन्हेरपंत याजवळ जाऊन स्वज्ञातीय झिपरे इसम जाणून त्यास जामीन झाले. सर्व प्रकारें आम्ही हमीदार आहों. यांचे उपाध्ये आम्ही व कारभारीही आम्ही. यांचा आमचा विचार दुसरा नाहीं. यांचे वडिलांपासून एक स्थळीं राहणें. सर्व प्रकारें राजश्रीपाशीं जामिनी भरली. त्यांणीं कृपावंत होऊन यश दिलें. असें आपण कृपा करून उभारणी करून दिली. याजवरून पटवर्धन यांणी भरपाईकी लाख रुपयांची करून दिली. व लाख रुपये यशवंतराव पोतनीस यांनीं नगदी दिले. मुलकी खजिना येईल तो भरपाई करणेंत येईल. याप्रमाणें ठरवून सरकार खातरजमा करून देवविली. मग सेनासाहेबांचीं वस्त्रें जरी-मंदील व जरी-चादर बहुमान वगैरे देऊन बिदा केले. यांच्या बरोबर राजमंडळापैकीं[२] मंडळी पाठविली ती येणेंप्रमाणें—

**बरोबरची मंडळीः—**

१. कोन्हेर राम मुजुमदार आपले तर्फेनें राजानें दिलेला दिवाण (कोल्हटकर).

१. रखमाजी[३] गणेश परभू चिटणीस, गोविंद खंडेराव चिटणीस यांचे मामे भाऊ, यांचे स्थळीं वहिवाट गंगाधरराव[४] माधव चिटणीस हे हजर आहेत.

---

१. लेखांक (१) टीप ११ व लेखांक (२) पृ. ९ ओळ ६ पहा.

२ राजमंडळ—साताऱ्यास खुद्द छत्रपतीच्या परिवारांतील मंडळीस राजमंडळ असें म्हणत. (सं.)

३. रखमाजी गणेश यांचा व यांचे कुळाचा इतिहास 'कायस्थ प्रभूंच्या इतिहासाचीं साधनें' या मासिक पुस्तकाच्या पहिल्या वर्षाच्या ५ व्या अंकांत दिला आहे.

४. प्रस्तुत बखर पृष्ठ १ पहा.

१. गोविंदराव खंडेराव चिटणविसानें रखमाजी गणेश यांचे तैनातीस लिहिण्याचे कामीं नरसिंगराव चिमाजी प्रभु दिले याचे पुत्र दोघे आहेत व नातू एक.

१. भास्कर राम यांजकडे फौजेचे कामीं वहिवाट करावी. यांचे वंशापैकीं रामचंद्र काशी हल्लीं हजर आहेत. ( कोल्हटकर ).

१. यशवंतराव पोतनीस राजाचे यांजकडील शंकराजी रखमाजी पोतनीस व जामदारखाना व कोठीचें काम सांगितलें. यांचे वंशीं खंडो भगवंत चिटणविसीचे इलाख्यांत हजर आहेत.

१. महादजीपंत प्रभु फडणवीस आप्पा बळवंत यांचे तर्फेनें त्यांचे वंशस्थ.

१. व्यंकाजीपंत व राघोपंत बक्षी, कडेबाळीकर यांचे वंशस्थ भाऊबंद, गोपाळ भगवंत व व्यंकटराव भगवंत आहेत. त्यांचे मुतालिक अवधूतपंत हुशंगाबादेचे पलीकडेस नर्मदा उतरून घाटावर तोफखाना ठेऊन, जानोजी भोंसले पुढें माळव्यांत नानासाहेब पेशवे यांचे भेटीस गेले. पाठीमागें भोपाळकरांनी तोफखान्यावर गर्दी करून डोकीं कापलीं. त्यांचे पुतणे नातु वगैरे हल्लीं बक्षीगिरीवर आहेत. (ऋ. दे. ब्रा.)

१. रघुनाथ भट झिपरे यांचे तर्फेचे शिक्केनवीस अनंतभट चितळे यांचे वंशज.

१. वेदमूर्ति विश्वंभर वैद्य हे गोविंद खंडेराव चिटणीस याजकडील रखमाजी गणेश चिटणविस याजबरोबर येथील संस्थानांत आले. त्यांचे पुत्र दादा वैद्य, त्यांचे चिरंजीव विश्वंभर वैद्य हजर आहेत. (को. ब्रा.)

९.

याशिवाय सोयरे व मानकरी व मुत्सद्दी राजमंडळाकडील आले, त्यांचीं नांवें पृथक् पृथक् लिहिलीं असतां विस्तार फार होईल. याजकरितां लिहिलीं नाहींत. परंतु त्यांचे वंशज कोणी कोणी आहेत.

## सरदार मंडळीपैकीं तपशील

१. तुळजोराम, यमाजी शिवदेव प्रतिनिधीचे कारभारी, त्यांचे तर्फेचे यांचे वंशज. ( ब्रा. )

१. बाबाजी घाडगे जुंझारराव.

१. संभाजी शिरके. जानोजी भोंसले यांचे मामा. यांचे वंशज गुणाजी शिरके हजर आहेत.

१. जानराव गुजर, शिदोजी गुजराचे तीर्थरूप.

१. नरशिंगराव बुवाजी परभु यांचे चुलत बंधु, काशीराव लक्ष्मण हे गडवारीस गोसाव्यांचे लढाईत मारले गेले. यांचे पुत्र व्यंकटराव व लक्ष्मणराव व महिपतराव काशी. त्यांजपैकीं व्यंकटराव यांचे पुत्र जगजीवनराव व्यंकटेश, व लक्ष्मणराव यांचे पुत्र जीवनराव लक्ष्मण व महीपतराव काशी हे संबळपुरचे मोरच्यावर गोळी लागून मारले गेले. त्यांचे पुत्र, सखाराम महिपत व कृष्णराव महिपत व शिवराम महिपत हे हजर आहेत.

१. नरोजी जाचक यांचे वंशज त्याचे नातू मल्हारराव, जोत्याजीराव व नरोजी जाचक हजर आहेत. ( मराठे ).

१. गिरमाजी खंडेराव यांचे--

१. शिवाजी केशव टाळकुटे यांची नकल जाली. हल्ली त्याची सून हजर आहे. (ब्रा.)

१. बिंबाजी वांजाळ. (म.)

१. आनंदराव वाघ यांचे वंशज हजर आहेत. (म.)

१. रघोजी करांडे (म.)

१. दिनकर विनायक व शिवाजी विनायक व उमाजी विनायक. दिनकर विनायकाचे पुत्र महिपतराव दिनकर, व महिपतराव दिनकराचे पुत्र बळवंतराव महिपत. व शिवाजी विनायकाचे नकल जाले. व उमाजी विनायकाचे पुत्र बाळनाथ उमाजी व बळवंतराव महिपत हजर आहेत. (प्रभु)

१. त्रिंबकजी गव्हाणे. (म.)

१. त्रिंबकराव कान्हो राजमंडळांत बुऱ्हाणजी मोहिते यांचे पुतणे. मानशिंगराव मोहिते याजला सोयरीक प्रकरणावरून रघोजी बोवांनीं आणविलें, त्यांचे वंशज गोविंदराव त्रिंबक व नारायणराव यशवंत हजर आहेत. (म.)

**रघूजीची कान्होजीवर स्वारी**:—याप्रमाणें साताऱ्याहून रघूजी भोंसले सेनासाहेब सुभा जमावानिशीं घांटावर जालन्याचे मैदानांत आले. तंव आटोळे[१] समशेर बहादुर मातबर सरदार मार्गांत आडवे जाले जे, "आम्ही आपले मुलखांतून जाऊं देणार नाही, मुलूख खराब होतो. तुमची वाट नांदेड वसमतीचे मार्गें सेनासाहेब सुभा यांची जुनी आष्टी तिकडून जाणें." तेव्हां अडचण पडली. याजवरून दिनकर विनायक व शिवाजी विनायक यांचे चुलत बंधु यशवंतराव पिलाजी परभू हे आटोळ्याचे दिवाण राजमंत्री कारभारी होते त्यांशीं संधान करून सरकारचें ताकीदपत्रें महाराज राजश्रींचे आटोळे यांचे नांवें होतीं, त्यास देऊन समशेर बहाद्दरांचा भाऊपणा ठरवून भेटी झाल्याबरोबर हरवळीस चार हजार फौजेनिशी कृष्णाजी आटोळे, समशेर बहादुरांकडून समागमें घेऊन पुढें चालले. सेनासाहेब लाखण-वाड्याचा घाट उतरून बाळापुरचे मुमारास आले. कांहीं फौज तेथें ठेऊन तीस हजार फौजेनिशीं वऱ्हाड प्रांतीं खंडण्या घेण्याचें सुरू केलें. तेव्हां कान्होजी भोंसले भांब[२] येथें मोगलाई आश्रा करून होते. ते समयीं बाबा साहेबाची फौज आली, म्हणून तेथून निघोन वशिष्टेचे[३] आलीकडे आले. त्याचे मागें बाबा साहेबांनी फौजेसहित पिछा करून वणी[४] जवळ आटोपिलें. सरकार इतराजीमुळें कान्होजी बुवाची फौज ताराज होऊन अफरातफर झाली. थोडासा जमाव होता त्याजला फौजेनें वेढा घालून बावा साहेबां समोर येऊन उभे राहिले. आणि खुरनिस केली. पालखींत बसावें म्हणोन विनंति केली. त्या समयीं त्याजला मनस्वी बोलूं लागले. तेव्हां त्यांजला धरून कैद केलें. तसेंच घेऊन वऱ्हाडांत आले. व राजूरची छावणी मुकरर केली. तें मकाण वाऱ्हाटी जवळ आहे. बंदोबस्त करण्यास सहा वर्षे लागलीं. आकोलें येथें अलजपूरचे सुभ्याकडील मातबर सरदार

---

१. आटोळे सरदारानें अडविलें तेव्हां रखमाजी गणेश यांचा रघोजीस पुष्कळ उपयोग झाला.

२. भाम—हा गांव वऱ्हाडांत यवतमाळ शहरापासून सुमारें ८–९ कोस आहे. लेखांक १ ला टीप ७ पाहा.

३. वशिष्ठा—वर्धा.

४. सन १७३० मध्यें वणी तालुक्यांत पकडलें. ले. १ ला टीप १०

पठाण नामें सुजायतखान होता त्याजला त्यास जोरतलबी अमलाकरितां, ब्राह्मणावरून खिस्सा होऊन लढाई झाली. पठाणाची सिकस्ती होऊन त्याची नोबद पाडाव करून आणिली. ती हल्लीं सरकारांत आहे. असें जागजागी दोन तीन लढाया आणखी झाल्या.

**देवगडचें राजकारणः**—तंव देवगडकर राजे चांद सुलतान[१] याचा इतिकाल होऊन त्याचे पुत्र वडील मीर बहादर व राजे अखबरशाहा व बुराणशाहा खांसे व राखीचा वालीशाहा यांचा कलह आपसांत उभा राहून अखबरशाहा व बुराणशाहाचे वडील बंधु मीर बहादरशाहा याजला वालीशाहांनीं जिवें मारिलें. याजवरून रतनकुवर राणी उभयतांची मातोश्री इजला बहुत दुःख होऊन पत्रें सेनासाहेबांकडे पाठविली. संवत १७९३ चे सालीं शके १६५८ वशिष्ठा उतरून फौजेसहित जमावानिशीं रघूजी भोंसले सेनासाहेब सुभा केलझरचे सुमारें राणीचे पत्राअन्वयें येऊन परस्पर पवनी[२] येथें जाऊन लढाई करून ठाणें घेऊन तेथें तुळजोरामपंत याजला फौज थोडकीशी देऊन ठेविलें.

**संतांचा आशीर्वादः**—( पुढे ) सेनासाहेब फौजेसहित आपण भंडाऱ्यास येऊन देवबावा[३] संत याचें दर्शन घेऊन पायांवर डोई ठेवून, रामदास स्वामीचे सांप्रदायी शिवाजी महाराजांस अनुग्रह त्यांचा, या अर्थें जाणोन नंतर प्रसाद मागितला. आणि संतबावाचे खांद्यावरील धोकटी[४] होती ती आपले खांद्यावर घेऊन त्यांतील अन्न घेऊन प्रसाद भक्षिला. आणि पुढें गोंडावर कमरबाही करून नंतर पिराशा बोवाचें दर्शन घेऊन दुवा घेऊन भानोरें[५] येथें मोरचे बसविले.

**देवगडावर स्वारी** इ. स. १७३६:—हें वर्तमान देवगडास वालीशा राजे याजला समजलें. तेव्हां त्यांनीं आपला दिवाण रघुनाथसिंग नामें होता त्याजला समागमें फौज देऊन सेनासाहेबांचे मोकाबल्यास पाठविलें.

---

१. लेखांक २ टीप ३० पहा.
२. लेखांक ३ टीप २९ पहा.
३. काण्वशाखी ब्राह्मण. वंशज भंडाऱ्यास देवघरे म्हणून आहेत. (सं.)
४. धोकटी—झोळी.
५. भानार—भानोरें—भन्डारा.

तो दर मजल येऊन पोहोंचले, ते समयीं रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा यांचे फौजेचा मुक्काम, मौजे शिरसघांट परगणे भानार गंगापार येथें होता; तशांत दिवाण मजकूर जमावानिशीं आले. लढाईचा नक्षा उभा राहिला. ते समयीं सेनासाहेबांनीं करांडे यांशीं सल्ला करून कांहीं जमाव सोनबरडीचे सुमारें ठेवून, व कांहीं जमाव गिरोली परगणे भानार येथें ठेविले. व दोहीं बाजूंस आपली फौज करून मध्यंतरीं रघुनार्थसिंग दिवाणाचा जमाव घेरून सेनासाहेबांनीं पळ काढिला. गोंड हावभरी होऊन मागें लागले ते समयीं डोह नदीचा आडवा होता त्या ठिकाणीं मिरनगर सोनबरडी पावेतों एकच डोह होता त्या जाग्यावर लढाई उभयतां फौजेशीं चांगली झाली, त्या काळीं रघुनार्थसिंगाची शिकस्ती होऊन दिवाणाकडील बहुत लोक मारले गेले. त्या प्रसंगीं रघुनार्थसिंग जखमी होऊन खेतास राहिले. वरकड त्याची जमात त्या ठिकाणीं डोहांत बुडाली आणि सेनासाहेबांनीं दिवाणास उचलून आणून त्याच्या जखमाच्या मरामती करविल्या आणि त्याजला फितुरांत घेऊन त्याशीं स्नेहभाव केला. आणि सांगितलें कीं, "वालिशास हस्तगत करून दिल्यास तुझें चालवूं." याप्रमाणें त्याणेंही कबूल केलें. यावर त्याजला देवगडास रवाना केलें व आपण भानार येथें मोरचे बसवून लढाई सुरू केली. त्या काळीं किल्ल्यांत भानाऱ्याचे हरी पाटील किल्लेदार होता यानें बावीस दिवस किल्ला लढविला. शेवटीं फितुरांनीं सेनासाहेबाकडील सरदार रघूजी करांडे यांणीं त्या पाटलास धरून आणिलें. त्या वेळेस सेनासाहेबांनीं आज्ञा केली की, "यांजला जिवें मारावें." त्यावरून करांडे मजकूर यानीं त्याजविषयीं विनंति करून पाटलाचा प्राण वांचविला. आणि भानार येथील किल्ला हस्तगत करून ठाणें बसविलें.

तेथून कूच करून रामक्षेत्रास[१] फौजेसुद्धां आले. तेथें आंब कुंडावर

१ रामटेंक ह्या क्षेत्राची फार ख्याति आहे. ह्याच्या आसपास उत्तम विड्याचीं पानें होतात. येथें पहाडाचे माथ्यावर रामाचें प्रख्यात देवालय आहे. कार्तिकी पौर्णिमेस येथें मोठी यात्रा भरते. देवस्थानाचें उत्पन्न भोंसले राजानीं दिलेलें मोठें आहे व देवस्थानाचा कारभार पाहण्यासाठीं एक कमेटी आहे. देवगिरीच्या यादव राजांचा वेळचा एक कोरीव लेख तेथें आहे. त्यावरून तेव्हापासून हें क्षेत्र अस्तित्वांत होतें. (सं)

स्नान करून नवस केला जे "आमची कार्यसिद्धि झाल्यास गडावर रामचंद्र-जीची स्थापना करून जागा ब्राह्मणास अग्रहार[1] धर्मादाय देऊं." असा निश्चय करून निघाले.

तसेच फौजेसहित देवगडास गेले. तेथें किल्ल्यांत वालीशा होता. ते प्रसंगीं दिवाणांनी वालीशास सांगून पाठविलें कीं, "आपण किल्ल्या बाहेर यावें, बंदोबस्त आम्हीं चांगला केला आहे." याजवरून ते बाहेर आले तसेच सेनासाहेबांनीं आपले फौजेचा वेढा त्याचे जमावासि घालून वालीशास धरून कैद केलें. तसेच तेथून रतनकुंवर राणीची भेट घेतली. अकबरशा व बुराणशा राजे यांच्याही भेटी झाल्या. बोलणीं करारमदाराचीं झालीं. त्यासुद्धां रघोजी भोंसले सेनासाहेब यांणी राणी सुद्धां उभयतां बंधु राजे यांजला घेऊन नागपुरास आले.

**खेमनसिंग**:—तशांत वर्तमान समजलें कीं, ब्रह्मपुरीवाले[2] यांनी कांही जमाव पवनीचे सुमारास पाठवून वाटा मारितात. ही बातमी कळतांच रघूजी करांडे याजला पुढें फौज देऊन ब्रह्मपुरीस पाठविलें. मागाहून आपण ही कांही फौज नागपुरीं ठेवून ब्रह्मपुरीस गेले. तेथें किल्यांत खेमनसिंग जमादार व आभीराय नामें दोघे भाऊ जमायतीनिशी होते. त्यांनीं बारा दिवस किल्ला भांडविला. शेवटीं हल्ला लढाई करून सेनासाहेबांनीं व त्यांचे सरदारांनी किल्ला हस्तगत केला. जे वेळेस करांडे खेमनसिंगास धरून आणिलें ते वेळेस सेनासाहेबांनीं आज्ञा केली कीं "याजला जिवें मारावें." ते वेळेस करांडे यांणीं विनंति केली की "ऐसा जवामर्द मनुष्य मारणें सल्ला नाहीं. त्यांचे हातून पुढें लॅांझीचा[3] उद्योग करणें जरूर आहे. यास्तव याजवर सर्फराजी करावी. व भानोरे येथील किल्लेदारी याजकडे द्यावी." याजप्रमाणें बोलून माफ करविलें.

सेनासाहेबांनीं तेथील ठाणें वसवून फौजेसुद्धां कूच करून भानाऱ्यास

---

१. अग्रहार-अग्राहार जमीन, ग्राम, इत्यादि दान.

२. ब्रह्मपुरी हें शहर चंद्रपुराच्या ईशान्येस ४० कोसांवर आहे.

३. लांजी हा गांव बालाघाट जिल्हयांत भंडाऱ्यापासून ५०, कोसांवर आहे. हें शहर गोंड लोकांचें वसतिस्थान होतें.

आले. त्या प्रसंगीं भानारे येथील विचार पाहिला तर हरी पाटील याचा डौल बदलीचा[१] दिसूं लागला. हें चांगलें नाहीं याजकरितां खेमनसिंग जमादार याजला किल्लेदारी भानार येथील देऊन सेनासाहेब नागपुरास गेले. तेव्हां त्या संधींत अकबरशाहा पळून एलिचपुरास असफजाहाकडेस जाऊन राहिले होते. रतनकुवर राणीचें बोलणें रघोजी भोंसले यांसी पडलें कीं, "दोघे पुत्र माझे आहेत, तिसरे तुम्ही आहांत. तीन हिस्से आमचे राज्याचे करावेत.[२]" याप्रमाणें नेम ठरवून एक हिस्सा गोंडवण प्रांताचा, त्यांत किल्ले पवनी व मारूड व मूळतापी वरघाट हे खांसाहेबांस त्यांनीं आपले संतोषानें दिले. संवत १७९४ शके १६५९ फसली सन ११४५* चे साली करार मदार लिहून खेरिज खंडणी दहा लक्ष रुपये नगदी स्वारीखर्च दिला.

**रघूजीचें स्वभाववर्णन**:—रघूजी बोवा शिपाई दोस्त एक पैसा जवळ न ठेवितां तमाम फौजेस खर्चास देऊन फौजेस रजावंतीनें ठेवीत होते. व अडचणीचे प्रसंगास कोणासही शब्द टाकिल्यास माघारे घेत नव्हता. व कूचमुक्काम कोणासहि कळवूं नये. हरवक्त म्हणत असावें. "जे राम करील तें खरें." जवामर्दी जातीनी करावी. ऐषआराम बिलकूल नाही. घोड्यावरच भाकर खावी. याप्रमाणें चाल धारणा सेनासाहेब ठेवून होते.

**शाहूकडून रघूजीस सनदा**:—वाटणीचा बंदोबस्त होऊन आपणास जागा छावणीस नागपुर नेमस्त करून पुढें छत्तीसगड बंगाला येथें तुळजोराम याजला फौजेसुद्धां रवाना करावें हा बेत होता. तो राहून तुळजोपंतास गोंडवण प्रांतीं ठेविलें. आणि आपण वऱ्हाड प्रांतीं जाऊन तसेंच साताऱ्यास जाऊन राजदर्शन घेतलें. राजश्रीस[३] बहुत संतोष झाला. महाराज कृपावंत होऊन शके १६६० अरबी सन ११३९ चे साली सनदा दिल्या:—

१. सनद एक खास–दस्तुर फौजेचे बेगमीबद्दल दिले. सुभे आठ बितपसील.

१ सुभा लखनौ. १ सुभा बेदर.

---

१. फितुरीचा.
२. छत्रसाल व पहिला बाजीराव यासारखाच हा प्रकार.
३. शाहू महाराज. * फसली ११४७ पाहिजे.

| | |
|---|---|
| १ सुभा मकसुदाबाद.[१] | १ सुभा ढाका बंगाला. |
| १ सुभा बितीयाचा. | १ सुभा इलहाबाद. |
| १ सुभा बुंदेलखंड. | १ सुभा हाजीपुर पटणे[२] |
| ४ | ४ |

८

येणेप्रमाणें करून दिलें. सुरुसनतिसा सलासीन मयातैन अलफ.

१ चौथ मोकाशाच्या सनदा करून दिल्या.

| | |
|---|---|
| १ प्रांत देवगड. | १ प्रांत वैरागड. |
| १ प्रांत गढ. | १ प्रांत चांद दरोबस्त. |
| २ | २ |

४

सदर्हूप्रमाणें लिहिलें.

**कर्नाटकावर स्वारी** इ. स. १७४०:—येणेंप्रमाणें देऊन सरकारचा हुकूम झाला कीं, "चंदीचंदावरास फत्तेसिंग[३] राजे भोंसले याची रवानगी आहे त्या समागमें हमराह होऊन फौजेसुद्धां जाऊन सरकारचे भाऊबंद आहेत त्यांजला चंदा साहेबाचा[४] उपद्रव होऊन परागंदा झाले. याजकरितां शत्रूचें पारिपत्य घडावें." सरकार आज्ञा शिरसावंद्य करून चंदावरास[५] जाण्याकरितां वऱ्हाडास आले ते वेळेस देवगड प्रांती येऊन फौजेचा बंदोबस्त तुळजोराम यांजकडेस नेमिला. महाली मुलकी देवगडची फडनविसीचें काम गोपाळ रघुनाथ यांजकडेस सांगितलें. व छत्रवाले विश्वनाथ कोन्हेर व कारभारी बगूजी बाबूजी जोशी पवनीकर असे नेमस्त करून आपण नांदेड वसमतीकडून हैदराबादचे जिल्ह्यांतून चालले. समागमें फौजेपावेतों सरदार रघूजी करांडे व कृष्णाजी आटोळे व नऱ्होजी जाचक व शिवाजी केशव टाळकुटे यासहित सन ११५१ फसलीचे सालीं चंदावरास फत्तेसिंग राजे

१. पाटणा.
२. ओरिसामधील एक लहान संस्थान.
३. लेखांक १ ला पृ. ३ ओळ ३–४ पहा.
४. दोस्त अल्लीचा जांवई.
५. तंजावर. ना. इ. पान ८० पहा.

भोंसले यांजला सामील झाले. जागजागीं खंडण्या घेऊन चंदासाहेबांचे फौजेशी लढाया मातबर घेण्यांत आल्या. तिकडील फौजेची शिकस्त आपलेकडील फत्ते होऊन चंदासाहेबास धरून कैद केलें. फौजेंत लूटही मनस्वी आली. चांगली जागा हस्तगत करून राजश्रीचे भाऊबंद परागंदा झाले होते ते आपले स्वस्थळास स्थापित केले आणि जागजागीं खंडण्या घेऊन चंदावरच्या नौबती दोन पाडाव आणिल्या. एक सरकारांत आली ती सांप्रत सरकारांत सेनासाहेबाचे वाजत आहे व दुसरी कृष्णाजी आटोळे, समशेर बहादराकडील त्यांचे येथें आहे. दोन वर्षे स्वारीस लागलीं.

**बाजीराव व छत्रसाल**:—बाळाजी विश्वनाथ पेशवे दिल्लीहून सातान्यास आले, नंतर काल[१] जाहला. याजवर पेशवाईचीं वस्त्रें मशारनिल्हेचे चिरंजीव बाजीराव बल्लाळ याजला देऊन हिंदुस्थानांत रवाना केलें. गुजराथेचे मार्गे फौजेसहित हिदुस्थानांत माघारे येतांना बडोदे प्रांतीं जागजागीं बंदोबस्त करून येत असां त्र्यंबकराव[२] दाभाडे सेनापति यांचे पदरीं, पिलाजी गायकवाड त्याचे पुत्र दमाजी[3] गायकवाड होते. तेव्हां दाभाडे वाट देईनात. त्या प्रसंगीं लढाईत दाभाडे मेले व गायकवाड पंत प्रधानाशी भेटले. यास्तव गुजराथचा सुभा त्यांजला दिला व दाभाडे यांचीं मुलें माणसें धरून कैद केलीं व पुढें दरकूच जाऊन हिंदुस्थानांत चालले. तंव महंमदखान[४] बगश व झरणेपरणेवाले[५] बुंदेले यांशीं लढाई होत होती. तेव्हां बुंदेले, झरणेपरणेवाले यांनी बाजीराव बल्लाळ पेशवे यांजला पत्र पाठवून आणविले. बंगशाचें पारिपत्य करून बुंदेले यांनीं बाजीराव बल्लाळ पेशवे यांजपाशी सख्यत्व करून झांशी, सागर, देववाही, कालपी वगैरे प्रांत, गढ तिसां लक्षांचा सरकारांत पंत प्रधानाचे विद्यमानें दिला. करार करून बाजीराव पेशवे यांजला मस्तानी कंचनी त्यांनीं दिली. बहुतसें द्रव्यही देऊन रवाना केलें ते सातान्यास जाऊं लागले. पुढें नर्मदा नदीच्या किनान्यास बाजी-

१. शके १६४१ त आश्विन मासी काळ झाला.
२. खंडेराव दाभाडयांचा पुत्र. पेशव्यांची बखर पृ. ४७ टीप ५९
३. पेशव्यांची बखर पृ. ४७–४८ पहा.
४. हा अलाहाबादेचा सुभेदार. पेशव्यांची बखर पृ. ३५।३६ पहा.
५. छत्रसाल. ही गोष्ट इ. स. १७२९ मध्यें झाली.

रावाचा काळ[1] ओंकार[2] मानधात्यावर झाला. त्यांचे पुत्र बाळाजी बाजीराव फौज समेटून सातान्यास गेले.[3] कच्चें वर्तमान झाडून अवघ्र, निवेदन केले. राजश्रींनीं संतोष पावून बाळाजी बाजीराव यांजला पंत प्रधानाचीं वस्त्रें देऊन मागती हिंदुस्थानांत रवाना केलें.

नंतर रघोजी भोंसले चंदासाहेबांसह सातान्यास राजदर्शनास गेले. चंदासाहेब यांजला हुजूर पोंहचवून झालें वर्तमान राजश्रीस निवेदन केलें. चंदासाहेबास धरून आणिलें आणि भाऊबंद स्थळास कायम केले हें ऐकून राजश्रींनीं बहुत खुषी मानून सेनासाहेबास बहुमान वस्त्रें देऊन गौरव केला. त्या प्रसंगीं सरकारांत विनंति केली की, " राणोजी भोंसले, सताजी भोंसले यांचे भाऊ व कान्होजी भोंसले येथें आहेत यांजविषयी परवानगी दिल्यास घेऊन जाईन. आणिकही भाऊबंद आहेत याजवर कृपावंत होऊन परवानगी व्हावी." याजवरून आज्ञा झाली. त्यावरून कान्होजी भोंसले यांजला समागमें घेतलें व राणोजी भोंसले याजला सरकारची सनद संताजी भोंसले दिल्लींत कामास आल्यावर त्रेचाळीस महालांची करून दिली होती व सेनासाहेबांकडून सत्तावीस महाल सेनासुभापैकी राणोजी भोंसले यांजकडे ठेविले. त्रेचाळीस महालांपैकी काली-भीत मलाड हे सरकार हंडिया प्रांत खानदेश येथील राणोजी भोंसले यांचे नांवें करून दिले होते त्यांसहित त्यांजला देऊन गोंडवण प्रांतीं येण्याचा निश्चय केला; आणि सरकारची आज्ञा घेऊन निघोन आले.

**रघूजीच्या बंगाल्यावर स्वाऱ्या**:—नंतर रघोजी भोंसले सेनासाहेबसुभा यांनी फौजेची तयारी करून फसली सन ११५५ साली बंगाऱ्यांत जाण्याचा निश्चय केला. सातान्याहून येते वेळेस राजेश्रींनीं प्रसन्न होऊन सरदेशमुखीचे बाबदीची व मोकाशाची गोंडवणझाडी तहत कटक याची माफी करून दिली. तेथून नागपूर व देवगड प्रांतीं येऊन राहिले, तरी बुन्हाणशाह व अकबरशाह यांचा आपसांत खिसा होऊन अकबरशाह

१. पेशव्यांची बखर पृ. ५४ पहा. बाजीराव इ. स. १७४० मध्यें वारला. वरील हकीकतींत काळाची असंगति आहे. (सं.)

२. ओंकार मांधात्यापासून जवळच रावेरखेडी ( जि. नेमाड ) येथें नर्मदेच्या कांठीं वृंदावन आहे. तेथें अलीकडे उत्सव होत असतो. ( सं. )

३. थोरले शाहू महाराज यांचें चरित्र पृ. ८१ पहा. बाजीरावाचे मृत्यूचे वेळीं बाळाजी हजर नव्हता. वरील माहिती चुकीची आहे. (सं.)

निघोन वराडांत असफजहाकडे गेले होते तेथें सेनासाहेबांनी त्याचे बबर्ची-खानेवाल्यास इषारा करून खाण्यांत जहर घालून दगा करविला याजमुळ तो दगा होऊन मृत्यु पावला, सबब त्याजपैकीं हिस्सा होता तो रघोजीबोवांस संतोषांनी बुऱ्हाणशा राजे यांनीं संवत् १७९९ चे सालीं दिला.

बंगाल्यांत स्वारी ( करण्यासाठी ) सन ११५३ चे साली भास्कर[१] राम यांची रवानगी करून दिली. समागमें तीस हजार फौज दिली. त्यांनी जाऊन रतनपूर प्रांत छत्तीसगड चालते स्वारींनी लढाई करून किल्ला घेतला. लोक फार जाया जखमी झाले. रघुनाथसिंग राजे यांजला स्थापित केलें. त्यांनीं आपले तर्फेनीं कल्याणगीर गोसाई त्या कामीं ठेविले. नंतर बंगाल्यांत भास्करपंत गेले तिकडे उपद्रव भारी देऊन प्रांत लूटून टाकिला. मुलूख ताराज करून माघारे नागपुरास आले. त्या उपरी रघोजीबोवा साहेबांनीं तयारी करून निघाले. समागमें भास्करराम, व गिरमाजी खंडेराव, नरोजी जाचक, रघोजी करांडे, मोहनसिंग सरकारचे लेंकवळे, मीर हबिब नांवें, सरदार मकसुदाबाद प्रांताचा आला होता तो, व तमाम मऱ्हाठे मंडळी आदी-करून बरोबर घेतले. थोडेसे जमावानिशी तुळजोराम याजला गोंडवणचे बंदोबस्तास ठेविलें आणि आपणही बरोबर चंद्रपुराकडे गेले.

गणेशराव ठाकूर पासवान खिजमतगार कारभारी होते त्यांनी प्राचीन दिवाण तिमाजी सखदेव दूर करून महादेव वैद्य केले. ते कांहीं एक दिवस तेथें कारभार करीत होते. त्यांजवर दंगा भारी करून पठान मिळोन त्यांचे घरावर चालून गेले. हें पासवान यांनीं पाहून महादेव वैद्य झरपटींत[२] गेले. तेथें मारले गेले. असा अविवेकी कारभार पाहून तिमाजी सखदेव बाबा-साहेबाकडे मिळोन बाबासाहेबांनी त्यांजवर प्रेम करून फितुराचे पोटी किल्ला चंद्रपूरचा घेतला. निळकंठशहा राजे, चांद्याचे, बाबासाहेबांस येऊन भेटले. तह करून देवगडवाल्याप्रमाणें घरोबा राहून बालेकिल्ल्यांत महालांत ठेविलें. लाल दरवाजा बालेकिल्ल्याचा त्याजवर अवरंगाबादकर नबाब, असफजाचे बबरचीखान्यावर दरोगे, त्यांशी फितुर बाबासाहेबीं करून अकबरशाहा देवगडकर राजे नबाबाकडे गेले होते त्यांचे खान्यांत जहर घालून मारलें.

---

१. लेखांक २ पृ. ९ ओळ ३–४ पहा.

२. झरपट—एक नदी. चंद्रपुराजवळ. तिच्या कांठचा प्रदेश.

हे कर्म दरोगे याचें नबाबास समजल्यावरून तेथून दरोगे निघून इकडे आले. त्यांस बाबासाहेबीं भांदक जाहागीर दिलें. चंद्रपुरापासून १२ कोसांवर आहे. बारा हजारांचा परगणा झुटी सनद करून दिली. वंशपरंपरेने चालेल असें करून देऊन चंद्रपूरची किल्लेदारी दिली. लालदरवाज्यावर बालेकिल्ल्यावर ठेविले. शिवाजी केशव टाळकुटे यांस ४ हजार फौजेनिशी किल्ला शहर–पन्हयांत घुटाळे तळयावर छावणी करून होते. असा, बंदोबस्त राहून बाबासाहेब निघोन बंगाल्याकडे गेले. रतनपुरी मोहनसिंग भोंसले यांजला स्थापित केलें आणि आपण पुढें जाऊन भास्करपंत यांजला बंगाल्याचे सरहद्दीत मेदिनीपुरावर ठेवून आपण मकसुदाबादीं जाऊन मोठा उपद्रव ( करून ) मुलखाची तसनसी करून जगत्‌शेटाची कोठी लुटली व अल्लाविर्दीखान मोहबतजंग यांस तीन क्रोड रुपये मागितले. त्या प्रसंगी नबाब अल्लाबिर्दीखान मोहबतसिंग यांजला दुसरेकडील शह होता सबब कार्य होऊन, याशी वकिलाचे हातीं जादीकडील दिवस घेतले. पुढें त्याची मुसकिलीची मसलत आटोपली.

यानंतर नबाब अल्लाबिर्दीखान मोहबतजंग यांनी आपले जागी मसलत केली कीं, "हिंदुस्थानांतून बाळाजी बाजीराव पेशवे, संवत् १८०० साली गढे मंडळयाचे सुमारें येऊन लढाई करून मंडळयांत[1] ठाणें बसवून पुढें गयेचे सुमारें आले आहेत, त्यांशीं संधान करून आपण पारपत्य यांचें करावें." याचे अगोदरच बाबासाहेबांनीं जागोजागी खंडण्या घेत गयेस जाऊन अंमल नऊ दिवस केला. गयावर्जनही केलें. नंतर अल्लाबिर्दीखान मोहबतजग याचें संधान, पंतप्रधानाकडे गेल्यावरून, पंतप्रधान यांनीं भोंसले सेनासाहेब यांस खर्चास मागितलें त्याजवरून उभयतांचे चित्तांत विकल्प येऊन लढाई परस्पर फौजेशीं झाली. बंगाली फसली सन ११५७ साली सेनासाहेबांची शिकस्ती होऊन, तसेच सारे फौजेसहित साताऱ्यास गेले आणि मेदिनीपुरावर भास्करपंत होते त्यांजला पत्रें पाठविलीं त्यावरून पंत नागपुरास आले. मार्गांतून बाळाजीपंत पेशवे काशीकडून बुंदेलखंडांतून येऊन साताऱ्यास,

१. ही गोष्ट शके १६६४ सन ११५२ सालीं झाली असें दिसतें. 'पंतप्रधान यांची शकावली' पृष्ठ ८ पहा.

पोहोंचले. तें वर्तमान राजश्रींस समजण्यांत आलें कीं, सेनासाहेबांचा यांनी बहुत खराबा केला. त्याजवरून राजेश्रीची मर्जी यांजवर गेली. आमचे आप्त, थोर माणसाचे मुलखांत जाण्यास लढाई करण्यास कारण काय? म्हणोन पेशवे यांला नऊ महिने खराब केले.[१] आणि भोसले सेनासाहेब यांजला बहुमान वस्त्रें देऊन आज्ञा दिली की, "आपल्या मुलुखांत जाऊन बंदोबस्त राखावा."

**भास्करपंताचा खून** इ. स. १७४४:—आज्ञेप्रमाणें सेनासाहेब आपले मुलखांत आले आणि भास्करपंत यांची रवानगी बाबासाहेबांनीं पुनः बंगाल्यांत केली. पटण्या प्रांतीं पोंहचून फार गर्दी यांणी केली. मुलखांत उपद्रव फार भारी होऊं लागला. हें नबाब अल्लाबिर्दीखान मोहबतजंग यांनी मनास आणून भास्करपंतास भेटीचा पैगम केला. आणि भेटीचा योग घडविला. दोन्ही फौजेचे दरम्यान डेरे देऊन भेट करविली. तेथें भास्करपंत यांला थोर थोर सरदारांसहित यावें म्हणून बोलाविलें, याजवरून हेही गेले. तनावे[२] कापून डेरे पाडून दिले. दग्याचे पोटी भास्करपंत सरदारांसहित[३] बुडविले.[४]‡

---

१. ना. प्रां. इ. पा. ९० व ९३ पहा.

२. तंबूच्या दोऱ्या.

४. लेखांक २ पृष्ठ १०–११ ह्यांत भास्करपंताविषयी बराच मजकूर आहे.

‡ जदुनाथ सरकार यांचें "बिहार व ओरिसा" पहा.

३. ह्या सरदारांचीं नांवें पांचव्या बखरींत म्हणजे (उ), बखरीत दिली आहेत तीं:—१. भास्करपंत, २. आलिकरवाल, ३. यशवंतराव गुजर, ४. नीलकंठराव मोहिते, ५. दाजीबा भोंसले, ६. बाबूजी महाडिक ७. शहामहदखां, ८. मनाजी भोसले, ९. नारायण भोंसले, १०. संभाजी भोंसले, ११. कृष्णराव निंबाळकर, १२. बापूजी कदम, १३. श्रीपतराव मेहेकर, १४. व्यंकटराव भाऊ, १५. दाजीबा पाठणकर, १६. बळवंतराव शिर्के, १७. गोविंदराव शेल्रूकर, १८. सठवाजी जाधव, १९. शिवाजी जामदार, २०. सुभानजीराव, २१. नाना बक्षी, २२. जोतिबा कारभारी. या गोष्टीच्या संबंधानें (अ) बखरींत पुढील लेख आहे:—"फौजेची जबरी पाहून भास्करपंताशीं स्नेहभावाचा संदर्प लावून इनाम देऊन, भेटीचा पैगाम

सन ११५८ फसली. फौज लुटून टाकिली हें वर्तमान सेनासाहेबांस समजल्यावरून नबाब अल्लाबिर्दीखान यांचें पारपत्य करणें जरूर यास्तव तयारी करून बंगाल्याकडे स्वारी निघाली. ते समयीं बाराभाटीच्या, किल्ल्यांत व कटकचे सुभ्याचें काम, याजवर नबाब अल्लाबिर्दीखान मोहबतजंग याजकडून, दुलभराम होते. त्याशीं संदर्प करून तह करण्याकरितां बोलावू पाठविलें. त्यावरून दुल्लभराम भेटीस आले. त्यांजला त्यानी कैद केलें आणि अबदुल अज्जी किल्लेदार याजवर कोसीस[1] फार केली. याजवरून त्यांनीं आपले तलबेचा[2] ऐवज घेऊन किल्ला खाली करून स्वाधीन करून दिला. आपण निघोन गेला. दुल्लभराम कैदेंत होता, त्याजला सावकारानी तीन लक्ष रुपये देऊन कैदेंतून सोडविलें.

**गोंडांचें पारिपत्यः**––सन ११५८ फसलीचे साली छावणी बिरभूम नामें जागा सहश्रावाचे मकसुदाबादेचे दरम्यान होती, तेथें छावणी केली; तेथून बादवरसात निघोन सहश्राववाले पठाण सामील करून घेतले. ते कटवा नामें जागा आहे तेथें मिरजाफरखान नामें अल्लाबिर्दीखानाकडून सरदार होता त्यांशी लढाई होऊन रघोजी भोंसले यांची शिकस्ती झाली. तेव्हां मीरहबीब नामे सरदार सेनासाहेबांपाशी होता. त्याने सल्ला दिली की, पुनः सांवर धरून मकसुदाबादेवर जाऊन त्याजवर फौजेचा समेट करून दुसरे मार्गानें मकसुदाबादेस गेले. त्यांचे पिछ्यावर अल्लाबिर्दीखान मोहब्बत जंग याजकडून फौजा जाऊन लढाई झाली. इतक्यांत वर्तमान आले की, " रघुनाथसिंग नामें दिवाण गोंडराजाकडील बदलून आहे व गोंडाचा उपद्रव देवगड प्रांतीं जास्त झाला. " याजवरून माघारे आले. ते वेळेस कटकेचे सरहद्दीवर जमाव व सरदार येऊन किल्ला नऱ्होजी जाचक याचे स्वाधीन केला. त्या मुलखीं शिवभट साठे ठेवून आले. गोंडाच्या पारिपत्यास फौजा पाठविल्या, आणि आपण जातीनें माघारे येऊन रघुनाथसिंगाचें पारिपत्य

---

करून ( जाफतीचे बहाण्यानें ) फौजेचे दरम्यान डेरे देऊन, त्या डेऱ्यांत दग्यानें लोक बसवून पंतास भेटीस आणिलें. डेऱ्याचे तनावे कापून डेरे खालीं लोटून मारिलें. ते वेळेस पंताकडील मोठमोठीं माणसें कामास आली."

१. कोशीस––प्रयत्न ( विरुद्ध. )

२. पगार.

करून पाटनसांवंगीचे[१] मुक्कामी गोंडाचें पारिपत्य करून गोंडास पेवांत घालून जाळून मारिलें आणि चंद्रपुराकडे गेले. कारण चंद्रपुरीं फंद जाहला. चंद्रपूरकर राजाचे शिपाई गोंड व खंडाईत मिळोन बडवाईक रामाळे तळें इकडील मजबूत होते व पठाण पुऱ्याकडील पठाण असा १० हजारांचा जमाव करून किल्ल्याचे लाल दरवाज्यावर आले. हे किल्लेदार यांणीं लढाई करून तिरंदाजी फार केली. शंभर दीडशें माणसें मारिली. जमाव जारी, तेव्हां किल्लेदारास धरून हस्तगत केला. मग शिवाजीपंतावर आले. शिवाजीपंत रामनवमीची कथा करीत होते. तंवही ( धांस ) आली, तमेंच, बिनहाल, घोडे–मैदानाचे दरवाज्यानें बाहेर पळाले, त्या दिवसापासोन शिवाजी टाळकुटे[२] ( यांस ) "बोडखे" नांव पडलें. गोंडांनी ठाणे घेऊन नीलकंठशहा बळकावून होते. मग बाबासाहेब साताऱ्याहून तसेच चंद्रपुरावर जाऊन तिमाजी सखदेव बाहेरच होते यांचे विद्यमानें किल्ला घेतला. नीलकंठशहा राजा काढून बल्लाळपुरास पाठविला. बल्लाळपूर राजास दिलें. नीलकंठशहा तेथें येऊन खंडाईत बडवाईक कांहीं नागपुरास चाकर ठेवून आणिले ते उमरेड दरवाज्यावर जागा दिली. बाहेर केशवराव बडवाईक त्याचे भाऊ उमाजी बडवाईक कांही एक दिवस तेथें राहिले. कृष्णाजी नारायण सुभा चंदपुरी स्थापिला. कऱ्हाडे ब्राह्मण साताऱ्याचे राहणार त्यांचे स्वाधीनही किल्ल्याचा बंदोबस्त ठेवून सेनासाहेब नागपुरास आले.

**जानोजीची बंगाल्यांत रवानगी**:—जानोजी भोसले यांसमागमें सन ११५८ चे साली तुलजो[३] राम देऊन फौजेसुद्धां बंगाल्यांत रवाना केलें. तशांत अल्लाबिर्दीखान मोहबतजंग यांनीं मिरजाफरखान याजला विदा केलें आणि सांगितलें की, "कटकांत ठाणें रघोजी भोंसले, सेनासाहेब सुभा यांचें आहे. व कटक हें सरहद्दीवर त्यांजकडील जमीयत आहे त्यास जमीयतीचें पारिपत्य करावें. ठाणें घ्यावें." त्याजवरून त्यांनी येऊन लढाई फौजेशी घेतली. इतक्यांत मिरजाफरखान याजला

१. लेखांक २ पृष्ठ १० टीप ३० पहा.
२. हे रघोजीबरोबर आले. पृष्ठ ३४ पहा.
३. रघोजी बरोबर आलेल्या सरदारांपैकीं एक. पृ. ३४ पहा.

समजलें कीं, रघोजी भोंसले याचे चिरंजीव जानोजी भोंसले व मीरहबीब नामें सरदार याशिवाय ब्राह्मण कऱ्हाडे * सरदार जमीयतीनिशीं भारी जमाव आला आहे. असें ऐकून मीरजाफरखान ठाळा देऊन, बरद्वानचे मार्गानें निघून गेला. ते समयी जानोजी भोंसले जमावासहित जाऊन पोहोंचले. त्यांनीं पहिली ठाणी कायम होती त्यांचा बदोबस्त करून, पुढे मकसुदाबाद प्रांती उपद्रव केला. तिकडील लोक बहुत बेजार झाले. हमेशा उपद्रव बारगीर लोकांचा होऊं लागला, म्हणून अल्लाबिर्दीखान मोहबतजंग याजकडे रयत लोकांची फिर्याद बहुत गेली. याजवरून अल्लाबिर्दीखान यांनीं ऐकून रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा यांकडे वकील पाठविला. त्यांनी बाबा साहेबास नागपुरांत भेटून खंडणीचा वगैरे विचार बोलण्यांत आणिला. तेव्हां सेनासाहेबांनी उत्तर केलें जे, "जेव्हां क्रोड रुपये खर्चास देऊन बहुत फौजा पाठविल्या तेव्हां तुम्ही खंडणीचा ऐवज देणार, त्यांतही दगाबाजी करणार, तुमचा विश्वास काय? भास्करपंताचा तुमचा मोबदला घेणें जरूर आहे." वकिलानें उत्तर केलें कीं, "झालें तें समर्थ. भास्करपंताचा निराळा मुलूख तोडून देतों तेथें तुमचें स्वस्थान आहे त्या मोबदला मुलखाशी आमचाही मुलूख लागून आहे. अशी मातबर जागा पातशाही आहे." असे नाना प्रकारें समजावून कटक प्रांत वोढसा देऊन तह ठरविला. शिवाय दोन वर्षांची खंडणी राहिली ती २५ लक्ष नगदी द्यावे याप्रमाणें सिद्धांत झाला, तेव्हां नबाब अल्लाबिर्दीखान मोहबतजंग याचे पत्राचें उत्तर लिहिण्यास फारशीनवीस बाबासाहेबाचा मुनशी चिटकोपंत खुषमत लिहिणार यास बोलावून, जाब तयार करविले.

**भवानीपंत मुनशी याचा उदय**:—ते वकिलाचे विचारास मसुदा न आला तेव्हां भाऊसिंग लाला बुऱ्हाणशाहाचे बक्षी बहुत हुशार मातबर त्याजला बाबासाहेबांनी बोलाविलें. आज्ञा केली, की, "तुमच्या येथें कोणी फारशीनवीस असल्यास आणवावे;" त्यांनीं विनंति केली कीं, "आमचे ज्ञातीत कोणी नाही. परंतु राजेसाहेबांचे पदरीं एक ब्राह्मण अळजपुराकडील कोणी एक दिवस आम्हांजवळ होता तो आमचे पाहण्यांत आहे. लिहिण्यांत चांगला आहे. आम्हांपासोन राजेसाहेबांनीं फारशी

* करांडे (?)

पढविण्यास नेला आहे. त्याचा १० रुपयें दरमहा करारानें ठेविला आहे." त्याजवरून बाबासाहेबांनी राजाकडेस निरोप सांगून पाठविला कीं, "तुम्हां-जवळ फारशीनवीस ब्राह्मण आहे त्याजला इकडेस पाठवून द्यावें" तेव्हां भवानीपंत मुनशी यास पाठविलें. त्यानें बाबासाहेबांचे मर्जीनुरूप मसुदे लिहिले. तेव्हां वकिलाकडे तसेच मसुदे देऊन पाठविले. ते पाहून वकील खूप झाला. दोन हजार रुपये बक्षीस पंतमशारनिल्हे यांस दिले. तेथून सेनासाहेबांनीसुद्धां आपले तर्फेनें २०० रुपये बक्षीस दिले. तसेच पंत निघून राजे बुऱ्हाणशहापाशीं आले यांणीही शभर रुपये यांस इनाम दिले. बाबा-साहेबांस राजे यांणी सांगून पाठविलें "पसंत असल्यास ठेवून घ्यावे." असा मजकूर समजण्यांत आला तेव्हां साहेबीं सांगून पाठविलें की, "माणूस काबील आहे, तुमचे मर्जीस असल्यास चांगलें आहे." आपले जेव्हापासून ठेविले ते दिवसापासून राजाकडील निरोप बाबासाहेबाकडे आणीत जावा, व उत्तरे नेत जावी, असें कांही एक दिवस जानोजीबोवापर्यंत चाललें.

तिकडेस बगाल्यांत पत्रें अल्लाबिर्दी मोहबतजंग याजकडे गेली. तह पक्का ठरला. जानोजी भोंसले यांजला लिहून पाठविलें की, नबाब अल्ला-बिर्दीखान मोहबतजग याजला पत्रें लिहिली आहेत. त्याप्रमाणें बंदोबस्त करावा. त्याप्रमाणें जानोजीबोवांनी तिकडील बंदोबस्त ठेविला हे ऐकून बोवासाहेब फार संतोषी झाले, आणि साताऱ्यास राजदर्शनास गेले. राजश्रीची कृपा बाबासाहेबांवर फार विशेष झाली.

**शाहूनें मुधोजीस दत्तक घेण्याची अफवा**:—यांचे जाण्याचे पूर्वी बाबासाहेबांचे चिरंजीव मुधोजी भोंसले देउरांत होते. तेथून साता-ऱ्यास राजश्रीकडे येणे झालें. गोविंदराव चिटणीस यांजकडेस ही तसेच राजे फत्तेसिग भोंसले यांजपाशी वहिवाट व राजश्रीचे धाकटे राणीचे चुलत बहिणीचे लेक त्याजला त्यांणीं राजश्रीही लोभ विशेष करून होते. त्या प्रसंगीं गोविंदराव चिटणीस यांचे विद्यमानें विचार ठरला व गांवांतही झालें की, राजश्री दत्तक साळीचे[१] लेकास घेतात. ते समयीं आई-साहेबांनीं[२] ऐकून राजश्रीस आज्ञा केली कीं, "तुम्ही मूल दत्तक हा

१. साळी—मेहुणी.
२. ताराबाई.

घेतां." त्यांणीं विनंति केली जे, वंशांत कोणी नाही. आपले आप्ताचा मल चांगला आहे म्हणोन हा विचार ठरविला आहे. राजश्रींचें[१] उत्तर असें ऐकून आईसाहेबांस राग आला आणि बोलल्या, जे तुम्हास भवानीचा वर आहे तो लटका कसा होईल ? तुमचा प्रत्यक्ष वंश असतां हा दत्तक कशास पाहिजे." राजश्रीनें ऐकले होतें कीं, आईसाहेबांनीं नातू लपवून ठेविला खोटा नाहीं तो खरा आहे.--मग राजश्रींनीं दत्तक[२] घेणें राहविलें. तेव्हां मुधोजी भोंसले वय लहान, परंतु शाहणे फार, जिवास खिन्नता फार केली. बोवासाहेबांची अनास्था, त्यांत सर्व मुत्सद्दी यांचे येथें जाणें येणें, त्याचा रप्त ठेविला असतां बंदोबस्त प्रतिनिधि यांणीं, मुधोजी बोवाचें समाधान करून कांहीं स्वारांनिशीं पालखी वगैरे बहुमानांनीं ठेविलें. नंतर कांहीं एक दिवस होते. तेथें धाकटे राणीपाशीं काशीराव[३] लक्ष्मण प्रभु फडणविशीचे कामावर खास देवडीवर होते. राणीसाहेब मुधोजीबोवांची मावशी, यामुळें काशीबाचा स्नेह फार, ओळखही फार होती. पेशजी त्यांचे चुलत बंधु नरसिंगराव भवानी प्रभु याजला रघोजी बोवांनीं सेनासाहेबांचें पद प्राप्त झाल्यावर घरपागा स्वार शंभर व एकांडे स्वार दोनशें त्याप्रमाणें घेऊन आले होते. तशांत बावासाहेब राजश्रीचे दर्शनास गेले. मर्जीचा संतोष होऊन माघारे आज्ञा घेऊन येतेसमयीं मल्हारजी होळकर यांनी बाबासाहेबांस निषेध केला कीं, तुमचा पुत्र ब्राह्मणाचे घरीं राहणें हा काय शहाणपणा ? मूल वय किती, सर्व गोष्टीची तुम्ही अडचण केली असतां, येथेंही योग्यतेनें आहे. परंतु तुम्हांस उचित नव्हे. दैवानीं राजेश्री वोटींत घेणार होते. आईसाहेबांचे मर्जीस्तव राहिलें. आतां आपले लौकिकाकडे पाहून जें करणें तें करावें. असे नाना प्रकारचे बोध करून यांचे रवानगीचे समयीं मुधोजी भोंसले यांजला समागमें घेऊन निरोपाचे वेळेस विनंति राजेश्रीस केली कीं,

---

१. शाहूचें.

२. ह्या दत्तक प्रकरणाची हकीकत 'थोरले शाहू महाराज यांचे चरित्रांत' पृष्ठें ९६–९९ पाहिलीं असतां समजेल.

३. काशीराव याने दोन मुलगे व्यंकटराव काशी आणि लक्ष्मणराव काशी हे पुढें इतिहासांत प्रसिद्ध आहेत. 'श्रीमंत नारायणराव पेशवे' या नाटकांत यांच्या कृतीचें आविष्करण केलें आहे तें वाचकांनी पहावें.

बाकाबाई नामें कन्या आहे तिचें लग्न व मुधोजी भोसले यांचें लग्न करणें आहे. त्यांचे सोयरीकीचा बंदोबस्त पाहणें आहे. असें बोलून निरोपास घेऊन देउरास आले. मागाहून राजश्रींनीं केदारजी मोहिते यांचा पुत्र मानसिंग मोहिते वर चांगला आहे. याजकरिता सेनासाहेबांकडे त्रिंबकराव कान्होजी प्रभू भालेराव, पेशजी भालेराईत त्या काळीं त्याचे वडील, सरकारच्या उपयोगी पडले होते यावरून यांजवर लोभ करून त्यांची रवानगी केली. ते बाबासाहेबांजवळ येऊन राजश्रीचे आज्ञेप्रमाणें बोलून सोयरिकीचा निश्चय करून सेनासाहेबांनीं राजश्रीकडे रवाना केले. ते पोंहोचून तेथून केदारजी मोहिते व पुत्र, मानसिंग मोहिते आज्ञेप्रमाणें घेऊन आले. सेनासाहेबांची भेट होऊन, बाकाबाईचें लग्न देउरास झालें. पुढें त्याचा बंदोबस्त सरदारीचा त्रिंबकराव यांचे हातें घेऊन, चार स्वाऱ्यांचा कारभार त्रिंबकराव यांस सांगितला. व त्रिंबकराव याचे जातीचा बंदोबस्त राजश्रींचे आज्ञेप्रमाणें करून दिला. आणि बरोबर कुटुंबासुद्धां व मानसिंग मोहिते याजला घेऊन नागपुरास आले. त्रिंबकराव कान्होजी यांचें कुटुंब बोरगांवी वराडांत ठेविलें. सेनासाहेब मुधोजीबोवा यांजला समागमें आणिलें होतें त्याजसमागमें दहा हजार होन देऊन शिवाजी केशव यांचे जिमे कारभार, व दिनकर विनायक व शिवाजी विनायक व नरसिंगराव भवानी परभु यांचें पथक तैनात दिलें. ते सिकाकोल, राजमंद्रि, बिज्यानगर, बस्तरचे मुलकांतून रवाना केले. बारा वर्षाचें वय मुधोजीबोवाचें, ते समयीं ( होतें. ) महिपतराव दिनकर आपले तीर्थरूपा-समागमें बरोबर चाकरीस होते. वाटेंत स्वारी शिकार करीत मुधोजी बावांचा लोभ घोडे फेरण्याचा शोक मुधोजीबोवास लोभ फार होता. महिपत राव यांस भालेबोथाटी खेळणें असा प्रकार. त्या प्रांतीं जाऊन खंडणी, बिज्यानगर येथपर्यंत घेऊन द्रव्यही मिळविलें. तिकडील हवा घोड्यास वाईट याजकरितां फौजेंतील घोडीं फार जायां झालीं. म्हणोन लवकर फिरले. ते नागपुरास आले. बाबासाहेबांची मर्जी फार खुष झाली. भरंवसा नोहता. परंतु चांगली केली. नंतर छत्तीसगडास रवानगी मुधोजीबाबाची केली. सन ११६० चे अव्वल सालीं वर्षभर तिकडे राहून बंदोबस्त करून माघारे आले.

जानोजी बोवाही बंगाल्यांतून साल मजकुरी आले. भेटी झाल्या.

संभाजी सिर्के समागमें होते. जानोजी बोवांनीं आपले घराची चाल टाकून शिर्क्यांचे तऱ्हेचें पागोटें बांधावें व समले[१] सोडावे. याजमुळें बावासाहेबांची मर्जी फार खपा झाली. त्या समयीं ते मग शिर्के यांजवरही रागास भरले कीं, मुलास खराब केलें असें झालें. यापूर्वीपासून जानोजी बावावर व साबाजी बाबा यांजवर दया फारच होती.

**शाहूचा मृत्यु व रघूजीचें साताऱ्यास आगमन**:—त्या काळीं राजा शाहू यांचा काल[२] शके १६७१ सन ११५९ साली झाला. हें वर्तमान समजल्यावरून बाबासाहेब बहुत खिन्न झाले; तों तिकडेस रामराजा, ताराबाई आईसाहेबांचा नातू,[३] यांची गोविंदराव चिटणवीस व पेशवे बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब मिळोन स्थापना आईसाहेबांचे विचारें केली. नंतर प्रतिनिधि व पेशवे यांचा पेंच पडला तेथें कांही एक दिवस राजा मालीक व गोविंदराव चिटणवीस कारभारी त्यांचे भाऊ बापूजी खंडेराव दहा हजार फौजेनी राजाचे जवळ, पेशवे आदि करून असतां पेशवे यांचा व गोविंदराव यांचा स्नेह भारी. व्यंकोजीपंताचे प्रकरणावरून पेशवे यांचा चिटणवीस यांजवर उपकार भारी जाणोन गोविंदराव सर्वस्वी पेशवे यांचे लगामी असतां पेशव्यांची प्रबलता भारी पडत चालली. तेव्हां गोविंदराव चिटणवीस यांजला संशय होऊन चित्तांत आलें जे, कोणीं मातबर सरदार आपले प्रेमांतील असावे, हें मनांत आणून रघोजीबाबांस बोलाऊं पाठविलें. ते लवकर येईनात तेव्हां आपले कनिष्ठ बंधु बाबूराव चिटणवीस आणावयास पाठविल्यावर, रखमाजी गणेश चिटणवीस सेनासाहेबांचे यांस वरचे वर पत्र यावें की, सेनासाहेबांस जलद घेऊन यावें. म्हणोन हे घेऊन गेले. पेशव्यांशीं गोविंदराव चिटणवीस यांनीं समजाविलें कीं, प्रतिनिधि व आईसाहेब एक झाले, दमाजी गायकवाड त्यांचे ममतेंतील, तेव्हां रघोजीबोवा राजमंडळचे यांस आपले मिळणीत

१. पागोटयाचें टोंक.

२. शके १६७१ शुक्लनाम संवत्सरीं मार्गशीर्ष वद्य तृतीया शुक्रवारीं शाहू महाराज कैलासवासी झाले. पंतप्रधान यांचे शकावलींत शुद्ध नवमीस देहविसर्जन झालें असा लेख आहे.

३. ताराबाई ही राजारामाची स्त्री. हिला शिवाजी म्हणन वेडा मुलगा होता. त्याचा मुलगा रामराजा हा ताराबाईचा नातू.

मिळवावें. तुम्हीं व आम्ही रघोजी बोवा एकत्र असल्यास यांनीं काय करावयाचें आहे ? नाही तर रघोजीबोवा आईसाहेबांचे आप्त, तिकडे झाल्यास अवघड. यास्तव बाबूराव यांजला पाठवून आणविलें. असें बाहेर अंगीं दाखवून राजश्रींच्या व सेनासाहेबांच्या भेटी करविल्या. विचार पाहतांना फौजेंत बल नाही. राहणें झालें असतां एकी होईना. तेव्हां गोविंदराव यांणीं हें पाहून समेट करून बाबासाहेबांस आपले मुलखाचे बंदोबस्ताकरितां माघारे रवाना केलें. पेशव्यास समजाविलें जे, आपलें यांचें सख्य होऊन यांची रवानगी तिकडे करावी. माणूस एक शकुनी परंतु आईसाहेबांचे आप्त म्हणोन रवाना केलें. वस्त्रें बहुमान रामराजा यांजपासून घेऊन सेनासाहेब आपले प्रांतांत आले. कांही एक दिवसांनीं लक्ष्मणराव खंडागळे यांचा मुलूख गीरड[१], माणगांव[२] व पवनार[३] वगैरे होता, तो नासरजंग फुलचरीकडे[४] लढाईत पडले हें पाहून मुलूख त्याचे पेटचांतील म्हणून सेनासाहेबांनी हस्तगत केला.

**रघूजीचा मृत्यु** इ. स. १७५५:––नंतर पोटाचा आजार रघोजी भोसले सेनासाहेब सुभा यांसि उभा राहिला. त्या वेळेस सेनासाहेबीं मुधोजी बावास आपले जवळ छत्तीसगडाहून आणविले; मोहनसिंग छत्तीसगडास पेशजीपासून बंदोबस्त करून होता. मुधोजी भोंसले नागपुरांत आले. इतक्यांत गाविलगड[५] किल्ला येथील पैगाम बावासाहेबांकडे गुरमन्याचे व भाई यांचे विद्यमानें व शासाहेब येथील राहणार त्यांनीं पातशाहा किल्ल्याचा पैगाम आणिला कीं किल्ला मिळतो. हा फार संतोष बाबासाहेबीं मानून, राहण्यास स्थळ चांगलें आहे हें जाणून, साबाजीबाबा, कनिष्ट पुत्र यांची रवानगी करावी हा निश्चय झाला. पांच हजार फौज नेमून सदाशिव हरी

१. गीरड हें गांव वर्धेच्या आग्नयेस ९ कोसांवर आहे. येथें नारळ, सुपारी, खसखस इत्यादि जिन्नस खाजा शेख फरीद नांवाच्या फकिराचे शापानें पाषाणमय झालेले आहेत अशी समजूत आहे.

२. माणगांव हें स्थळ वर्धेपासून ८–९ कोसांवर आहे.

३. पवनार हें स्थळ वर्धेपासून सुमारें १०–१२ कोसांवर आहे.

४. पांडिचरी.

५. गाविलगड.

दिवाण कऱ्हाडे बाबासाहेबीं साताऱ्याहून आणिले होते. कारभारी जास्त करून फौजेसुद्धां नागपूरचे संगमावर मुक्काम करविला. साबाजीबावा 'जा' म्हणत असतां गेले नाहींत, तेव्हां मुधोजी बावांस शहाणे दाबाचे जाणोन यांचे रवानगीचा निश्चय केला; या वेळेस जातीनीं जावें परंतु शरीराचा विचार मानगीचा, जानोजीबोवा, व साबाजीबोवा जवळ राहिले, व मुधोजीबोवांनीं दिनकर विनायक व शिवाजी विनायक व नरसिंगराव बावा परभू यांचें पथक समागमें मागितल्याबरोबर विजयानगराकडेस होते, हें कामकाजाचे उपयोगी भरंवशाचें पथक, जमीयत चांगली, म्हणोन समागमें घेतले, व महिपतराव दिनकर यांजवर पेशजीचे स्वारींत ममता फार याजकरितां हे तैनातीस घेऊन खेरीज किती एक लोक आणि जमाव फौजेचा घेऊन गेले. गाविलगड लढाई न होतां हातास येऊन फत्ते झाली. यश संपादन करून ठाणें बसविलें. तेथील बंदोबस्त करून माघारे यावें तों तेथील मुक्कामीच बावा साहेबांचें वर्तमान[1] शके १६७४ [illegible] फसली सालीं समजलें. याजवरून सुरजी अंजनगांव[illegible] क्रियाकर्मास आरंभ झाला.[2]

---

# भाग ३ रा

# जानोजी भोंसले

**जानोजी व मुधोजी**:—इकडून जानोजीबावांनीं किल्ला गोवेल्याचा आपले हातीं यावा सबब कृत्रिमतेनें जयाजी भाईस हजार बाराशें लोकांनीं बाहेर रुसकती दाखवून, मुधोजी बोवाकडेस रवाना केलें, ते क्रियेचे आठवे नववे दिवशीं जाऊन पोहोंचले, भेट घेऊन बाहेर आंगीं मुधोजीबोवाशीं भाई

---

१. यासंबंधानें जास्त माहिती लेखांक २ पृ. १२ यांत आहे. येथें शकांत तफावत आहे.

२. बखर ( ऊ ) पान २९ फाल्गुन शु. ३ रोजीं रघूजी वारला. पेशवे दप्तर भाग २० ले० ८० फा. शु. ३, ( इं. ता. १४–२–१७५५ ) रोज, शुक्रवार (सं.)

बोलले कीं, " बावासाहेब आमचा पाळणार होता तो गेला, जानोजींनीं पाळावें तर त्याचा प्रकार सर्व लक्षांतच आहे; बंगाल्याहून आल्या दिवसापासून सर्व तऱ्हा व जात शिर्क्यांची चाल धरली आहे, याजकरितां बावासाहेबांची मर्जी रुष्ट होती तीच परिणामास दिसून आली, असो; आम्हांस रजा दिली आणि कित्येक लोकांची हीच गति झाली; तेव्हां वाटतें तुम्ही बावासाहेबांचे जागीं आम्हांस आहां हें जाणून, तुमची भेट घ्यावी आणि आपले घरास जावें. तुम्हांस तरी काय म्हणावें ? उदईक तुम्ही व ते एकच होणार. भाऊ आहांत आम्हाकरितां भावामीं वाकडें पडावें हें ठीक नाहीं. आपलें दर्शन घेऊन जावें, याजकरितां निरोपास आलों." हें ऐकून आपासाहेबीं आज्ञा केली की, " चिंता नाहीं बावासाहेबांचे पदरचे जितके आहेत, ते माझेच आहेत; तुम्हीं आमचे जवळ असावें, दों चों दिवसांनीं सुतकनिवृत्ति झाली म्हणजे हा किल्ला घेतला आहे, याजवर विश्वासूक माणूस पाहिजे त्यास ईश्वरें अनायासें तुम्हांस पाठविलें, तुम्हीच किल्ल्यावर असावें." ( असें ) बहुतां प्रकारें समजावून भाईस किल्ल्यावर पाठविलें. त्यांनी किल्ल्यांत जाऊन तेथील पक्की बंदोबस्ती केली. मुधोजीबावाकडील कोणी गेलें असतां किल्ल्यांत येऊं देऊं नये व जानोजीबोवाकडे लिहून पाठविलें की, किल्ला हस्तगत. असें आपासाहेबांस समजले वरून आपले जागी खिन्न होऊन सदाशिव हरी दिवाण, महिपतराव दिनकर हे एकत्र होऊन विचार केला जे, " कसें करावें ? " ते समयीं दिवाण मशारनिल्हेनीं सर्व प्रकारें भरंवसा दिला कीं, " पारोळेकर ‡ आमचे शरीरसंबंधी आहेत. यांचे विद्यमानें जो पैका लागेल तो कर्ज घेऊन, फौजेचा बंदोबस्त ठेवूं. सदाशिव चिमणाजी, भाऊसाहेब पेशवे, नानासाहेब पेशवे यांचे बंधु, आमचे स्नेही आहेत, तिकडून सर्व बंदोबस्त केला जाईल." असें म्हणून खातरजमा केली. तैनाती लोक जानोजी बोवांचे होते ते युवतीचे पोटांत त्यांनीं आपले बलावून घेतले. तेव्हां फौज थोडी राहिली. ते समयीं दिनकर विनायक व शिवाजी विनायक व नरसिंग-

‡ पारोळेकर—खानदेशांतील पारोळें येथें पेशव्यांचें लष्करी ठाणें होतें. झांशीचे सुभेदार रघुनाथ हरी नेवाळकर यांचे घराण्यास तें गांव जहागीर असून त्या ठाण्याची व्यवस्थाही त्यांचेकडे असे. त्यांची तेथें फार मोठी सावकारीही होती. ते सदाशिव हरी यांचे आप्त. ( सं. )

राव बावाजी परभू मंडळ आपलाले जमाव व पथकासहित, महिपतराव, दिनकर हे राहिले; विश्वास सर्व प्रकारें मुधोजीबोवांस महिपतराव यांचा झाला होता. त्यांत या प्रसंगीं विशेषच झाला. पुढें जानोजीबोवास चिरंजीव म्हणून मुधोजीबोवांनीं पत्र लिहिलें," आम्ही वडील मातोश्रीचे तेव्हां वडीलपणा आम्हांकडेस व तुम्ही कनिष्ट मातोश्रीचे तेव्हां कनिष्ट तुम्ही. दौलतीची मालकी आम्हांकडेस तुम्हीं आमचे आज्ञेंत वागावें." अशी पत्रें लिहून फौजेचा विचार ( घेऊन ) नवीन इतबारी लोक ठेवण्यास आरंभ केला. जवळ इतबारी सखोजी गांवडे व रूपाजी पोंवळे व आबाजी भोंसले व नाईकजी अहिरराव व बाजीबा नळवडे, पागे, असे जमाव करीत वऱ्हाड प्रांतीं खंडण्या घेणें सुरूं केलें, व इकडेस जानोजीबोवापासून सारे सरदार कारभारी दौलतीचे, तिकडे कोन्हेरपंत मुजुमदार त्यांचे पुत्र बाबूराव कोन्हेर व रखमाजी गणेश चिटणवीस व त्रिंबकजी ‡ राजे वकिलीवर पंतप्रधानाकडे व महादाजी पंत फडणवीस, जिवबाचे फडणवीस, जिवबाचे वडील, व सुंदर पोतनीस परभु यांजकडे जामदारखाना वगैरे, विश्वनाथ कोन्हेर दप्तरवाले व कृष्णाजी गोविंद वऱ्हाडचे सुभे, व नरहरपंत (रिसबूड), नागपूरचे सुभे, व शिवभट साठे, कटकचे सुभे, हे तेथेंच होते, व सरदार लोक व रघोजी करांडे, व बिबाजी वांजहाल (वंजाळ) व नऱ्होजी जाचक कटकांत होते त्यांनीं आपला भाऊबंद कटकांत ठेवून इकडेस आले. व शिवाजी केशव टाळकुटे व गिरमाजी खंडेराव व आनंदराव वाघ व कृष्णाजी आटवले (आटोळे) व वामनराव गुजर शिदोजी गुजराचे वडील सुद्धां कुल सरदार मुत्सद्दी वगैरे सारे मंडळी जानोजीबोवांकडे व कनिष्ट बंधु शिवाजी मुधोजीबोवांकडे.

सारी सोयरी मंडळी गुजर, मोहते, अहिरराव व शिर्के, पालकर सर्वत्र मंडळी एक विचार करून, मुख्य बाबूराव कोन्हेर मुजुमदार दिवाण व त्रिंबकजी राजे या दोघांस पुण्यास रवाना केलें. ते पंतप्रधान बाळाजी बाजीराव नानासाहेब यांचे चुलत बंधु सदाशिवराव चिमणाजी भाऊसाहेब यांजकडेस पाठविले. त्यांच्या भेटी पुणें मुक्कामीं झाल्या. बोलणीं झालीं. नंतर दीड लक्ष रुपये नजर ठरले असतां पुण्याहून जानोजीबोवांस उभयतांनीं लिहून

---

‡ वावीकर भोंसले. याचा भाऊ साताऱ्यास दत्तक दिला तो दुसरा शाहू छत्रपति ना. इ. पा. २४१ पहा. ( सं. )

पाठविलें कीं, " सात लक्ष रुपये नजर द्यावी लागेल " असें लिहिण्यावरून जानोजीबोवांनीं उत्तर पाठविलें हें उत्तम आहे, असें झालें.

**देवाजीपंत चोरघोडेः**—त्रिबकजी राजे यांचे कारकून नामें कोन्हेरराम उमरेडकर[१] त्यांचे शागिर्दीत देवाजीपंत[२] चोरघोडे होते. तेही पुण्यांत पंत मशारनिल्हे बरोबर गेले होते. तों एक दिवशीं त्रिबकजी राजे दरबारास गेले, त्यांजबरोबर देवाजीपंतही गेले. दरबार बरखास झाल्यावर राजे मजकूर व पंत मजकूर घरास आले. व देवाजीपंत मागें निजून राहून रात्रौ नानासाहेब पेशवे बसून शृंगारशास्त्रें काढून इतिहास करीत असावा, हा छंद व सामुद्रिक पाहाणें फार होतें. त्या प्रसंगीं देवाजीपंत यांनीं जागृत होऊन शास्त्र विषयाचे बोलणेची निवृत्ति करून बोलूं लागले· त्याजवरून नानासाहेब यांची मर्जी प्रसन्न होऊन विचारिलें कीं, " तुम्ही कोठें असतां ? त्यांनी विनंति केली जे, " त्रिबकजी राजे व बाबूराव कोन्हेर यांजपाशीं असतों. " नानासाहेबीं आज्ञा केली कीं, " तुम्ही नित्य येत जावें," त्यावरून त्यांचें जाणें सुरुवात झालें. नानासाहेबांची मर्जी देवाजीपंतांनीं फारच प्रसन्न करून घेतली. त्रिबकजी राजे व बाबूराव कोन्हेर यांचीं बोलणीं लक्षांत ठेवून एके दिवशीं नानासाहेबांस विनंति केली जे, "या उभयतांचे समागमें हें सर्व लक्षांत आणावें याकरितां मजला दिलें आहे. जानोजीबावाचा अभिमान आपण सर्व गोष्टीनी निभावल्यास विनंति करीन. " याजवरून अभय वचन घेऊन आपले जागीं स्वस्थ राहिले. त्रिबकजी राजे व बाबूराव कोन्हेर सेनासाहेबांचीं वस्त्रें घेऊन शके १६७४ चे अखेर सालीं आले, त्यांजबरोबर हेही आले. तंव तेथें सर्व गोष्टीनी फौजेची तयारी नागपुरास जानोजी बोवा करून होते. त्रिबकजी राजे व बाबूराव कोन्हेर यांणीं सविस्तर सांगितलें यावरून संतोषास पावले. परंतु देवाजीपंतांनीं जानोजीबोवासीं

---

१. उमरेड हा गांव नागपूरच्या आग्नयेस १४ कोसांवर आहे. नागपुरी धोतरजोडे, पातळें व उपरणीं हीं येथेंच उत्तम तयार होतात. नागपुराची आख्या उमरेडच्या कापडावरून झाली आहे.

२. लेखांक ३ पृ. १६ टीप २ पहा. देवाजीपंत हे कसे उदयास आले हें समजण्यास हा लेख अंशतः साधनीभूत आहे.

एकांतीं प्रवेश करून कित्येक बारीक मोठे विचार होते ते समजाविले. साता लक्षांचा तह अडीच लक्षांवर ठरवून ठेवितों.

**जानोजीस वस्त्रें**:—याप्रमाणें बोलण्यावरून जानोजीबोवांचा देवाजीपंतावर विशेष लोभ झाला. वस्त्रें, पालखी, स्वार भारबरदारी समागमें घेऊन पुण्यास रवानगी केली. यांणीं जाऊन तेथील बेत दीड, लक्षांचा ठरला होता त्याजवर एक लक्ष[1] जास्त करून अडीच लक्ष ठरविले. त्याजवरून नानासाहेब यांची कृपा संपादन करून, तेथून निघते समयीं सरकाराज्ञा झाली कीं, स्वारी करनाटक प्रांतीं जाणार तेथें चाकरींत हजर असावें. सिद्धांत ठरवून नागपुरास आले. तेव्हां सात लक्षांचा बेत होता त्यांत साडेचार लक्ष कमती झाले यावरून सेनासाहेबांची कृपा झाली. असें उभय पक्षीं प्रेम संपादून जानोजीबावाचे कारभारी दिवाकरपंत झाले.

ते समयीं मुधोजीबावांचा व जानोजीबावांचा कलह उत्पन्न झालाच होता. फौजा उभयतांनीं जमाव केला आणि दोन तीन लढाया वऱ्हाड प्रांतीं झाल्या.

**निजामाचा मृत्यु** इ. स. १७४८:—इतक्यांत पेशजी शाहू महाराज यांचा काल[2] झाला त्याचे पूर्वी बाळाजी विश्वनाथ दिल्लीहून परतून आल्यावर सय्यद हसन रेजाखान,[3] महमदशाहा पातशावर चालून मैजमियत येत होता. त्यावरून बादशहांनीं दिवाण कमरुदिनखान[4] मातबर फौजेसहित पाठविला होता. त्यानें जाऊन हसन रेजाखानाशीं लढाई करून शिकस्त केलें आणि सय्यदास धरून कैद करून दिल्लीस आणिलें. हा मजकूर नबाब किलीजखान नबाब निजाम उलमुल्क यांनीं ऐकून विचार केला कीं, दिवाण कमरुदीनखान आपले भाऊबंद आहेत व सय्यदाचा भाऊ व पुतण्या याजला बादशहाचे इषाऱ्यावर मारला आहे, तेव्हां बादशहाचे भेटीस गेल्यास

---

१. प्रस्तुत कारभारावरून जानोजी व नानासाहेब या दोघांसही खूष ठेविलें.

२. शाहू महाराज शके १६७१ मार्गशीर्ष शुद्ध नवमीस वारले.

३. मागें पृष्ठ २६ पहा.

४. मागें पृष्ठ २७ पहा.

सरफराज होतील. हें समजून दिल्लीस गेले. नासरजंग[१] वडील पुत्र याजला इकडील दक्षिणेस बंदोबस्तास ठेविले, आणि हे दिल्लीस गेल्यावर बादशाहाची मुलाजमात झाली त्या प्रसंगीं त्यांचे चेहऱ्यावरून बादशाहांनीं विनोद[२] केला; तें वैषम्य यांनी पोटांत धरून खानदोराखान मातबर सरदार त्याचे हातून फंद करवून इराणाहून नादिरशाहा बादशाहा आणवून महमदशाहास जेर केले. नादीरशाहाशी व महमदशाहाशी सख्य झाल्यावर, महमदशाहास नादीरशाहांनी सांगितलें कीं, इतका फंद चिनकीलीच्खानानें केला. हें वर्तमान चिनकिलीचखान नवाब यांजला समजतांच तेथून फौजेसहित कूच करून दक्षिणेंत आले. तों नाझरजंगांनी येथील जमाव आपला करून मुलकाचा बंदोबस्त केला. तो बापाशी बदमामलीस[३] येऊन लढाई केली. तेव्हां हिदायत मोहदिनखान[४] याचे बापांनी नासिरजंगास प्रतिकूल होऊन लढाईचे प्रसंगीं तिरंदाजी केली, नासिरजंगाची शिकस्ती होऊन कैद केलें. याजवर कांही एक दिवसांनी नबाब चिन्किलीचखान यांचा काल[५] झाला. याजवर नासिरजंग मालक झाले. तेव्हां हिदायत मोहदिनखान हे चिन्किलीचखान नबाबाचे नवासे यानी पूर्वदेशाचे[६] मुळें दहशत होऊन फुलचरीकडेस[७] जाऊन फराशीसाचा[८] आश्रय करून होते. तेव्हा नासरजंगानी औरंगाबादेहून स्वारी करून हिदायत मोहिदिनखान याजवर चालून गेले. खान मजकुरांनी जाणून, नबाबाकडील सरदार हिंमतबाहादर आदीकरून फितुरांत मिळून छापा नासरजंगावर

१. निजाम उल्मल्क असफजहा यास सहा मुलगे. गाजुदीन, नाझरजंग, सलावतजंग, निजामअल्ली, महमदशरीफ आणि मीरमोगल.

२. हा विनोद कसा केला तें भाऊसाहेबांची बखर पृ. २४–२५ येथें सविस्तर आहे.

३. बदमामली––फितूरी, बंडखोरी.

४. हिदायत मोहदिनखान––हा निजामाच्या मुलीचा मुलगा. तो मुझफरजंग या नांवानें इतिहासांत प्रसिद्ध आहे. याजवर निजामाचें फार प्रेम होतें.

५. शके १६६९.

६ पूर्वकर्माचे.

७. पांडिचरी.

८. मान्श्यूअर बुशी.

घातला. त्या गर्दीत हिंमतबाहादर यांनीं नासिरजंग यांस गोळ्या घालून मारिलें. नंतर सारे लोक फितुर करून आपले केलेच होते, त्या प्रसंगीं आपणच हिदायत मोहिदिन खान नवासे म्हणून मालक झाले. समागमें सलाबतजंग व बसालतजंग व निजाम अल्लीखान व मोंगल अल्ली हेही चौघे बंधु नासिरजंगाचे यांजला घेऊन स्वारी औरंगाबादेस स्वस्थानास हिंमत बाहादुराचे मुलखांतून येत असतां त्यांचें म्हणणें पडलें की, या मार्गानें गेलें असतां हा मुलूख खराब होईल. यास्तव दुसरे मार्गानें जावें. हें न ऐकतां मगरुरीनें तिकडूनच फौजेसहित चालले. याजकरितां हिंमतबाहादर आपले जमावासुद्धां चालून येऊन लढाई करून, हिदायत मोहिदिनखान यास मारिलें. त्या वेळेस खानमवसुफाचे खवासीत रामदासपंत[1] होते. त्यांनी आवाज केला जे, नबाबाचा हुकूम केला कीं, निमकहरामास मारावें. या इषाऱ्यावरून नबाब निजाम अल्लीखान यांनी जवामर्दी करून, हिमत बाहादर यांसि मारिलें, मग चौघे बंधु एकत्र होऊन वडील भाऊ सलाबतजंग यांसी नबावी देऊन, सारे त्याचे आज्ञेंत राहिले.

**रामदासपंत दिवाण**:—दिवाणगिरीचा कारभार रामदासपंत करूं लागले. दवलतीचा बंदोबस्त चांगला करून बाळाजी बाजीराव पंतप्रधान यांजवर मोहिमेस निघाले. तो पंतप्रधान यांजवर गालीब[2] जरब जाली. मार्गात ईश्वरी कृत्य रामदासपंताचे डेऱ्यांत आपसांत शिपाई लोकांचा दंगा होऊन पंतमशारनिल्हे मारले गेले. याजवर दिवाण शाहानवाजखान होऊन त्यांणी पंतप्रधानाचें सख्य करून माघारे औरंगाबादेस नबाब सलाबतजंगास घेऊन आले; या उपर बाळाजीराव पंतप्रधान व सदाशिव चिमणाजी भाऊसाहेब यांणीं फौजेची तयारी करून सन ११६३ चे सालीं शाहानूर[3] बंकापूरचे मोहिमेस जाऊन मोरचे बसविले. कांहीं एक दिवस

---

१. रामदासपंत—हा नासरजंगाचा कारभारी. बखरीतील मजकूर नीट लक्षांत येण्यासाठी शाहू महाराजांचें चरित्र पृष्ठें ८५–८६ अथवा 'हिंदुस्थान कथारसां'तील पृष्ठें ११८–२० पहावीं. तसेंच सरदेसाई मध्यविभाग २ पृ. ३३६ पहा. रामदासपंत यास राजा रघुनाथदास असा किताब होता. फरेंच सरदार डुप्ले यानें त्यास पुढें आणिलें.

२. गालीब—फार, जोराची, छाप.

३. शाहानूर—सावनूर.

लढत होते. परंतु ती जागा सिद्ध न होई, सबब नबाब सलाबतजंगास, मदतीस बोलाविलें. तेव्हां शाहानवाजखान दिवाण मुसामुसी फराशीस याजला चाकर ठेवून आणिलें व आपण फौजेसहित जाऊन पोहोंचले. तों तिकडे मुसाभुसी फराशीस जमावानिशीं तेथें येऊन दाखल झाले.

**सावनूरची स्वारी** इ. स. १७५६:—तशांत जानोजी भोंसले हेही आपसांत कलह करीत शाहानूर बंकापुरास आले. मुधोजी भोंसले यांजला पश्चिमेकडील बेचरी[१] नेमिली असतां, त्याजवर चालून जाऊन जवामर्दी चांगली करून कामकाज केलें. बेचरी घेतली. हें भाऊसाहेब पेशवे यांनीं पाहून बहुत संतुष्ट होऊन मुधोजी बावांचा पक्ष धरून नानासाहेब पेशवे यांजला मुधोजीबावांचे डेऱ्यास आणून बहुत खात्री केली. जानोजी भोंसले यांचा पक्ष नानासाहेब धरून होते. परंतु भाऊसाहेब यांनीं नानासाहेबांशीं बोलणेंत आणिलें कीं, "उभयतां बंधु भोंसले, यांचा कलह न राहतां यांची ऐक्यता करून द्यावी." मुधोजीबोवाची जवामर्दीची तारीफही फार केली, आणि पुण्यास गेल्यावर यांची वाटणी करून देऊन हिस्सा तोडावा असें ठरलें. त्या समयीं नबाब चौघे बंधु मदतीस आले होते, त्यांचे कारभारी शाहानवाजखान यांसी संदर्प पंतप्रधान यांनी लाविला जे, "भोंसले उभयतां बंधु यांचा कलह आहे तसा नबाबही चौघे बंधु यांचा कलह होईल. याजकरितां वांटण्या करून बंदोबस्त झाल्यास चांगलें आहे." याजवरून शाहानवाजखान यांणीं पंतप्रधानाचे विचारें वांटण्या ठरविल्या. सलाबतजंग वडील यांजकडे मालकी, बसालतजंग याजकडेस रायचूर, अदोनी याजकडे राहावी, कनिष्ठ निजामअल्ली याजकडे ब्राह्मणपुर[२] व अळर्जपुर वगैरे वराडांतील प्रांत राहून, याहून कनिष्ठ मोगलअल्ली याजकडेस विजापूर. याप्रमाणें वांटणीचा ठराव होऊन नवाव चौघे बंधु आपआपले स्थळास गेले, व पंतप्रधान व भोंसले उभयतां बंधुसहित पुण्यास येऊन भोंसले यांच्या वाटण्या ठरावून दिल्या.

**जानोजी व मुधोजी यांच्या वाटण्या** :— जानोजी भोंसले सेनासाहेब सुभा मालिक यांचे भाऊ साबाजी भोंसले एकोदर यांनीं दारव्हें येथें असावें. मुधोजी भोंसले यांजला सेनाधुरंधरीचा किताब त्याच वेळेस मिळून

---

१. बेचरी बुरुज ?

२. ब्राह्मणपुर—बऱ्हाणपूर.

सेनासाहेबांचे दौलतीचा कारभार यांनीं करावा असें होऊन यांचे धाकटे बंधु बिंबाजी भोंसले एकोदर यानीं छत्तीसगडास असावें. याप्रमाणें होऊन वांटण्या बितपशील:—

सदर्हू प्रमाणें जाहल्या. ते समयीं उभयतां भोंसले.

| जानोजी साहेब सेनासाहेब सुभा याजकडील. | मुधोजी भोंसले सेना साहेब धुरंधर यांजकडील. |
| --- | --- |
| १. बाबूराव कोन्हेर दिवाण ( कोल्हटकर ) | १. सदाशिव हरी दिवाण ( कऱ्हाडे ब्राह्मण ) |
| १. मुसाहेब दिवाकरपंत* ( चोरघोडे ) | १. मुसाहेब महिपतराव दिनकर ( प्रभु ) |
| २ | २ |

सदर्हू प्रमाणें नेम ठरवून बहुमान वस्त्रें शिरस्तेप्रमाणें जवाहिर देऊन, रवाना केलें, ते नागपुरास आले.

याचे आदौ नवाब चौघे बंधु वांटण्या ठरवून आपआपले स्थळास गेले. त्याजप्रमाणें नवाब निजाम अल्लीखान अलजपुरी होते, त्यांनीं मनांत आणिलें कीं, "जानोजी भोंसले सेनासाहेब यांचा आपला दांडालोंडा वराडाला लागून आहे, तेव्हां यांशी स्नेहभाव असावा, एकादे प्रसंगी उपयोगी पडतील." हें जाणून सेनासाहेबांशी संदर्प केला कीं, साबाजी बोवांनीं पांचशें लोकांनीं आपले लोंड्यावर असावें. पूर्वीं असफजहा यानी 'चिरंजीव' म्हटलें आहे तेव्हां दारव्हें वगैरेही जागा होत्या, त्याजवरून साबाजी बोवाचे नांवें ते बहाल करून दिल्हे. तशांत औरंगाबादेस सलाबतजंग याजपाशीं शाहानवाजखान कारभारी असतां, त्यानें हैदरजंगास मुसाभुशी फराशीस याचे बोलण्यांत वकिलीस ठेविलें होतें. तेव्हां हैदरजंग यांणीं, फंद मचवून आपण व मुसाभुशी एक होऊन शाहानवाजखान याजला कैद करून नबाबाची दिवाणगिरी आपण करावी हा विचार केला. ही बातमी खान मवसुफ यांस समजतांच शाहानवाजखान यांणीं आपले कबीले व शमसुद्दौला पुत्रासहित दौलताबादेस पळून गेले. हें वर्तमान बाळाजी बाजीराव पंतप्रधान यांस समजलें. शाहानवाजखानाशीं व पंतप्रधान यांशीं दोस्ती भारी, त्याजवर असा फंद केला व

* मुसाहिब—सोबती, जोडीदार.

मुसाभुशी फराशीस यांनीं या प्रांतीं राहणें ठीक नाहीं, याजमुळें पंतप्रधान यांनीं आपली जमीयत पुरी समेटून फौजेचा गाहा केला आणि जानोजी साहेब भोंसले सेनासाहेब सुभा यांजला रामचंद्र बल्लाळ वकील पंतप्रधानाकडील सेनासाहेबांकडे होते त्याचे बरोबर बोलावणें पाठविलें. तेव्हां सेनासाहेब पंतप्रधान यांजकडे जाण्याकरितां निघून चालिले. मागें प्रांताचा बंदोबस्त राहावा याजकरितां मातबर सरदार रघोजी करांडे यांजला वराडांत ठेवून गेले. नंतर नवाब निजाम अल्लीखान यांनी मनांत आणिलें कीं, सेनासाहेब सुभा पुण्यास गेले ऐसियांत इकडील प्रांत हस्तगत करावा.

**निजामावर करांडे यांचा छापा**:—याजकरितां जिनसी तोफखाना, इलाहाबादचे† मार्गे आणविला ते निबगांव* नांदऱ्यावरून वऱ्हाडांत मंजूचे बोरगांवानजीक‡ करांडे यांच्या मोहऱ्यावर आले. आणि नवाब निजाम अल्लीखान हेही जातीनें मुलकाचे पाहणीचें निमित्य करून अलजपुराहून फौजेसुद्धां कूच करून, बऱ्हाणपूरचे सुमारें जाऊन जिनशींत मिळावे याचे बेतानें येत होते. ते समयी कराडे यानीं नवाबाकडे लिहून पाठविलें की, "तुमचे व आमचे सरकारचा तह असतां जिनशी तोफखाना इकडे येण्याचें कारण काय ?" त्याचें उत्तर नवाब यांनी लिहून पाठविलें की, "असेल तें उदयीक समजेल." या तऱ्हेचें पत्र पाहून करांडे यांनीं मनांत संशय मानून फौजेसहित रातोरात जाऊन जिनशीवर छापा सन ११६५ चे साली घातला. जिनशी दरोबस्त लुटून टाकिली. नवाबाकडील लोक जायां जखमी फार झाले. हे वर्तमान नवाब निजाम अल्लीखान यांस समजल्यावरून करांडे याजकडे सांगून पाठविलें की, "स्नेहाचे जागी असें करणें चांगलें कीं काय ?" याचें उत्तर करांडे यांनीं पाठविलें की, "आम्हीं अवल आपणांस विनंति केली असतां तुमचे ध्यानास आलें नाहीं, आतां तरी आपण जलदी करून संभाळून अलजपुरास जावें, नाही तर आम्हांकडील सरदार लोक यांची उमेद भारी आहे, यांतून काय निघेल हें समजत नाही. याजकरितां आपण अलजपुरास जात असल्यास, तुमचे जातीस आमचे फौजेचा उपद्रव न लागावा, यास्तव

† एदलाबाद असें पाहिजे.
* हल्लींच्या नांदूरा स्टेशनजवळ. बुलडाणा जिल्हा.
‡ वऱ्हाडांतील बोरगांव रेलवे स्टेशन. आकोला जिल्हा (सं.)

आपलेकडील स्वार तुम्हांबरोबर देऊन पोंहचवून देतों." हें नवाबास मंजूर झाल्यावरून करांडे यांणीं दोनशें स्वार बरोबर देऊन अलजपुरास पोंचतें केले.

**निजाम व भोंसले यांचा साठचाळिसीचा तह**:—यानंतर शाहानवाजखान दौलताबादेस आले होते याजमुळें पंत प्रधानाचे फौजेची तयारी सेनासाहेबांसुद्धां झाली. हैदरजंग व मुसाभुशी फराशीस यानी जाणून, दौलताबादेहून शाहानवाजखान दिवाण याजशी सख्य करून आणिलें, ते नवाब सलाबतजंग याजजवळ येऊन, औरंगाबादेस दाखल झाले. हें पंतप्रधानास समजतांच सेनासाहेब सुभा यांजला माघारे वऱ्हाडांत रवाना करून दिल्हे. ते वऱ्हाडांत येऊन दाखल झाल्यावर करांडे यांनीं मजकूर जिनशी वगैरेचा नवाबाचे फंदाचा समजाविला. याजवरून सेनासाहेब यांजला रोष येऊन अवघ्र वऱ्हाड प्रांताची तहसील घेऊं लागले, याजवरून नवाब निजाम अल्लीखान यांणी जानोजी भोसले सेनासाहेब सुभा यांशी पुन: सख्य करून, सुलतानखान पन्ही यांचे विद्यमानें साठचाळीशीचा तह केला. उपरांतिक नवाब सलाबतजंग यांनी शाहानवाजखान यांचे सहायानें नवाब निजाम अल्लीखान यांजला औरंगाबादेस बोलाविले याजवरून फौजेसुद्धां जाऊन तेथें, सर्वत्रांच्या भेटी झाल्या. शाहानवाजखान व नवाब निजामल्ली यांची मसलत होऊन हैदरजंगास कैद करावें, हा विचार ठरवून नवाब निजाम अल्लीखान यांनी हैदरजंगास बोलाऊं पाठविलें. याजवरून पंधरा सोळा हजार गारदी समागमें घेऊन नवाब जवळ आले. बाहेर घेरा घालून आपण डेऱ्यांत एकांतास गेले. ते समयी नवाबाकडील राजेबहादुर विठ्ठल सुंदर* दिवाण व मीर मुसाखान व रुकनुद्दौला व मसीरमुलुक मोराबजंग असे होते. या प्रसंगी हैदरजंग याजला जिवें मारिलें. त्याचा खिजमतगार एक होता तोही मारला. भोंताला घेरा गार्दी यांचा सबब एक एक युक्तीचे मार्गानें नवाबाचा एकांत होतो म्हणून निघाले. नंतर राजेबहादूर यांनी कनात कापून नवाबास काढून दिले. ते पायउतारा रामचंद्रराव जाधव यांचे येथें येऊन खंडागळे व निंबाळकर आदि करून जाधवरावसहित आपलेकडेस मिळवून घेऊन, बऱ्हाणपूरचे सुमारें निघाले. जमाव नवाबाकडील मातबर जाहला.

---

* विठ्ठल सुदर—हा साडेतीन शहाण्यांपैकी एक. सरदेसाई मध्यविभाग २ पहा.

तिकडेस औरंगाबादेस हैदरजंग मारल्यामुळें मुसाभुशीनें विक्षेप मानून शाहानवाजखान दिवाण यास मारिलें.

**बुसीचें कारस्थान**:—नंतर मुसाभुशीनें विचार पाहिला कीं, आम्हीं दिवाणास मारिलें यावरून पंतप्रधान आपल्या फौजेनिशीं चालून येतील. नवाब निजामअल्लीखान यांचाही जमाव मातबर हे जमावानिशीं आपल्यावर येत आहेत, सबब नवाब सलाबतजंग याजला आपले काबूंत घेऊन गोवळकुंड्याचे किल्ल्यावर जाऊन लढाई केली. किल्ला हस्तगत झाला. इतक्यांत नवाब सलाबतजंग मुसाभुशीचे काबूतून निघोन पळून गेले. ते तेलणीचे घरांत लपले. तेथें मुसाभुशीनें शोध केला परंतु ठिकाण लागला नाहीं. तेव्हां मुसाभुशीनें विचार केला कीं, नवाब सलाबतजंग आपले स्वाधीन, नाहीत, व निजाम अल्लीखान आणिकही सरदार मातबर एकत्र होऊन चालून येतात; तेव्हां आपला परिणाम शुद्ध नाहीं. हें समजून आपली फौज समेटून मुसाभुशी निघोन आपले मुलकास गेले. इकडे नवाब निजामअल्लीखान फौजेसुद्धां हैदराबादेस येऊन आपला अंमल बसविला. आणि सलाबतजंग धरले. ते बेदरचे किल्ल्यांत कैद केले असतां तेथून देगेंत‡ बसून पळत होते, ते पुनः धरून आच्छादून ठेविले. नंतर नवाब निजाम अल्लीखान मालिक झाले. दिवाणगिरीचा कारभार राजे विठ्ठल सुंदर बहादर करूं लागले. त्या वेळी सोराबजंग मशीरुलमुलक याजकडे औरंगाबादचा सुभा बमै अलजपूर सांगितला. त्यांनीं जातीनें औरंगाबादेस राहून अलजपूरचे कामावर राजारामपंत यांजला पाठविलें. ते अलजपुरास पोंहचून सेनासाहेबाकडील " साठ चाळसी " चे अंमलास रवाना ( ? ') करूं लागले. याजवरून सेनासाहेब यांनीं राजाराम पंतास युक्तीनें भेटीस बोलावून, त्याचें पारिपत्य केलें.

नंतर मोंगलअल्लीनीं पंतप्रधानाकडे संधान लाविलें कीं, नवाब सलाबतजंग आम्हां चौघा भावांमध्यें मालिक असतां, याजला कैद करून नवाब निजाम अल्लीखान मालिक झाले, हें चांगलें नाहीं. याजकरितां तुम्हीं मदत करावी; आम्ही तुम्हांकडेस येतों. म्हणोन संदर्प लावून पुण्यास आले. तों नवाब निजामअल्लीखान यांनी पंतप्रधानाशीं सख्य करून इषारा केला कीं, मोंगलअल्लीस तुम्हीं कैद करून फंद तोडावा. याजवरून पंतप्रधानांनीं मोगल-

‡ देग—मोठें भांडें.

अल्लीस कैद करून नवाब निजाम अल्लीखान याजकडेस पाठवून दिलें. आणि मोगलअल्लीखान याजकडील प्रांत बिजापूर वगैरे येथें फौजा पाठवून पंतप्रधान यांनीं आपला अंमल बसविला. हें नवाबांस कळल्यावरून पंतप्रधानाकडे वकील पाठवून बोलण्यांत आणिलें कीं, "आमचाच मुलुक घेऊन, आमचेशीं सलूक दाखवून उपकार दाखवितात यास काय म्हणावें ?" असें बोलून नवाब निजामअल्लीखान यांणीं आपला प्रांत विजापूर मागितला. तेव्हां पंतप्रधान मुलुकाविषयीं बळकटीस येऊन जबरीच्या गोष्टी सांगूं लागले. याजवरून कलह उभा राहिला. सबब परस्परें उभैता राशतदारात मजीना होऊन आपलाले जागी तयारी करूं लागले.

तशांत शाहानूर बंकापूरची स्वारी करून पंतप्रधान पुण्यास आल्यावर उभैता बंधु यांच्या वाटण्या ठरल्या कीं, सेनासाहेब यांजकडे वराड प्रांत व गोंडवान व देवगड व ओडीसा कटक, यांतून सेनाधुरंधर यांजकडेस चंद्रपूर जागा जातीस राहावयास नागपूरचे बरोबरीचें स्थल नेमिलें व सीरपूर चामोरसी[1] जुनगांव व वणी, वरूड व माणिकगड व नेरीगोदड व सेगांव भांदक असे महाल, वराडांतील अडगांव, आकोट, व जलगांव जामोद व, मोगलाई माहालांपैकीं एदलाबाद व कायरबोरी हे माहाल कटकाऐवजीं व मख्सुदाबादचे खंडणी ऐवजीं पटणें प्रांतीं पंतप्रधानांनीं फौज मदतीस देऊन अंमल बसवून, सेनाधुरंधरीकडेस द्यावा. याप्रमाणें ठरलें होतें त्या अन्वयें निश्चयांत येऊन पंतप्रधानाचा निरोप दिला. शिरस्तेप्रमाणें वस्त्रें बहुमान जवाहीर वगैरे देऊन, सेनासाहेबांस निरोप दिल्हा. ते वेळेस दिवाण दिवाकरपंत व रखमाजी गणेश चिटणवीस यांजला कारभारी मुत्सद्दीसुद्धां निरोप घेऊन जानोजी भोंसले सेनासाहेब सुभा वराडांत आले.

**कृष्णाजी गोविंद**:—तेव्हां वराडचा सुभा भास्करराम याचे स्त्री ताई[2] तिजकडेस सुभ्याचें काम चालत होतें, तिजकडून वहिवाटीस कृष्णाजी गोविंद वहिवाटदार वहिवाट करीत होते. तशांत पंचगव्हाणक

१. चांदा जिल्ह्यांत.

२. ताई—भास्करपंत कोल्हटकर यांची स्त्री ताईबाई ही काशीस होती व तिच्या नांवानें कारभार कृष्णाजी गोविंद पाहात असे, ते वऱ्हाडांत पातूर नंदापुर येथें रहात असत. लेख २ पृष्ठ ११ पहा.

जमेदार व पिंजरकर जमेदार यांस आपसांत सोयरीकीचा किसा उभा जाहला. तेव्हां कृष्णाजी गोविद यांणी पिंजरकराचा पक्ष धरून पंचगव्हाणकर जमेदारास नशियत करून कैद केलें व इजा फार दिल्ही. सरकार ताकीद केली असतां मानली नाहीं. याजवरून सेनासाहेबांचे मनांत विकृति आली. कृष्णाजी गोविंदाविषयीं विकृति मनांत येऊन वराडचे सुभ्याचें काम मानसिंगराव मोहिते यांजकडे नेमिलें, वस्त्रें दिली. त्याची वहिवाट त्रिंबकराव कोन्हेर परभू यांजकडे सुभ्याची वहिवाट सेनासाहेबांनीं सांगून, भरंवशाचे जाणून नेमस्त केले. कटक सुभा शिवभट साठे याजकडे पेशजी पासून होता तोच त्यांजकडे बहाल ठेविला. छत्तीसगडास मोहनसिंग भोंसले सरकारचे लेकवळे होते तेथेंच ठेविलें. नागपुरास जातीनें राहून बंदोबस्त ठेविला. मागाहून मुधोजी भोंसले सेनाधुरंधर याजला बाळाजी बाजीराव पंतप्रधान व भाऊसाहेब पेशव्यांनीं निरोप देऊन रवाना केलें ते वेळेस सेनाधुरंधर यांचे दिवाण सदाशिव हरी व शंकराजीराम चिटणवीस मुखत्यार कारभारी व महिपतराव दिनकर यांसही वस्त्रें देऊन रवानगी झाली. त्या काळीं जेहुराहून चिमाबाई साहेब, यांजला सेनाधुरंधर यांनी बोलाविलें. ते वेळेस बाईसाहेब प्रसूत झाल्या. कन्या दुसरी ठकूबाई झाली. त्या प्रसंगीं सेनाधुरंधरांचे येथें खर्चाची अडचण झाली, व सदाशिव हरी दिवाण यांस बोलण्यावरून पेंच आला सबब ते रहित झाले. ते वेळेस गायकवाड यांचे पदरचे मातबर गृहस्थ मोरोपंत व रामजी केशव यांसीं व महिपतराव दिनकर यांसीं परम स्नेह याजकरितां सेनाधुरंधर यांसीं भेटवून मोरोपंताजवळून पावणेदोन लाख रुपये रसद घेतली व रामाजी केशव यांजपासून पाउण लाख रुपये एकूण अडीच लक्ष रुपये घेऊन, फडणविशीचें काम उभैतांचे स्वाधीन केलें. हर दोघां जणांचा हिस्सा शराकत आपलाले रसीदीप्रमाणें करून कारभार दोघांनीं करावे असें ठरलें. तसेंच मुकुंद बाबाजी परभू यांजपासून पन्नास हजार रुपये रसद घेऊन जामदारखान्याचें काम सांगून, कूच करून निघावें. तशांत काशीराव लक्ष्मण परभू हे धाकटे राणी शाहूमहाराजांची इजपाशीं येऊन, सेनाधुरंधर यांची स्वारी दादासाहेब पेशवे याजबरोबर आंग्रे प्रांतीं गेली. याजवर सेनाधुरंधराशीं ढालेवरून कलह उभा राहिला. ते वेळेस पेशवे यांजकडील कारभारी सखारामपंत ( बोकील ) पुरंदरे यांजकडील यांणीं

सेनाधुरंधर भाऊसाहेबांचे पक्षांतील जाणोन नकुच ( क्षुल्लक ) गोष्टीवरून किस्सा वाढवून, दादासाहेबांशीं व याशी विरुद्ध आणिलें.

**नांदगांव रहाटगांवची लढाई** इ. स. १७५९:—सबब सेनाधुरंधर आपले फौजेसुद्धां कूच करून दक्षिण प्रांतीं येऊं लागले. तों मार्गांत पारोळेकर यांनीं मेजवानीकरितां बोलावून कैद करावें आणि आपले कर्जाचा फडशा करून घ्यावा असा निश्चय केला. बातमी समजली यावरून, मेजवानीस गेले नाहीत. शूळाची बाधा आहे म्हणून निमित्य करून रात्रीस कूच करून वराड प्रांतीं आले. ते सेनाधुरंधराकडील मोरोपंत फडणीस यांची फौज वराडांत आकोटाजवळ होती, त्यांत येऊन दाखल झाले. जानोजी भोंसले सेनासाहेब सुभा यांणीं पूर्वी दादासाहेबांचा व सेनाधुरंधरांचा बिघाड झाला हे ऐकून सेनाधुरंधराचे झाडून प्रांतांत आपलें ठाणें बसविलें. एक चंद्रपूर राहिलें. वरकड माहाल वराड गोंडवण सुद्धां जागजागीं टाणें दाखल झालें. त्यांत शिरपूर, जुनगांव, हरशी, गड चामोरसी इतके राहिले. तेव्हां सेनाधुरंधर यांणी महिपतराव दिनकर यांशी विचार केला की, आतां कसें करावें ? सदाशिव हरी पारोळेकर याजकरितां मोरोपंत आणिले, आणिक विचार कित्येक चित्तांत आणून तशांत सदाशिव हरीही सेनासाहेबांकडे गेले. तेव्हां सेनाधुरंधर यांनी मोरोपंत वगैरे सरदार आणिक नवीन ठेविले. रघोजी करांडे सेनासाहेबांकडे होते त्यांशी पैगम करून मिळवून घेतले. तेव्हां ते आले. त्यांचे पाठीमागें आणीकही सरदार सेनाधुरंधरांकडे आले. तेव्हां फौज पस्तीस हजार जमाव झाला व सेनासाहेबांकडे आठ दहा हजार फौजेचा जमाव राहिला. याजकरितां दिवाकरपंतांनी पिराजी नाईक निंबाळकर सहा हजार फौजेनिशी देशीहून बोलाविले. रघोजी करांडे वगैरे सरदार सेनाधुरंधराकडे गेले. उमाजी विनायक आपले घरीं होते त्यांजला जानोजी बोवांनीं आणून जमाव सुद्धां आपलेकडेस ठेविले. ते समयीं राहाटगांव नांदगांव परगणे उमरावतीजवळ तेथें लढाई उभैता बंधू भोंसले यांशीं झाली. ते काळीं एक जर्दा घोडा रघोजी करांडे यांचे बसत्या घोड्यासारखा होता तो बिनस्वारानिशीं सुटला. त्याजमुळें लढाईचे प्रसंगीं एकच गुल जाहली कीं, रघोजी करांडे कामास आले. यावरून फौज सारी हालचाल झाली. याजवरून सेनाधुरंधराचा मोड होऊन

मोरोपंत फडणीस सेनासाहेबांकडे पाडाव गेले. पुन्हां सेनाधुरंधर व करांडे यांनी सांवर धरून दुसरी लढाई घेतली. मोरोपंत वगैरे पाडाव गेले होते ते माघारे आणिले, उपरांतिक खर्चाची अडचण भारी असें पाहून सेनाधुरंधर यांणीं महिपतराव दिनकर यांचे विचारें नाना व भाऊ पेशवे याजकडे रामाजी केशव याजला पाठविलें कीं, आपण वाटण्या करून दिल्या असतां कांही एक दिवस आमचा अंमल या प्रांती होऊन पुन्हां सेनासाहेब, आपलें ठाणें बसवून पुडावा करितात. याप्रमाणें पत्रें लिहून पाठविलीं. यांणीं जाऊन बोलण्यांत आणिलें. परंतु नानासाहेबांचा पक्ष जानोजी बोवा-कडेस व भाऊसाहेबांचा पक्ष मुधोजीबोवांस याजमुळें बोलतां नये. याजवरून रामाजी केशव यांचें बोलणें मान्य पडलें नाहीं. तितक्यांत लाहोराकडून दादासाहेब स्वारी करून माघारे फिरले ते माळवे प्रांतांतून नागपुराकडे येण्याचा रोख धरिला. कारण जानोजीबोवांची फौज समागमें नेमिली असतां घर कलहाचे अडचणीमुळें हरवक्त पोंचले नाहीत व मुधोजी भोंसले समागमें गेले असतां, अनबनाव होऊन माघारे आले हें कुन्हें[१] पोटांत आणून नागपुरावर येण्याचा रोख धरिला. तेव्हां सेनासाहेब यांनीं देवाजीपंतांस दादा साहेबांकडे उज्जनीस रवाना केलें. मागाहून आपणही जमावासुद्धां गेले. ते वेळेस हुशंगाबादेपर्यंत जाऊन, तोफखाना वगैरे सरंजाम हुशंगाबादेचे पलीकडे, घाटावर टाकिला. तेथें अवधूतपंत ठेविले आणि आपण दादासाहेबांकडे गेले. भेटी होऊन बहुता प्रकारें बोलणीं निखालसपणें जाहलीं, आणि दादा-साहेबांनीं पुण्याकडे निघण्याचा निश्चय केला. सेनासाहेब निरोप घेऊन नागपुरास येण्याचा निश्चय करून दरकूच आले. तो इकडेस कारखाना ठेवून गेले होते त्याजवर भोपाळवाल्यांनीं गर्दी करून लुटले. अवधूतपंत त्या प्रसंगीं कामास आले. भोपाळवाल्यांनीं तसनस[२] केली; हें सेना-साहेबांस समजलें. परंतु तसेच दरकूच नागपुरास जाऊन पोंचले.

सन १२६७ चे सालीं मुधोजी भोंसले सेनाधुरंधर याचे धाकटे बंधु बिंबाजी भोंसले एकोदर देशीं जेउरांत होते ते सनमजकुरीं सेनाधुरंधरांजवळ चंद्रपुरास येऊन दाखल झाले. त्याचे वाटणींत छत्तीसगड सेनाधुरंधराचे इलाख्यांतील प्रांत हा पेशजी वाटणी होतेसमयीं देण्याचें ठरलें होतें. त्याचे

१. कुत्सित गोष्ट २. नुकसानी

दिवाण देशांत पहिले नीलकंटराव होते, त्याशीं बेबनांव होऊन धोंडो माहादेव आमदानगरचे राहणेवाले, त्याजला दिवाणगिरी होऊन, कांहीं एक दिवसांनीं छत्तीसगडास रवाना केले. त्याजबरोबर दिवाण मशारनिल्हे व कृष्णभट उपाध्ये ( तुगरकर ) व बक्षी रामचंद्रपंत व मुजुमदार माधवराव रामचंद्र व फडणवीस हरबाजीपंत व सरदार मंडळी महमदखान तरीज व कादरदाद-खान व जानोजी सरदार व सुलतानजी पवार व बापू बावर व कुनाजी सांबळे व कृष्णाजी मोहते व भाऊजी अहिरराव व त्रिंबकजी अहीरराव व महादजी भोंसले व मोठे रघोजी भोंसले यांचे लेकवळेपैकीं एक शिवाय किरकोळ लोक आणिक याप्रमाणें मंडळीसहित मशारनिल्हे छत्तीसगडास जाऊन त्या प्रांतीं बंदोबस्त करून होते.

**पानपतची लढाई** इ स. १७६१:—त्यानंतर दादासाहेब पुण्यास पोंचले. त्याजवर फौजेची देणें स्वारीची कर्जदारी झाली म्हणोन दादासाहेब बोलले, यावरून भाऊसाहेब बोलले कीं, "परमुलकांत जाऊन कर्जदारी करून आल्यावर फौज तरी कशास वागवावी ?" याजवरून नानासाहेबांस रोष येऊन बोलले, जे, "त्यांणीं काय पाहिलें ? जो कोणी कर्ज न करील त्याजला पाठवून बंदोबस्त करावा." याजवरून भाऊसाहेब बोलले कीं, "आम्हीच जातों" भाऊसाहेब तयारी करून निघाले. त्यांनीं सेनाधुरंधर याचा अभिमान धरून पांच हजार फौजेनिशीं समागमें न्यावें असें ठरलें. बहुता रीतींनीं भाऊसाहेबांस, नानासाहेबांनीं समजाविलें, परंतु ऐकलें नाहीं. तेव्हां नानासाहेबांनी आपले वडील पुत्र विश्वासराव समागम दिले, व दमाजी गायकवाड पंचवीस हजार फौजेनिशीं व मल्हारजी होळकर चाळीस हजार फौजेनिशी व जनकोजी शिंदे व दत्ताजी शिंदे यांचे चिरंजीव वीस हजार फौजेनिशीं व शिवाय हुजुरात फौजेचा जमाव भारी करून निघाले. ते समयीं दौलताबाद व बऱ्हाणपूर वगैरे नवाबापासून लुटून घेऊन तसेंच हिंदुस्थानांत जाऊन, त्या प्रांतीं दंगा भारी केला. याजमुळें तेथील पातशाहा निघोन पटणाकडे गेले. ते वेळेस कटक, मकसुदाबाद* प्रांतीं कैलासवासी रघोजी भोंसले याजपासून सुभे शिवभट साठे होते, तिकडे त्यांनीं मकसुदाबाद प्रांतीं चार वर्षें खंडणी मिळाली नव्हती, सबब पादशाहा

* मुर्शिदाबादचें जुनें नांव.

तिकडे जाण्याचे संधींत उपद्रव करून होते. तितक्यांत पातशाहा तिकडे आले, त्यांनीं सेनासाहेबांकडील मातबर सरदार जाणून सरफराज करून पातशाही फर्मानें[१] सेनासाहेब यांचे नांवें करून दिलीं; व सरदारांस आपलेसें करून घेतले. तिकडे हिंदुस्थानांत गिलचे वगैरे फौजेशीं लढाई होऊन भाऊसाहेब सन ११६९ चे सालीं गारद झाले.

मुधोजी भोंसले याचा निश्चय जाण्याचा होता, परंतु घर कलहामुळें पोंहोचणें झालें नाहीं. घरचा विचार पाहतां चंद्रपुरास फंद होऊन आबाजी भोंसले व गंगाधरपंत कामदार बेरूख[२] दिसले. पुनः सेनासाहेबांशीं कलहास प्रारंभ झाला सारा मुलुख जानोजी बोवांनी आटोपला एक चंद्रपूर बदलून राहिला.

तितक्यांत भाऊसाहेब हिंदुस्थानांत बुडाल्याचें वर्तमान आल्यावरून, नानासाहेबांनीं फौजेची तयारी करून निघाले. समागमें दादासाहेब कारभारी असे फौजेचे जमावांनीं पुण्यांतून निघाले, ते बऱ्हाणपूरचे सुमारें आले. तेव्हां जानोजी भोंसलेही नागपुराहून जमावासहित गेले. पंतप्रधान व यांच्या भेटी उज्जनींत माहांकाळेश्वराचे तेथें झाल्या. नानासाहेबांची प्रकृति विघडली. दादासाहेब कारभार करून होते जानोजी भोंसले हे सेनासाहेब सुभा यांजला वस्त्रें व जहागीर व रूपगण हत्ती देऊन सन्मानें करून माघारे रवाना केलें, ते नागपुरास आले.[३]

**पेशव्याविरुद्ध कट** इ. स. १७६१:—नंतर नानासाहेब पंतप्रधान यांचा काल तिकडे जाहला. याऊपर दादासाहेबांनीं माधवराव पेशवे यांस पंतप्रधानाचीं वस्त्रें देवविलीं. पुण्यास सखारामबापू व पुरंधरे[४] कारभारी यांणीं देशस्थ नारो शंकर व विठ्ठल शिवदेव वगैरे यांस वाढविलें; याजवरून चित्तपावन लोकांचे मनांत विकृति आली. तशांत रघुनाथराव दादासाहेब पेशवे यांजला पुत्र जाहला होता त्याचें नांव भास्करराव त्याचे नांवें प्रतिनिधीच्या पदाचीं वस्त्रें श्रीमंत महाराज राजाराम[५] छत्रपति यांजपासून आणविलीं हें पाहून कदीम प्रतिनिधि[६] हेही खिन्न होऊन छत्रपतीशीं राज-

१ हुकूम. २ बेरूख–बदलेले. ३ वास्तविक जानोजीनें यानंतर बुंदेलखंडांत बंदोबस्त केला. ४ निळकंठ महादेव पुरंधरे.
५ रामराजे. ६ कदीम—जुने. भवानराव प्रतिनिधि.

कारण करून, तिकडील संदर्प घेऊन नबाबाकडेस गेले व गमाजी बाबा यमाजी शिवदेवाचे चिरंजीव याजला प्रतिनिधीनीं जानोजी[१] भोंसले सेनासाहेबसुभा याजला अनुकूळ करून घेण्याकरितां पाठविलें. ते येऊन सेनासाहेबासीं बोलण्यांत आणिलें कीं, महाराजांस पंतप्रधान यांणी कैद-बतरीखन[२] आणि आपण दौलतीची वहिवाट करितात याजवरून छत्रपतीनी प्रतिनिधि यांजला नबाबाकडे पाठविलें व मजला प्रतिनिधींनीं महाराजांचे आज्ञेवरून आपणांकडे, पाठविलें आहे, त्यास तुम्ही महाराजांचे चरणीं लक्ष ठेवून पंचवीस हजार फौजेनिशी नबाबास अनुकूल व्हावें, व पंतप्रधानाचें पारिपत्य केल्यास पेशजीपासून तुम्हांकडेस वराड, देवगड, चांद, बंगाला कटक, मकसुदाबाद[३], पटणें वगैरे हे प्रांत आहेतच याशिवाय सांप्रत किल्ले लोहगड, सिंहगड, परळी, पुरंधर शिवाय फौजेचे खर्चास नवीन पाऊण कोटींचा सरंजाम, नर्मदातीरीं मंडले वगैरे शिवाय नेमाड देण्यांत येईल. असा बोलण्याचा ठराव करून, असें राजपत्र देऊन पाठविलें. ते सेनासाहेबांस देऊन नबाबाकडे येऊन जाण्याचा निश्चय केला. तशांत विठ्ठल सुदर राजेबहाद्दर नबाबाकडील याजकडीलही संदर्प आला, जे तुम्हांस हल्ली मदत खर्च व दरमहा दोन लक्ष रुपये व पुढें जें प्राप्त होईल त्यांत निम्मे हिस्सा तुम्हांस देण्यांत येईल असें होऊन सेनासाहेबांसहित व कारभारी दिवाकरपंत मिळोन कूच करोन नबाबाकडेस गेले व बाबूराव फडनवीस व मोरोबा यांचे पुत्र गोपाळराव मिरजकर असे सारे नबाबाकडेस मिळाले जमीयत नबाबाची भारी जाहली.

**भोंसले कटांत सामील**:—मुधोजी भोंसले सेनाधुरंधर चंद्रपुरीच होते. चंद्रपूर बदलून आबाजी भोंसले व गंगाधरपंत कारभारी यांनी बलवा[४] करून सेनाधुरंधर याजला बाहेर काढिलें ते वेळेस लढाई होऊन यांचे कारभारी मोरोपंत फडणवीस यांजला गोळ्या लागून जखमी झाले. त्यांजला घेऊन सेनाधुरंधर सीरपुरास गेले त्या समयीं महिपतराव सुभेदार कारभारी केले. सिरपुरास गोंदाजीपंत कारभारी देशमुखाचे मुखत्यार होते त्यांणीं स्थल दिल्हें. तेथें मोरोपंताचा काल जाहला. रामाजीपंत फडनविसाचे हिस्से

---

१. धाकटे रामराजे यांचें चरित्र पृष्ठ १३ पहा.
२. कैदेसारखे ३. मुर्शिदाबाद (बंगाल)
४. दंगा, गर्दी

सराकत तेही यापूर्वी चंद्रपूरचे दंग्याचे आगाऊ जानोजी बोवांसीं बिघडले होते, म्हणोन दादासाहेब यांजकडेस पाठविले होते कीं, नानासाहेब भाऊसाहेब पेशवे यांणीं वाटण्या करून दिल्ह्या असतां सेनासाहेबांनीं सारें आटोपिलें. यावरून रामाजी केशव तेथेंच होते. तशांत यापूर्वी सेनासाहेबांशीं आबाजी भोंसले व गंगाधरपंत यांणीं किल्ला चंद्रपूरचा साहा महिने भांडविला. हस्तगत न झाला. तेव्हां नबाबाकडे जाण्याची निकड जाणोन, सेनासाहेबांनीं आपले तर्फेनीं तुळजोपंत व मजीदखान रोहिले ( शिवणी ) छपारेवाले असे पांच हजार फौजेनीं चांद्याचे शहावर ठेवून आपण नबाबाकडे व विठ्ठल सुंदर राजेबहाद्दर यांजकडेस गेले. दिवाकरपंत दिवाण व भवानीपंत मुनसी व चिमणाजी रखमांगद चिटणीस वगैरे सर्व मंडळी गेली. सेनाधुरंधराचे दिवाण सदाशिव हरी, आबाजी भोंसले मातबर माणूस यांचे खातरजमेस. सदाशिव हरीशीं व सेनाधुरंधराशी वांकडें पडलें. सबब ते सेनासाहेबांपाशीच होते. त्यांजला वराडचे पलीकडेस जाऊन मागती चंद्रपुरास पाठविलें. चंद्रपुरीं भोंसले मशारनिल्हे कारभारी गंगाधरपंत हे चंद्रपुराचे किल्ल्यांत, सबब सांगून पाठविलें कीं, किल्ला आमचे स्वाधीन करावा, तुम्ही आमचेच आहांत, बारा हजारांची जहागीर तुमचे जातीस देवितों, शिवाय शंभर स्वारांचा सरंजाम. याप्रमाणें बोलणें करावयास आले ते चंद्रपुराचे माहांकाळी, देवीजवळ उतरले. तशांत यापूर्वी आठ दिवस सेनाधुरंधरांनीं आबाजी भोंसले व गंगाधरपंत यांजकडेस महिपतराव दिनकर यांजला सिरपुराहून पाठविलें कीं, आम्हांशीं बदललां तरी चिंता नाहीं, आमचेच आहांत, आमचें नांव राखून जानोजी बोवासीं लढलां, तसेंच तुळजोपंताशी व मजीदखान यांसी लढावें, कायमता असावी. असें महिपतराव बोलत असतां सदाशिव हरी माहांकाळी देवीजवळ येऊन पैगाम केला. आबाजीबाबा व गंगाधरपंत नरम झाले. हें महिपतराव दिनकर यांस कळतांच विचार केला चांद गेले म्हणजे ठिकाण पुनः नाहीं. दिवाणही तिकडेसच मिळाले, तेव्हां सदाशिव हरीस महिपतरावांनीं चिटी लिहिली, कीं, सेनाधुरंधरांचें म्हणणें तूं मशीं पैगाम करणें, जें तुमचे मार्फतीनें जानोजी बोवासीं भेटून लोभ संपादावा असें आहे, तेव्हां सेनाधुरंधर यांस घेऊन जाऊन त्याचा प्रेम करून द्यावा, हें सहायश आपण घ्यावें, अशी चिठी फुलाचे पुडयांत घालून पाठविली ते दिवाण-

जींनीं पाहून बहुत संतोष झाले. त्याची खातरजमा जाहली कीं, महिपतराव याचे स्वाधीन सेनाधुरंधर, जसे हे करवितील तसेच ते ऐकतील, हें पहिलेपासून ध्यानांत व वागणूक सर्व प्रकारें माहीत याजवरून सदाशिव हरीची खात्री होऊन महिपतराव किल्ल्यांत निघोन सदाशिव हरीस भेटून त्यासीं पक्काईत ( पकायत ) केली कीं, चांदा येथील सुभेदारी तुमचे बंधु विष्णु हरी यांस देऊन दिवाण तरी तुम्हीच आहांत सर्व कर्तृत्व तुमचेंच आहे. हें सर्व यश आपण घ्यावें. याजवरून, सदाशिव हरी सिरपुरास येऊन; महिपतराव याचे मार्फतीनें कित्येक जाबसाल करून आपासाहेबांस काढलें. आपासाहेब पल्ल्यावर येईनात, ते बळें आणून गोंदाजीपंतास आपासाहेबांनीं सांगितलें कीं, महिपतराव घेऊन जातो, दिवाणासीं सख्यत्व आहे, तें जाणोनच आहांत. जानोजी भोंसले याचा प्रकार लक्षांत आहे. मुलालेंकरांचा सर्व भरंवसा तुमचा आहे हा महाल व तुम्हीं आम्हांकडे राहिलांत त्याप्रमाणें असावें. आम्ही तरी महिपतरावाचे विश्वासावर जात आहों. याचें म्हणणें कीं, जानोजीबोवा पन्नास हजार फौजेनिशीं नबाबाकडेस मिळाले. जमाव भारी, प्रतिनिधि आदि करून राजमंडळास मिळाले. तेव्हां ही दौलत नबाबाकडे गेली. जानोजीबाबा प्रबळ, आपल्यास ठिकाण लागणार नाहीं. आतां घरांतील समेट करतां बरें आहे. उपाय नाहीं अनायासें ओघ आला. दिवाणजी जानोजी बावाकडे आहेतच व आबाजी भोंसले व गंगाधरपंत मिळून चंद्रपूर स्वाधीन करणार, तेव्हां जिकडे चंद्रपूर तिकडे सिरपूर, ही मसलत अवघड. यावरून आतां समेटच घेणें उत्तम आहे. या बोलण्यावरून गोंदाजीपंत यांची खातरजमा करून मजीदखान रोहिले व तुळजोपंतास लिहिलें कीं, चांदा यावर कायम राहणें. आणि आपण तैलंगणांतून महिपतराव यास बरोबर घेऊन जानोजी बावाकडे चालले.

तंव बालेघाटावर तुळजापूरचे जिल्ह्यांत राघोबादादा पेशवे पंचवीस सव्वीस कोसांवर होते, त्यांचीं पत्रें घेऊन रामाजी केशव यांणी सांडणीस्वार दादासाहेबांचे पाठविले. त्यांत मजकूर जे, सर्व बंदोबस्त करून तुमचे, मुलखांत फौज मदतीस देऊन तुमचा अंमल बसवून देतों, व येथें आल्यावर खर्चासही देतों, फौज ठेवावी सेनासाहेब सुभा तुम्हांसच देण्यांत येईल, अशीं पत्रें व शिरपेंच कंठी वस्त्रें वगैरे बहुमोल दादासाहेबांनीं सेनाधुरंधरांस पाठविलीं,

त्याजवरून मर्जी सेनाधुरंधराची झाली कीं, आपण दादासाहेबांकडेस जावें, ते वेळेस महिपतराव दिनकर याणीं सल्ला दिल्ही कीं, राजमंडळाचे अवग्र मातबर सरदार नबाबाचे मसलतीस अनुकूळ आहेत. त्यांचा जमाव भारी. महाराज छत्रपतीचा आधार. तेव्हां आपण इकडेस जाणें सल्ला नाही, तसेंच सेनासाहेब यांणीं मनांत आणिलें कीं, आपला करार पंचवीस हजार फौजेनिशी सामील असावें त्यांत आपले जवळ जमाव कमती आहे, सबब सेनाधुरंधर यांजकडेस संदर्प पाठविला की, तुमचा बंदोबस्त करून देण्यांत येईल, तुम्हीं इकडेस यावें. यावरून सेनाधुरंधर यांचे मनांत पेशजी जाण्याचा विचार होतांच तशांत, पत्रेंही आलीं याजवरून सेनासाहेबांकडेस कूच करून गेले. दादासाहेबांकडेस पत्राचें उत्तर पाठविलें कीं, आपले भरंवशावर आम्ही आलों. तेव्हां आपलेकडेस जलदी येऊन पोंहचतों. याप्रमाणें पत्रें रवाना करून कूच करून आपण सेनासाहेबांकडे गेले. भेटी झाल्या. पाहून तर संतोष झाला आणि बोलले की, सदाशिव हरी दिवाण व महिपतराव दिनकर यांणीं ही गोष्ट चांगली केली, आपसांत समेट होतो हेंच चांगलें आहे. हें ऐकून सदाशिव हरीनी सेनासाहेबांस विनंति केली कीं, महिपतराव यांनीं सेनाधुरंधरांची मर्जी प्रसन्न करून आपलेकडेस घेऊन आले, आणि चंद्रपूर सिरपूरचें वर्तमान कच्चें निवेदन केले. याजवरून सेनासाहेबांस संतोप जाहला आणि महिपतराव याजला बलाऊन वस्त्रें देऊन प्रेमभरित केला. मग उभयतां बंधु यांची मुलें माणसें पेशव्यांचे प्रांतांत देउरांत आणिलीं.

दादासाहेबांनीं सेनाधुरंधरास बोलाविलें असतां जाणें झालें नाही, तेव्हां ही अडचण जाणून नबाबास सेनासाहेबांनीं बोलण्यांत आणिलें कीं, पुणें प्रांतीचा बंदोबस्त जाहला पाहिजे, याजकरितां मुधोजी भोंसले सेनाधुरंधर याजला फौज देऊन तिकडेस रवाना करावें. याजवरून ही नवाबाची सल्ला उत्तम आहे, म्हणोन ठरलें. यावरून सेनाधुरंधराबरोबर दहा हजार फौज देऊन रवानगी केली. हें ऐकून दादासाहेब यानीं रोष करून रामाजी केशव याजला निरोप दिल्हा. तेव्हां सेनाधुरंधर पुण्याजवळ जेंजोरीस गेले. देवदर्शन करून तेथें मोहोगांवाजवळ होते. काशीराव लक्ष्मण परभू यांनीं वराड प्रांतींचा बंदोबस्त ठेवून, आपले घरास कोथळच्यांस आले होते, तेव्हां महिपतराव यांनीं सेनाधरंधर यांस विनंति केली कीं, कासीराव लक्ष्मण,

राजमंडळांतील राणी साहेबांचे विश्वासूक मातबर माणसें आहेत, त्यांचे हातून पुढें मसलतीचा जसा कल जिकडे दिसेल तिकडून साधन करतां येईल. आपलीही वोळख साताराची आहे, तेव्हां सेनाधुरंधर बोलले कीं, उत्तम आहे, त्याजला घेऊन यावें, आमचाही परिचय आहे. तो तुम्हांस वाकब आहे. भाऊसाहेबांस सांगितलें असतां तसेच राहिले, ते अनायासें येथें आहेत, उपयोगी पडतील, घेऊन यावें. याजवरून महिपतराव कोथळ्यास जाऊन परस्परें भेटी झाल्या. काशीराव यास समागमें घेऊन आले. सेनाधुरंधर यांच्या भेटी झाल्या. सेनाधुरंधरांनीं कासीराव यांजकडील घरपागेचा शंभर स्वारांचा बंदोबस्त ठेविला. नंतर मुलें माणसें सेनाधुरंधरांचीं देउरास होती तेथें जाऊन समागमें घेऊन, सेनासाहेबांकडेस आले.

तशांत पंतप्रधान दादासाहेब फौजेसुद्धां मल्हारजी होळकरांसहित, नवाबाकडे चालले. नवाबाचे चित्तांतील भाव सर्वत्र आपणांस अनुकूळ झाले. तेव्हां पंतप्रधानाचें पारिपत्य झालें म्हणजे गनीमी दरोबस्त बुडवून, यावनी करावी, हा एक प्रकार व हल्ली बोलण्याचे प्रसंगीं जाबसालांत मऱ्हाठ्यांची निर्भत्छना करूं लागले.

असें होत असतां सेनासाहेबांस मदत खर्च दोन लक्ष रुपये दरमहा देण्याचा विचार ठरला होता, याजकरितां भवानीपंत मुनसीस दिनकरपंतांनीं नवाबाचे दरबारास राजे बहादराकडेस पाठविलें होतें. त्यांनी बोलण्यांत सुचविलें की, "फौजेस खर्चास कांही द्यावें." त्यांनी उत्तर केलें की, इतके "जलदीनें खर्चास मागतां, असे सरदार पाहिले नाहीं." यावरून मुनसी बोलले की, "सेनासाहेबांशीं अशीं उत्तरें तुमची पडू नयेत." इतक्यां वरून राजे बहादरांनीं उत्तर केलें की, "सेनासाहेबांसारखे आमचे अस्तनीत फार आहेत." याजवरून जिद[१] होऊन वैमनस्य आलें.

**भोंसले कटांतून फुटतात**:—सबब सेनासाहेबांनीं मल्हारजी होळकर यांस पैगाम लाविला, "आम्हांविषयी पंतप्रधानाचे मनांत कसें आहे याचा व छत्रपतीकडून पक्कायतीचा खुलासा समजावा." याजवरून मल्हारजी होळकरांनी इषारा केला जे, "तुम्हांकडून मातबर गृहस्थ बोलण्यास पाठवावे म्हणजे याचा खुलासा तुम्हांस बोलण्यांत येईल." हा मजकूर

१. दुराग्रह, कलह.

सेनाधुरंधर यांनीं ध्यानांत आणून सेनासाहेबांशीं विनंति केली कीं, " कासीराव लक्ष्मण व पेशवे यांचा स्नेहभाव आहे. यांजला दादासाहेबांकडे पाठवावें. मल्हारजी होळकराचेही ओळखीचे आहेत,व सखारामपंत पुरंधरे तेथें कारभारी, तेथें या समयास त्यांजकडेस यांजला पाठवून समेट करून घ्यावा." हें जाणून जानोजी भोंसले सेनासाहेब व मुधोजी भोंसले सेनाधुरंधर यांनीं विचार करून, कासीराव लक्ष्मण यांची रवानगी दादासाहेबांकडे केली. हे तेथें पोंचले; भेटी होऊन प्रेमयुक्त भाषणें जाहलीं; जे वेळेस होळकराचे विचारें मशारनिल्हेनीं दादासाहेबांशीं बोलण्याचा सिद्धांत कळविला कीं, " सेनासाहेब व सेनाधुरंधर यांनीं इकडेस आल्यास आपण त्यांचा काय बंदोबस्त योजिला." याजवरून दादासाहेबांनीं उत्तर केलें कीं, " नबाबास कायल करून जेर केल्यावर जो मुलुख मिळेल त्यांत निमे तुम्हांस देऊं." असें बोलणें ठरलें. ये विषयींचा मजकूर दादासाहेब पेशवे यांनी आपलेकडील वकील सेनासाहेबांजवळ पहिलेपासून रामचंद्र बल्लाळ होते त्यांजला आलाहिदा इतल्ला लिहून परभारें वकिलास सूचना केली. आणि दादासाहेब बोलले की, " तुम्ही राजमंडळांतील वागणार, असें असतां, तिकडे गेलां हें काय ? " यांनी विनंति केली की, " जानोजी भोंसले, मुधोजी भोंसले यांची एकत्रता, आपले दौलतीतील माणसें, यांचें लक्ष इकडेच असावें. या अर्थी जाऊन त्याचा निश्चय घेऊन आपले सेवेशीं आलों. हें ऐकून दादासाहेब फारच संतोष पावले. कासीरावाची रवानगी दादासाहेबांनी बहुमान वस्त्रें देऊन सेनासाहेबांकडेस केली' ते उभयतां बंधु भोंसले व प्रतिनिधि आदिकरून इकडील मंडळी नबाबाकडे मिळाली आहे, त्यांजला तुम्हीं घेऊन यावें असें निरोपाचे वेळेस सांगितलें होतें, तेथून कूच करून मशारनिल्हे उभयतां बंधु भोंसले यांजकडेस येऊन सविस्तर निवेदन केलें. याजवरून बहुत संतोष जाहला. व प्रतिनिधि व पिराजी नाईक निंबाळकर आदिकरून सरदार पेशव्यांकडील यांशीही राज्यकारण पक्कें करून त्यांजसहित सेनासाहेब, सेनाधुरंधर कूच करून रघुनाथराव दादा साहेब पेशवे यांजकडे जाण्याचा निश्चय केला, आणि नबाबांचे फौजेंतून निराळे जाले. दादासाहेबांकडेस जाऊन फौजेसुद्धां पोंहोचावें तों इस्मायलखान यांजला राजे सुंदरांनीं सेनासाहेब उभयतां बंधूंकडे पाठविलें कीं, " फाट खाऊन जाणें ठीक नाहीं. याजवरून खानमजकूर याप्रमाणें बोलले. याज-

वर सेनासाहेबांनीं भाईस उत्तर केलें कीं, "राजे सुंदराचे धडावर शिर दिसत नाहीं, गरूरी फार करितात. त्यांत त्याजकडे राहून फळ काय ?" याप्रमाणें उत्तर करून निरोप दिल्हा.

**राक्षसभुवनाची लढाई** इ. स. १७६३:—राजे बहाद्दराचे चित्तांत अंदेशा आला जे, राजमंडळाची सरदार मंडळी व सेनासाहेब व सेनाधुरंधर फाट खाऊन गेले तेव्हां आपला जमाव कमती पडला. याजकरितां चार घटका रात्र असतां जलदी करून नबाबाचें फौजेचें कूच होऊन गंगा उतरून चालले. रघुनाथराव दादासाहेब यांजकडून फौजेची तयारी जाहली. परंतु दादासाहेबांस नेम अर्घ्यप्रदानाचा, सबब विलंब लागला. इतक्यांत नबाबाकडून फौज तयार होऊन मुकाबल्यास आली व विठ्ठल सुंदर राजे बहादर पिछाडीस, फौज गंगा आडून उतरून पार पलीकडे जावें तों त्यांचे अडचणीचे संधीत आघाडीस नबाब जातीनें होते. त्याजवर न जातां राजेबहादर याजवर काबूची वेळ पाहून, दादासाहेब चाल करून आले. यांशी त्यांशी गांठ पडली. आणि लढाई राक्षसभुवन[1] मुक्कामी मातबर झाली. दादा साहेबाकडील फौजेशीं जंग भारी होऊन शेवटीं राजे बहादर याणीं हत्ती पळवून दादासाहेबांचे हत्तीस टक्कर दिल्ही. सबब दादासाहेबांचा हत्ती कच्चा पडून माघारी पळाला. राजे बहादराचे हत्तीनें दादासाहेबांचे हत्तीचे शेंपूट दातांत धरून टकरा मारीत चालला. हें पाहून मल्हारजी होळकर व फौज व माहादाजी नाईक निम्बाळकर जमावानिशीं दरम्यान येऊन आपला हत्ती चालविला. जवामर्दी विशेष करून उभयतांचे हत्तींची लगट तोडली. तेव्हां दादासाहेबांस फुरसद पडून लढाई मातबर झाली. शेवटी माहादाजी नाईक निंबाळकर यांचेकडील वकिलांनीं राजे बहादर यांस गांटून मारिलें. दोन्हीकडील हौदे एका समयी खाली जाहले. याजवरून नबाबांनी शिकस्त खाऊन, पंतप्रधानांस यश आलें. नंतर मुक्कामास आल्यावर, दादासाहेबांनीं चित्तांत आणिलें कीं, सेनासाहेब व सेनाधुरंधर फुटून आपले मदतीस आले असतां लढाईचे प्रसंगीं पोंचणें झालें नाहीं याचें कारण काय ? सेनासाहेबांचे विषयीं चित्तांत अंदेशा आला.

---

१. ही लढाई शके १६८५ मध्यें झाली. पंतप्रधान यांची शकवली पृष्ठ २२–२३ पहा. (ता. १०–८–१७६३)

नबाब औरंगाबादेस सन ११७२ चे सालीं आले. तेथें तह जाहला. पासष्ट लक्षांचा मुलुख नबाबाकडून पंतप्रधान यांणीं तहांत घेतला. व लढाईचे प्रसंगीं भाई इस्मायलखान पन्हीं* जखमी होते, हें सेनासाहेबांस समजल्यावरून, आपले कडेस आणून मशारनिल्हेच्या जखमा नीट केल्या. तशांत सेनासाहेब यांजला पासष्ट लक्षांपैकीं मल्हारजी होळकर व कासीराव लक्ष्मण यांचे विद्यमानें निमे मुलुख द्यावा असें ठरलें असतां लढाईचे प्रसंगी पोंहचले नाहींत, सबब पंतप्रधानांनीं फेरबदलीच्या गोष्टी सांगितल्या. ज्या प्रसंगीं होळकर यांणी बोलण्यांत आणिलें जे, सेनासाहेब कूच करून निघाल्यामुळें नबाबाची फौज हलकी जाहली, व आमचे मार्फतीनें सेनासाहेबांस नबाबाचे फौजेंतून वेगळें करविलें तेही इकडेस आले, याजमुळें राजमंडळाचे सरदारही फुटून नबाबाची हिमत कमती पडून लढाईचे प्रसंगी तुम्हांस यश आलें, त्यांशी बेबदल होणें चांगलें नाही, आदौ कराराप्रमाणें नेमांत आलें त्याप्रमाणें द्यावें, त्याजवरून बत्तीस लक्षांचा मुलुख साकरखेडला, मेहकर, वगैरे दिल्हे. सेना-साहेब व सेनाधुरंधर आपले मुलखांत आले. नंतर पंतप्रधानही आपले स्थळास गेले.

उपरांत मुधोजी भोंसले सेनाधुरंधर यांणी वाटेंतून सदाशिव हरी दिवाण यांचे बंधु विष्णु हरी यांस चंद्रपूरचा सुभा देऊन, समागमें महिपतराव दिनकर यांजला रवाना केलें. ते चंद्रपुराजवळ शेवगांवास आले तेथें आबाजी भोंसले याजला महिपतराव यांणीं इमान देऊन काढिलें, ते सेनाधुरंधराजवळ आणिले, तेथें सेनाधुरंधर यांचे चित्तांत बदी आली. यावरून महिपतराव दिनकर यांणीं विनंति केली की, असें करणें होतें तरी आम्हां हातीं इमान देऊन कशास आणिलें ? आतां आपले चित्तांत बदीचा विचार आहे, तेव्हां त्या गृहस्थास जाऊं द्यावें. याजवरून आबाजी भोंसले देशास गेले. पाठीमागें सेनाधुरंधर व सदाशिव हरी व महिपतराव दिनकर असे असतां विष्णु हरीस चंद्रपूरचा सुभा दिल्हा. ते वेळेस सेनाधुरंधर सदाशिव हरीस बोलले कीं, "ज्यास चंद्रपूरचा सुभा द्यावा तोच मालकी आंगास आणून बळकटीस येतो. असे दोघे तिघे झाले. आबाजी भोंसले आपले आप्तांतील असतां त्याजपासून या गोष्टी घडल्या व महिपतराव दिनकर यांचे विचारें चंद्रपूरचा कारभार

* एलिचपूरकर.

पाहात जावा." असें बोलून विष्णु हरी यांजला त्या सुभ्याचे कामीं नेमून दिल्हें असें एक वर्ष चालल्यानंतर सदाशिव हरीशीं व महिपतराव यांसीं वांकडें आलें. त्याजवरून तो सुभा महिपतराव यांजकडे सांगितला. जानोजीबावा व सेनासाहेब सुभा यांचेही ध्यानास आलें.

दुसरे कासीराव लक्ष्मण यांचा पंतप्रधानाचा वगैरे सेनाधुरंधराशीं स्नेह अवीट याजमुळें जानोजी भोंसले हे लोभ करूं लागले आपले जवळ ठेवून, वराडाचा सुभा घ्यावा हा निश्चय ठरविला तेव्हां सेनाधुरंधर यांचे चित्तांत आलें कीं, आम्ही याजला घेऊन आलों असतां हे आपलेकडेस येऊन काम सांगतात. तेव्हां सेनासाहेबांस विनंति केली की, आमचेपाशी आहेत. तेव्हां परके ठिकाणीं नाहींत जवळच आहेत. असें बोलून समागमें सेनाधुरंधरांनी चंद्रपुरास घेऊन गेले. कुल खाजगी वगैरेचें काम सांगितलें. मशार-निल्हेचे पागेस राहावयास शेवगांवचे व सगसगीं चंद्रपुरचें गांव जहागीर दिलें व बाईसाहेबांचा वगैरे कारभार सांगितला. महादाजी लष्करी यांजला महिपतराव यांनीं काशीराव जवळ ठेवून दिलें. असें कांही एक दिवस चाललें. काशीराव यांनी कामकाजाचा बंदोबस्त चांगला केला. तशांत गोसावी यांचा जमाव खंडण्या घेत चंद्रपूर प्रांतांत येऊन चामोरसी,* गड बोरी येथें धूम फार केली. याजवरून महिपतराव सुभेदार जात होते. ते समयी मनाई करून मातोश्री चिमाबाई साहेबांनी काशीराव लक्ष्मण यांस रवाना केलें. ते कांहीं जमाव घेऊन जिवाजी शिवदेव यांचे समवेत गेले. समजावीस दटावित होता तो बोलण्यावरून तंटा पडला, आणि गोळा गोळी सुरुवात होऊन लढाई जाहली. काशीराव लक्ष्मण कामास आले. तों गोसावी निघोन गेले.

**भवानी काळो**:—त्यावर पुढें कांहीं एक दिवसांनीं बळवंतराव महिपत यांचे नांवें सुभा चंद्रपूरचा सांगितला. हाताखालीं नारो रघुनाथ यांजला ठेविलें. नानासाहेब, भाऊसाहेब पेशवे यांची वांटणी पंचेचाळीस लक्षांची केली. यांची हिसे रसीद ठरविली. त्यास पंधरा लक्ष सेनासाहेबां-कडे व पंधरा लक्ष दौलतीकडे खर्चास व पंधरा लक्ष सेनाधुरंधराकडे, त्यांत सेनाधुरंधर याचे सखे बंधु साबाजी भोंसले यांचे वाटणींत दारव्हें वगैरे, नवाब बंदेगान अल्लीनीं, चिरंजीव म्हणून आपले तर्फेनी दिले. तंव मुधोजी भोंसले

* चांदा जिल्ह्यांत.

सेनाधुरंधर याचे हिश्शांत बिबाजीबाबा छत्तीसगड वगैरे यांजकडेस असें ठरवून नेमलें असतां, साबाजीबाबांपाशीं दिवाण, बाबासाहेबांपासून महिपतराव नरसिंह धारूरवाले घांटावरील राहणारे होते. यांचे आलीकडे कारभार राजाराम वाळके यांनीं केला. नंतर यांचे मामा गणेश काळो व भवानी काळो वराड प्रांतीं मामलत करून होते. शाहणे थोरले माणूस हें जाणून राजारामपंतांनीं साबाजीबाबाची भेट करविली. कामकाज सांगितलें. पुढें कांही दिवसांनीं दिवाणगिरीही केली. त्या प्रसंगीं साबाजी भोंसले यांनीं माधवराव बल्लाळ पंतप्रधान यांसी संधान करून तिकडे मिळावें असा घर-फुटीचा विचार होऊं लागला. हें सर्वत्र भवानी काळो दिवाणजीनें पाहून युक्तीचे वाटेनी बोध केला असतां, चित्तांत न येतां तसेंच एक दोन मजला निघोन गेले. हें इतकें दिवणजीनीं जानोजी भोंसले सेनासाहेब सुभा व दिवाकर-पंतास लिहिलें. त्याजवरून सेनासाहेब सुभा यांनीं दर्याबाईसाहेबांस पाठवून आपले बंधूची सफाई केली. व भवानी काळो यांनीं इत्तला केला सबब याजवर लोभ सेनासाहेबांचा व देवाजीपंताचा विशेष जाहला. याजमुळें साबाजी भोंसले यांजपासून मागून घेतले; येथें आणून कटक व उडिसा येथील सुभ्याचें काम शिवभट साठे, यांजकडे असतां त्या प्रांतीचा अवग्र वसूल घेतला तो फौजेप्रकरणी खर्च केला. व इरसाल‡ नागपुरास दाखल न होय. असें कांहीं एक दिवस चाललें. तशांत संबलपुरवाले यांनीं बैदा करून मार्गांत खलेल केली. सबब याजवरून मोहीम भट मशारनिल्हेनीं करून संबलपुरास मोर्चे बसविले. ते काळी जानोजी बोवा सेनासाहेबांनीं मज्जितखान याचे भाऊ ताजखान याजला आंतले बैतांनी चाकर व बाहेत्कार रुकसत असे हजारों लोकांनी रवाना केले. याजवरून याजवळ जाऊन चाकर राहून तलबे* करून बखेडा करून भटजी यांजला कैद करून, नागपुरास आणलें. ते समयीं सेनासाहेबांशी भटजी मशारनिल्हेनीं करार मदार करून चिमणासाब, याजला बरोबर नेलें असतां, त्याचेनींही बंदोबस्त होईना. सबब याजला त्याजवर जप्तीचे कामीं पाठविलें; पुढें सुभाही त्याजकडे सांगितला. तेथें कांहीं दिवस कामाची वहिवाट करून नागपुरास आल्यावर, लाख रुपये कामांत खाल्ले म्हणून आरोप आणिला. हें पाहून साबाजी भोंसले यांनीं सेनासाहेबांस

‡ हिशेब. * पगार

विनंति केली कीं, आमचे जवळचे मनुष्य घेऊन जाऊन त्याजला असें करावें हें उचित नव्हे. याजवरून बंधूची भीड जबरदस्त पाहून उगेच राहिले.

तेव्हां व्यंकाजीराव व राघोपंत बक्षी प्राचीन सेनासाहेब होते यांचा काल झाल्यावर, महिपतराव व्यंकाजी, बक्षीगिरी करीत होते त्यांचा व सेनासाहेबांचा पेंच येऊन त्याजपासून लाख रुपये घेऊन काम वाढलें आणि देवाजीपंताचे विचारें बक्षिगिरीचें काम करीत आले, तें या वेळे पावेतों त्यांचे घराण्यांत चालत आलें.

**पेशव्यांची भोंसल्यावर पहिली स्वारी*** इ. स. १७६५:—यापूर्वी राघोबा दादा पेशवे यांनीं विठ्ठल सुंदर राजेबहादर याजला पेशजी मारून दौलतीचा बंदोबस्त करून, माधवराव पुतणे दादासाहेबांचे, नानासाहेबांचे चिरंजीव, मालक यांस पंतप्रधानी दिली. कामकाजाचा बंदोबस्त केला. नवाबापासून मुलूख ६५ लक्षांचा दादासाहेबांनीं सोडविला. त्यांत जानोजी बोवाकडे साकरखेर्डा वगैरे तहांत दिले. नबाबाकडे जानोजी बोवा आणि मुधोजीबोवा मागें मिळाले होते. ते सारे कुन्हे पोटांत. त्या सालीं गोहदचे स्वारीस दादासाहेब चढाई करून वराड प्रांती आले. बऱ्हाणपुराहून नागपुरास यावें इतक्यांत, जानोजीबोवा यांनीं देवाजीपंत यांजला दादासाहेबांकडे रवाना केलें. मागाहून आपणही तयारी करून चालले. आगाऊ देवाजीपंत दादासाहेबांपाशी पोंहोचून पायांवर डोई टेविली. बहुत प्रकारें विनंति करून इकडेस जानोजीबोवाकडे लिहून पाठविलें कीं, लौकर येऊन पोंहचावें. तसेंच जानोजी भोंसले सेनासाहेब दरमजल जाऊन पोंहोचले. दादासाहेबांची भेट डेऱ्यांतच घेतली. देवाजीपंत यांनी हर प्रकारें दादासाहेबांची मर्जी प्रसन्न करून जानोजी बोवासाहेबांस दादासाहेबांनीं भोजनास तेथेंच उटविलें. ते समयीं बहुतां प्रकारें भाषणें होऊन कृपेस पात्र जानोजी बोवा झाले. देवाजीपंताचा आर्जव पाहून दादासाहेब कृपावंत होऊन ते वेळेपासून देवाजीपंतास 'विनंति' लिहिण्याचा सांप्रदाय जाहला. प्रसंगोपात सामोपचारें करून जानोजीबोवांस मागती नागपुरास रवाना केलें.

नंतर राघोबा दादा पुण्यास गेले. तेथें माधवराव साहेब व दादासाहेब

---

* पेशव्याच्या दोन्ही स्वाऱ्यांचे वर्णनाकरितां खरे ऐ. ले. सं. भा. ३, खरे प्रस्तावना. प्रकरण ७, पेशवे दप्तर भाग २०, ना. इ. भा. ६ पहा. (सं.)

यांसी आपसांत कलह वाढून लढाया झाल्या. माधवराव यांस धरिलें. नंतर मालक जाणून सोडलें. मागाहून तोच प्रकार होऊन तीन लढाया झाल्या. चौथ्यानी दादासाहेबांस माधवराव यांनीं धरून धोडपच्या किल्ल्यावर ठेविलें. दौलतीचा बंदोबस्त माधवराव साहेब यांनीं केला. स्वमुलखी परमुलखीं बंदोबस्त करून राज्यकारभार चालवावा असा प्रकार जानोजीबोवांनीं ऐकून चित्तांत विचार केला की, आम्ही माधवराव यांचें संधान ठेविलें नाही. एक दादासाहेबांचें लक्ष धरून राहिलों. माधवराव यांचे चित्तांत वैषम्य आहे. हें जाणून जानोजीबोवांनीं व देवाजीपंत यांनीं विचार केला की, चिमाजी रखमांगद चिटणवीस, हे राज्यमंडळांतील राहणार, यांचे वडिलाची वहिवाट राजश्रीजवळ भारी, तेव्हां मानप्रतिष्ठा यांची राहील आणि शाहणा मनुष्य यावरून यांसच पाठविणें उचित आहे, हें जाणून यांची रवानगी माधवराव पेशवे यांजकडे केली. ते पुण्यास पोंहचल्यावर माधवराव यांनीं ऐकून राजमंडळचे गोविंदराव यांचे बरोबरीचे तेव्हां त्याप्रमाणें सिलसिल्यांनी मानप्रतिष्ठा वहुत प्रेमयुक्त यांसी बोलणें झालें. परंतु जानोजीबोवा व देवाजीपंताविषयीं चित्तांत वैषम्य भारी या अर्थे जावसालाचा उलगडा तसाच ठेवून मोहगमांत, यांची रवानगी राजमंडळचे धोरणावरून वर्णे ‡ वगैरे गांवाच्या सनदा दिल्या होत्या, आणिक नव्या चिमापासाहेब यांचे नांवें करून देऊन रवाना केलें.

**माधवराव पेशव्यांची नागपुरावर पुनः स्वारी** इ. स. १७६९:—मशारनिल्हे नागपुरास आल्यावर सर्व प्रकार दर्शविले. तेव्हां हुषारी करणें जरूर, पंतप्रधान यांची स्वारी नागपुरावर येण्याची तयारी आहे, याजवरून देवाजीपंत जातीनेंच गेले. जाऊन पोंहोचावें तों तिकडून पंतप्रधानाची स्वारी निघाली.* पुण्याचे जवळपास यांच्या भेटी झाल्या. अवघ्र वर्तमान तेथील जानोजी बोवासाहेब यांजकडे लिहून पाठविलें. याजवरून जानोजी बोवा भोंसले, मुधोजीबोवा, साबाजीबोवा व बिंबाजीबोवा हे एकत्र होऊन फौजेसुद्धां लांजीचा रोख दाखवून प्रतापगडाहून चंद्रपुराकडे झाडीचे मार्गे गेले होते, तों मागाहून माधवराव पेशवे यानीं दिवाकरपंतास कैदेंत ठेवून दरमजल वराडांतून नागपुरापर्यंत येऊन नागपुरास जाळिलें आणि चंद्रपुरा-

‡ वऱ्हाडांत.

* ही पेशव्याची भोंसल्यावर दुसरी स्वारी.

कडे जाऊन जानोजीबोवा वगैरे चौघे बंधु गेले होते यांचे मागें चाल धरली. तेव्हां चौघे बंधु चंद्रपुरास गेले. चंद्रपुरचा बंदोबस्त करावा आणि पुण्याकडे चाल धरावी असें भोंसले यांचे मनांत, तेव्हां चंद्रपुरास कोण ठेवावें असा विचार मनांत होऊं लागला. ते समयीं सेनाधुरंधर मुधोजी भोंसले यांनीं विनंति केली कीं, महिपतराव दिनकर माणूस भरंवशाचा आहे, याचे स्वाधीन करावें, याजवरून सेनासाहेबांनीं आशंका घेतली कीं, महिपतराव यांचे भाऊबंद पेशव्यांकडे सखाराम हरी व बाबूराव हरी, व चुलते उमाजी विनायक, शिवाय सोयरे चिटणवीस वगैरे आहेत सबब यांस ठेविणें सल्ला नाही. तेव्हां बहुत प्रकारें खात्री सेनाधुरंधर यांनीं करून बोलले, जे हे माझे सुखदुःखाचे सोबती हें जाणून विनंति करतों. असें बोलून महिपतराव चंद्रपूरचे मालक करून, जानोजी बोवाकडून माणको अमृतराव, तुळजोपंताचे पुतणे, तीन हजार फौजेनिशीं व बिलंदसिंग नबाबही, असे मातबर सरदार महिपतराव सांगतील तें ऐकून असावें. तसेंच बिंबाजी भोंसले यांनीं सटवाजी भोंसले, कादर दादखान, मिळोन दीड हजार फौज तैनात देवविली. व व्यंकटराव गोंड, पांचशें स्वारांनिशी मुधोजी बोवाकडेही सर्व तैनात करून बंदोबस्त ठेवून, चिमाबाई साहेब व कन्या बाळाबाई व ठकूबाई आदि करून माणिकगडावर ठेवून पुढें गेले. तंव माधवराव पेशवे चंद्रपुराजवळ पांढरकवड्यावर आले. पुढची बिनी चंद्रपुरावर आली व ब्राह्मणांस पत्रें पाठविलीं कीं, आपण निघावें, आम्ही आल्यावर कठिण जाईल, आम्ही देव ब्राह्मणांचे भक्त आहोंत. अंतर पडूं नये. सरकारासमागमें पंधराशें तोफा जरब मातबर शिवाय फौज आहे. एक किंवा दोन घटकेंत चंद्रपूर घेतलें जाईल."

**चंद्रपुरचा वेढाः**—असें नाना प्रकारें फितुर करून पाहिलें. परंतु चंद्रपुरीं महिपतराव दिनकर दहा हजार फौजेनीं आहेत, हें माधवराव यांस कळून होतें. त्या समयी पंतप्रधानांनीं बाबूराव* हरी व सखाराम हरी व उमाजी विनायक यांशीं बोलावून सांगितलें कीं, "महिपतराव यांजला

---

* बाबूराव हरी आणि सखाराम हरी गुप्ते हे चांद्रसेनीय कायस्थ परभु होत. हे दोघे भाऊ पेशवाईत फार प्रख्यात होते. यांचे वंशज अद्याप आहेत. प्रभाकर कवीनें केलेल्या खर्ड्याच्या लढाईवरील पोवाड्यांत या दोघांचीं नांवें आढळतात.

पंचवीस हजारांची जहागीर देशीं वंशपरंपरा चालेल अशी देतों. चंद्रपूर आमचे स्वाधीन करावें." त्यास त्रिवर्गांनीं उत्तर केलें कीं, "हें आमचे कडून न बोलवावें. कारण आमचे वंशाचा असल्यास महिपतराव करून घेईल. आपणास साधन होणार नाहीं. स्वामी सर्व प्रकारें प्रयत्नी या किल्ल्याची बिशाद काय, घेंतीलच. परंतु महिपतराव जिवंत आपले जवळ येणार नाहीं." हें ऐकून श्रीमंतांनी ते क्षणी पंचवीस हजार फौज तलाव्यास पाठविली. ते पांढरकवडयाहून कोसाऱ्याजवळ आले. किल्ल्याची गोळा-गोळी सुरू झाली. महिपतराव पांच हजार फौजेनीं बाहेर आले. त्यांचे मुकाबल्यास येऊन पंतप्रधानाची फौज येऊन पन्नास साठ घोडे पाडाव करून आणिले. नंतर रात्रौ मनसोबा करून फंदाचें पत्र देवाजीपंत पंतप्रधानाचे कैदेंत होते तेथें लिहून पाठविलें कीं, "चंद्रपुरास पंतप्रधान आले. फार चांगलें झालें. भोंसले यांची दौलत सारी हस्तगत होईल, मजबूद ही जागा साध्य झाली म्हणजे सगळें राज्य आपलें झालें असें तुम्हीं पंतप्रधानास सुचवून चंद्रपूरचे शहास आणावें. येथेंही सरंजाम मजबूत आहे. पंतप्रधान यांजपुढें हा किल्ला राहात नाहीं. परंतु पंधरा दिवस किंवा आठ दिवस येथें गुंतले म्हणजे, यजमान पुण्यास जाऊन दादासाहेबांस भेटून बाहेर काढतील, म्हणजे त्या प्रांतांची उद्यानता करीत कार्यसिद्धि होईल व सेनासाहेबांचे व सेनाधुरंधराचें पत्र माहुराकडून आलें कीं, 'कसेंही करून आठ दिवस किल्ल्याशी पंतप्रधानास गुंतवून ठेवावें म्हणजे आम्ही पुणें प्रांतीं पोंहचून आमचें कार्य सिद्धीस जातें, यावरून आपणास सूचना लिहिली.' असें पत्र आलें तें लष्करांत चौकीवर धरलें गेलें. पंतप्रधान यांनीं पाहून अंदेशा केला आणि देवाजीपंतावर, इतराजी फारच करून आणिक पाहरे बसविले. महिपतराव मजबूद आहे, फितुरांत येत नाहीं, पंचवीस हजार फौजेशीं पांच हजार फौजेनीं येऊन लढाई घेतली. तेव्हां आठ चार दिवस इकडे आपल्यास लागल्यास अवघड पडेल. इकडे न गुंततां त्यांचे मार्गे जावें हें बरोबर आहे, हें मनांत आणून गोपाळराव* मिरजकर यांचे बरोबर आणखी सरदार देऊन पंचवीस तीस हजार फौज

---

* गोपाळराव मिरजकर हे मूळ हरभट्ट पटवर्धन यांचे नातु. हे पेशव्यांचे एकनिष्ठ सेवक होते. सन १७६९ मध्यें यांची व जानोजीची लढाई झाली. परंतु तिचा निकाल न होतां पेशवे व भोंसले यांचा तह झाला.

त्याच क्षणीं माहूरचे रोखें भोंसले यांचे पिच्छावर पाठविली. आपणही लांब लांब मजला करीत मागें चालले. त्याजमुळें माधवराव पंतप्रधान यांजला मूत्रावाटे रक्त पडून आजार उत्पन्न झाला. जानोजी बोवाचे मागें गोपाळराव मिरजकर लागले होते. त्यांची यांची गांठ पडून, परस्परें संधानें जोडून, सलोखा झाला. त्यांच्या मार्फतीनें पंतप्रधान यांच्या भेटी झाल्या.[१] ब्रह्मेश्वरचे मुक्कामीं तह[२] होऊन करारमदार झाले.

पंतप्रधानाची मर्जी देवाजीपंतावर फार कडक होती, याजमुळें पंत-प्रधानाचें बोलणें पडलें कीं, हा गृहस्थ तुमचे आमचे जाबसालांत नसावा, नाश करील असें जानोजी बोवांशीं बोलले. आम्ही त्याचें पारिपत्य करितों, व आपले समागमें नेतों. सेनासाहेबानें उत्तर केलें कीं, आमचा ताबेदार बरा अथवा वाईट याजला आम्हीच शासन करूं, आणि आपले मर्जीशिवाय नाहीं. असें म्हणून सोडून आणलें. त्या दिवसापासून भवानीपंत मुनसीवर माधवराव यांची कृपा फार झाली. दिवाणगिरीचीं वस्त्रें दिली. देवाजीपंतास आणून सेनासाहेबांनीं कैद केलें. देवाजीपंताचे सोयरे व त्या पक्षांतील शिवरामपंत बाबा टाळकुटे व दामाजी खोलखुटे व दिनाजी दशरथ सांड व चिमणाजी रखमांगद चिटणवीस आदि करून बहुतांचे दंड करून पैका मिळविला. सबब सेनासाहेबांचे कृपापात्र भवानीपंत मुनसी झाले. फौजेचा कबजा घेणें, भवानीपंत काळूनें ठरविलें, म्हणून देवाजीपंताचे पक्षास असतां, त्याजवर लोभ राहिला. दिनाजीपंत सुभेदार व मल्हारपंत आण्णा, पाटणकराचे दिवाण, तेही सरकारचा कारभार जुलमानीं करीत होते. मोरोभाऊ लडी, व हुसेनखान फौजदार, असे लोभांतील फार, यांचे विचारें मसलत करून कारभार कांहीं एक दिवस चालला असतां, मुधोजी भोंसले याचा प्रेम पूर्वीं झालाच होता. दिवाकरपंत कैद झाल्यावर सेनाधुरंधराचा प्रेम विशेष जाहला.

---

१. माधवराव व जानोजी यांची भेट मेहकर मुक्कामीं ता. २४–४–१७६९ रोजीं झालीं. त्यापूर्वींच ता. २३–३–१६७९ रोजीं ब्रह्मेश्वर ऊर्फ कनकापूरचा तह झाला होता. ( पे. द. भाग २० ले. २७९ पहा.)

२. लेखांक १९ पहा.

सेनाधुरंधराचे तीन पुत्र, वडील रघुजीबुवा बापूसाहेब, त्यापेक्षां धाकटे खंडोजी भोसले चिमणा बापू व व्यंकोजी भोंसले नानासाहेब असे तीन पुत्र. कन्या जेष्ठ बाळाबाई, दुसरी टकूबाई त्यांचे पुत्र गुजाबादादा गुजर आहेत, टकूबाई पेक्षां धाकटे रघोजी बोवा. त्याचा विचार जानोजी बोवांनीं आपले जागीं केला कीं, आपले वडीलांचे नावकरी आणि आपले पोटीं संतती नाही यास्तव ओटींत घ्यावें. हा नियम केला. आपासाहेब सेनाधुरंधर प्रेम बहुतां प्रकारें सेनासाहेबाची संपादन करून रघोजी बोवास दिला. याजला दत्त पुत्र घेतलें. याचा इत्तल्ला पंतप्रधानास द्यावा. सबब पुण्याकडे सेनाधुरंधर समवेत निघाले. समागमें दर्याबाई व साबाजीबोवाही होते. ते आकोटावर वराडांत येऊन रघोजी बोवास जरीपटक्याचें निशाण तयार करून देऊन सन ११८० चे सालीं दर्याबाई जवळ टेविले. त्याजपाशीं सेनाधुरंधर यांनीं आपल्या तर्फेनीं विश्वासुक व्यंकटराव काशी रघोजी बोवा जवळ ठेविले.

**जानोजीची माधवराव पेशव्याशीं भेट**:—नंतर जानोजी बोवा इस्मायलखा अलजपूरकर याचा भाऊपणा भारी याचेही विचारास आलें, बरें आहे. असें होऊन सेनासाहेब व सेनाधुरंधर तीस पस्तीस हजार फौजेनिशी गंगथडीपर्यंत पैठणचे पलीकडे गेले. तेथें सारी फौज सेनाधुरंधराचे स्वाधीन करून, गंगथडीचा घासदाणा घेऊन आजबेल घांटचे सुमारें तुळजापुराकडे रवाना केलें. आपण सडे होऊन चार हजार फौजेनिशी पंतप्रधानाच्या फौजाही हिंदुस्थानांत रामचंद्र गणेश व विसाजीपंत व महादाजी शिंदे व तुकोजी होळकर व बाबूराव हरी असे हुजुरातीचे लोकसुद्धां दिल्लीवरून फत्तरगडाकडे गेले, व कर्नाटकांत त्रिंबकराव मामा व मिरजकर व सखाराम हरी व आपा बळवंत आदिकरून हुजूरात वगैरे हैदरावर गेले होते. जवळ पंतप्रधानाचे आठ दहा हजार फौज होती. याजकरितां सेनासाहेब चार हजारांनीं गेले. जवळ भवानीपंत मुनसी कारभारी, वकिलीस महिपतराव, विश्वनाथ महाडीक याचे पदरचे ते, पंतप्रधान याजवळ होते. भेटी घेतल्या: प्रेम भारी झाला. पंतप्रधानांचा व सेनासाहेबांचा सौरस होऊन रवाना झाले ते निघते समयी सेनासाहेबांनी विनंति केली, "आतां चिरंजीव बापू आपले सेवेशीं चाकरींत येतील. चिरंजीवांचें चालविणें आपणांकडेस आहे

चाकरींत हजर राहात जातील. विनंति करतील." असें बोलून बिदा झाले. ते वेळेस मोत्याचा तुरा शिरस्त्याशिवाय दिला.

**जानोजीचा मृत्यु**:--( यानंतर ) रवाना होऊन पंढरपुराकडे जाऊन देवदर्शन घेऊन बालेघाटावर गेले. तिकडून सेनाधुरंधर फौजेसुद्धां आले. भेटी झाल्यानंतर धवसा मातबर सरदार नवाबाकडील नूतनच सेनासाहेबांचे भेटीकरितां आले. इतक्यांत एकाएकी शूळाची व्यथाही सेनासाहेबांस होतीच, आणि नित्य गोळी औषधाची खात होते, एक दिवशीं गोळी खाऊन लवकर जेवले नाहीत, सबब मात्रेनें अपचार केला. कठीण अवस्था जाहली. ते समयीं सेनासाहेबांनी सेनाधुरंधर यांस जवळ बसवून, आपलें कपाळ सेनाधुरंधराचे कपाळास घांसिलें की, आजपर्यंत दौलत आम्हीं केली, दैव आमचें होतें. तुम्ही पराक्रमी भारी शाहणे होतां परंतु प्रारब्ध आमचें होतें. त्यायोगें करून उत्कर्ष तो आमचा. तें दैव तुमचें दैवास घांसितों. आतां सर्वस्वीं मालकच आहांत. असें म्हणून भवानीपंत मुनसी, व दिवाण कारभारी व बक्षी, भवानी काळू वगैरे सर्वास निरोप करून सेनाधुरंधरांचे हातांत हात घातले आणि भगवंत स्मरण करून सन ११८१ चे साली वैशाख शुद्ध १५ स कैलासवासी झाले.* मागें हाहा:कार झाला. नाटकशाळा सती गेल्या. तेथें क्रियाकर्मास आरंभ झाला. दुसरे दिवशी भवानीपंत मुनसी यानी सेनाधुरंधर यांस बोलण्यांत आणिलें कीं, आकोटास दर्याबाई व तेथें साबाजी बोवाही होते, यांस समाधानीची खातरजमा करून पत्रें लिहावीं, आणि इस्मायेल खान यासही लिहावे जे, मातुश्री दर्याबाईसाहेब सहगमनास जातील तर जाऊं न देतां ज्याप्रमाणें म्हणतील त्याप्रमाणें कबूल करून येऊं न द्यावें, असा मुनसीचा आक्षेप. तेव्हां सेनाधुरंधराकडील आपाजी भगवंत व चिटणवीस व रामजी केशव तिखे, असे मिळून सुचविलें कीं, इतके लिहिण्याचें कारण नाहीं. ईश्वरें अघटित केलें त्यास उपाय कोणाचा नाहीं. खेद न करावा. इतकें लिहावें. तें सेनाधुरंधराचे मर्जीस न येतां मुनसीचे म्हणण्यावर आपा भगवंत याचे हातचें पत्र मुनसीचे सल्ल्याप्रमाणें लिहून वरतीं, सरकारची निशाणी व शिक्का करून रवाना केलें. यांतील मजकूर दर्याबाई

---

* जानोजीचा मृत्यु येरळ प्र. नलदुर्ग येथें झाला. ना. इ. पृ. १८७ पहा ( सं. )

साहेबांस जे आपण सहगमन न करावें, लेंकरें आपलीं आहेत. जशी आज्ञा कराल, तशीच वर्तणूक केली जाईल. बापूही आपणापाशीं आहेत व चिरंजीव नानाही आहेत, आपणाशिवाय पाऊल पडणार नाहीं, असे रीतीनें मातोश्रीस व तसेंच साबाजी बोवासही लिहिलें, कीं सर्वांस वडील मातोश्री आहेत, त्यांच्या आज्ञेशिवाय कोणी चालणार नाहीत, तुम्ही आज्ञेंत आहांतच. लेकरूं बापू त्यांचाच आहे, आम्हांपासून किमपि अन्तर पडावयाचें नाहीं, तसेंच चिरंजीव बापूसाहेबांस लिहिलें की, मातोश्री जी आज्ञा करतील ती मान्य करावी. अशी पत्रें लिहिलीं.

---

# भाग ४ था
# रघूजी भोंसले, दुसरे

**दर्याबाईशीं भेट**:—तीं पत्रें रामाजी केशव व आपाजी भगवंत यांनीं वाचून पाहिली, आणि विनंति केली की, हे दस्तऐवजी लिहिणें नीट नाहीं, मुनसीनें लिहिली परंतु यांत परिणाम बरा नाही. हें सेनाधुरंधर यांनी न ऐकतां पत्राची रवानगी केली. ते काळी रामाजी केशव व आपाजी भगवंत यांनी विनंति पुनः केली की, या समयास आपण पंतप्रधानाकडे जाऊन रघोजीबोवाचे नांवाचे सेनासाहेबांची वस्त्रें घेऊन मग आपले मुलुखांत जावें. तेथें मुनसीने विनंति केली की, जाणें सल्ला नाहीं. फौज भारी, खर्च आपणांस पडल्यास चौ महिन्यांचा आरसा लागेल. कदाचित् पंतप्रधानानें चार महिने बरसातीचे ठेविले तरी खर्चाची अडचण बहुत होईल. यानिमित्य आपले मुलखांत जाणें बरें आहे. आपले वकील महिपतराव विश्वनाथ पंतप्रधानांजवळच आहेत. याजवरून सेनाधुरंधरांचे मर्जीस आलें, आपले मुलखांत जावें. तेव्हां रामाजी केशव व आपाजी भगवंतराव यांनीं विनंति केली कीं, पंतप्रधान आपल्यास टेवणार नाहीत. कारण आपलेजवळ जमाव भारी आहे. पंतप्रधान यांजपाशीं १०,००,० फौज आहे. बाकीच्या फौजा विसाजीपंत वगैरे हिंदुस्थानांत गेले. तंव पानसे, आपा बळवंत, व त्रिबकराव मामा व सखाराम हरी वगैरे कर्नाटकांत हैदरावर गेले. ते असे आहेत. तेव्हां

आपला दाब पंतप्रधानावर भारी, हें पाहून वस्त्रें सेनासाहेबींचीं बापू साहेबांचे नांवें देऊन रवाना करतील. असें नाना प्रकारें समजाविलें. परंतु सेना-धुरंधराचे मर्जीस न येऊन दरकूच गंगेवर आले, आणि मधी उभयतां दिवाण व चिटणवीस यांनीं म्हणून पाहिलें. परंतु विचारास न आलें. पूर्वीपासून ही वहिवाट होती कीं, रामाजीपंतांनीं विनंति करावी तसें सेनाधुरंधरांनीं कोणतीही गोष्ट मानूं नये, असें चालत आलें होतें त्या अन्वयें न ऐकतां दरकूच अकोटावर चालले होते. बापूसाहेबाजवळ व्यंकटराव काशीस दिवाणगिरी देऊन ठेविलें होतें, यांनी सेनाधुरंधरास विनंति–पत्रें लिहिलीं कीं, येथें डौल बिघडला आहे, सारे बाईकडे मिळाले आहेत. आपण सावध असावें. तेथील कारभारी मंडळीही त्यांचें लक्ष मातोश्रीकडे आहे. हीं पत्रें गंगेवर आलीं. तें पाहून रामाजी केशव व आपाजी भगवंत बोलले तें न ऐकिलें. सरकारांनीं विनंति अमान्य केली. सेनाधुरंधर एक मुभाचा विश्वास, त्याजवरच भरंवसा मानिला. हें सर्व प्रकारें मुनशीचे भरोंशावर. जें करतील तें प्रमाण मानून, मुनसीस पत्रें दाखवावीं. व्यंकटराव काशीस ही बातमी न कळवावी, आम्ही कसेंही करून यांस घेऊन येतों, अशीं पत्रें पाठवीत गेले. सेनाधुरंधर सर्व प्रकारें मुनसीचे स्वाधीन. मग मजल दरमजल आकोटास आले. सेनाधुरंधर आपलेच जमावांनी, दोनशें लोकां-निशी मागें होते. सारी फौज आकोटास गेली. यापूर्वी भवानी काळूनीं विनंति केली कीं, मी आपला आहें, फौज माझ्या स्वाधीन आहे, परस्परें नागपुरास चलावें, बाईसही बलावू पाठवावें. तेही तिकडून येतील. असेंच रामाजीपंतांनीं लाचार होऊन समजाविलें. भवानी काळो विनंति करतो तीही ठीक आहे, परंतु मुनसीनें सल्ला दिली की, परस्परें जाणें ठीक नाहीं, आपण आकोटास जाऊन बाईसाहेबांस घेऊन मालक बाबासाहेबांनीं बापूसाहेब केलेच आहेत, आपणही बाईस मान द्यावा व इस्मायलखान भाईचीही भेट होईल. हें ऐकून सेनाधुरंधर विश्वासुक मुनसीचे अनुमतें आकोटास आले. सारी फौज मुत्सद्दी लोक व जामदारखाना वगैरे गांवांत गेले. मुधोजीबोवा आपले चारशें लोकांनिशीं बाहेर राहिले तेव्हां दुमजले बाहेर उतरल्यावर साबाजीबोवा भेटीस आले. फार खेद झाला. नंतर रात्रौ बाईसाहेबांकडे गांवांत गेले. बाईसाहेबांची भेट झाली. शोक अतिशय केला. सेना-

धुरंधरांनीं समाधान केलें. नंतर आपले ठिकाणास आले. भाई इस्मायलखान येऊन भेटले. खेद जाहाला. नंतर दोन चार दिवसांनी बाईसाहेबांनीं सेनाधुरंधरांस आज्ञा केली की, तुम्हीं चांद्यास जावें, आम्ही सर्व मंडळीसुद्धां नागपुरास जातों. तेव्हां सेनाधुरंधर बोलले कीं, मूल मालीक आहे. त्याजपाशी आम्ही राहूं. त्याजवरून बाईनें उत्तर केलें कीं, मुलासही घेऊन जावें. तेव्हां रांमाजीपंत व अपाजी भगवंत व व्यंकटराव काशी, मुधोजी भोंसले यांजकडील यांनींही विनंति केली की, सेनासाहेब रघोजी बोवा येथेंच ठेवावे, आपण चंद्रपुरास चलावें, हें सरकारचे मनांत आलें. इतक्यांत बाईसाहेबांनीं बापुसाहेबांस सेनाधुरंधरांकडे पाठविले की, आपण चंद्रपुरास कूच करून जावें. व्यंकटराव काशीस भाई इस्मायलखान बाहदूर यांजकडे पाठविलें कीं, आम्ही चंद्रपुरास जातों. यापूर्वी दर्याबाईसाहेबांनी मुनसीचा बेत इस्मायलखान भाईस सांगून पाठविलें कीं, आम्हीं आपासाहेबांस समजाविलें, परंतु ते राहात नाहींत, मुलासहित ते चंद्रपुरास जातात. हें बोलणें भाईनें मनांत आणून होतेच, तों व्यंकटराव काशीही सेनाधुरंधरांकडून बोलण्यास गेले होते, तों भाई नबाव इस्मायलखान यांनीं राव मशारनिल्हेपाशीं उत्तर केलें की, राजे बापूसाहेब मालिकच आहेत. त्याजवरून व्यंकटराव काशी बोलले कीं, महाराज जात नाहीत, आपण ठेविल्यास राहातात. जसें सांगाल त्याप्रमाणें चालतील. हें बोलतांच खान मशारनिल्हे बोलले की, हें पक्कें आहे. यांत अंतर पडल्यास तुमचे आंगावर गोष्ट येईल. असें न व्हावें. व्यंकटराव काशी बोलले की, आम्हांस जसे साहेब तसेच आपण आहांत, कोणासही पाटवावें कीं, बोलतों हे पक्कें आहे. मग इस्मायलखान यांनीं रामचंद्र दादोस सेनाधुरंधर यांजकडे पाठविले व रूबरु विनंति करितां व्यंकटराव काशी बोलले त्याप्रमाणेंच उत्तरें सेनाधुरंधरांचीं पडलीं. तें ऐकून रामचंद्र दादो व व्यंकटराव काशीस घेऊन भाईकडे गेले. कुल वर्तमान सांगितलें, महाराज जात नाहीत. मग तसेच भाईसाहेब आपासाहेबांजवळ आले. उभयतांचीं बोलणी झाली. आपासाहेबांनी एकच उत्तर केलें कीं, तुम्ही सांगाल तसेंच ऐकूं. हें ऐकून भाईसाहेबांनीं मुनसीस बोलाविलें आणि बोलले कीं, महाराज राहात असतां तुम्हीं समजाविलें कीं राहात नाहीत, हें काय ? मुनसींनीं उत्तर केलें की, बाईसाहेब मालक आहेत आपण बाईसाहेबांकडेस चलावें.

हें पूर्वीच झालें आहे. बापूसाहेब धणी बाबासाहेबांनींच केले, असें बोलून भाईसाहेबांस बाईसाहेबांकडे घेऊन गेले. बहुतां प्रकारें बोलणीं झालीं. बाईसाहेबांनीं साफच उत्तर केलें कीं, आपासाहेब या दौलतींत नसावे, जसा चंद्रपूरचा खराबा केला तसाच येथेंही होईल, आम्ही गरोदर आहोंत, पुढें ईश्वर काय करील तें पाहावें. असें नाना प्रकारें बोलणें जालें. हें भाईसाहेब ऐकून दंग झाले. बोलतां नये. तसेच आपासाहेबांकडे आले. आपासाहेबांनीं विनंति केली कीं, मी सर्व प्रकारें आपला आहें हें पक्कें जाणावें. हा प्रसंगच असा आहे. हें ऐकून सेनाधुरंधर एकवचनी बाईस आपणच राहविलें, व बाईसाहेब सांगतील तसें ऐकावें जाणून, मुलास घेऊन चंद्रपुरास आले.

येतांना वराडांत धाडिसावर ( येथें ) मकान आहे, तेथें धूतकारबोवा संत राहात होते, त्यांचें दर्शन घेऊन वर्तमान सांगितलें की, आम्ही तर लढतां लढतां घरकलहांतच आमचा दिवस चालला, आतां थकून आपले पायांचें दर्शन घेऊन जें करणें तें करावें, यांत काय परमेश्वर घडवील तें खरें, जाणून पायांजवळ आलों. असें केवळ ग्लानीचें उत्तर ऐकून, धूतकारबोवा संत यांस दया येऊन आशीर्वाद दिला व लगी* करण्याकरितां फडकें दिलें, आणि बोलले की, आतां तुमची मसलत सिद्धीस जाईल. व जय प्राप्त होईल, मनोदय सिद्ध होईल. अशी उत्तरें ऐकून मग पायांवर डोई ठेवून चंद्रपुरास आले.

तों महिपतराव सुभेदार चंद्रपुरास होते, यापूर्वी जानोजीबोवा निवर्तले हें वर्तमान ऐकून बल्लालशा राजे चंद्रपूरकर यांशी बल्लालपूरचे ठाणेवाल्यांनीं चंद्रपूर घेतलें, ते समयीं रघोजी बोवासाहेब यांनीं बल्लालपूर दिलेंच होतें. नंतर आपासाहेबांकडे चंद्रपूर झालें. तेव्हां आपासाहेबांनीं तसेंच चालविलें. राजाजवळ कारभारी गणेशराव यांस दिवाण व चिमाजी बोवा राजाजवळ कारभारी बल्लालपुरांत असतां निळकंठशाचा काल जाहला. नंतर राजे बल्लाळशास सेनाधुरंधरांनीं स्थापून चालविले, असें असतां बल्लाळशानीं जानोजीबोवाचा काल झाल्याचें वर्तमान ऐकून सारे गोंड मिळविलें. चंद्रपूर

---

* निशाण.

माणिकगड घेऊं अशी मसलत करून, राजे बाळाशा मुलांमाणसांसुद्धां गोंडांनीं काढलें. हें वर्तमान चंद्रपुरास चिमाजीबोवा व गणेशराय पासवाल यांनीं लिहून महिपतराव सुभेदार यांजकडे पाठविलें. तसेंच रात्रौ सुभेदारांनीं किल्ल्याचे बंदोबस्तास आपले भाऊ, राजोबा व मनाजीपंत फडणवीस व उमाजी महादेव यांस ठेवून कांहीं स्वार पायदळ घेऊन महिपतराव व बक्षीसुद्धां रातोरात बल्लालपुरास गेले. तंव याचेपूर्वींच बल्लाळशा निघोन गेले. चिमाजीबोवा गणेशराव पासवाल यांच्या भेटी झाल्या. तसेंच वर्तमान ऐकून राजामागेंच निघाले. राजे दुसरे मजलीवर आटोपले. लढाई मोठी जाहाली. राजास गोळ्या लागून जखमी होऊन सापडले. हजार दोन हजार जमाव गोंडांचा स्वार पायदळ होते ते पळोन गेले. राजास धरून चंद्रपुरास आणिलें. व सरकारी स्वारी आली हें ऐकून महिपतराव सुभेदार सामोरे जाऊन कोसाऱ्या जवळ भेटी झाल्या. बल्लालशाचें वर्तमान ऐकून आपासाहेबांस बहुत, संतोष जाहला.

**मुधोजीचें चंद्रपुरास आगमनः**—महिपतराव यशस्वी हें मनांत आणून इतके क्लेशांत असतां सर्वस्वीं मसलत मुनसीचे विचारें दगाविली, याचा खेद न मानितां सुभेदारास खुषी झाले. तसेच चंद्रपुरास आले, वाड्यांत दाखल झाले, बल्लाळशाही वाड्याजवळ ठेविले. नंतर दोन तीन रोजांनीं सेनाधुरंधर साहेब महिपतराव याचे घरीं जातीनें प्रातःकाळीं आले. माडीवर उभयतां बसून बहुतां प्रकारें प्रस्तावा करून झालेले वर्तमान सांगितलें. ते समयीं महिपतराव यांनी सरकारास विनंति केली जे, महाराज दैववान आहेत, जानोजीबोवा हे देवाजीपंत असतां त्यांशींही टकरा होतच गेल्या. येथील विचार तो काय? दर्याबाईसाहेब स्त्रियाची जात, व मुनसीची चाल, पाहतांना मतलबी दिसून येते, त्यापेक्षां चित्तांत कांहीं खेद न करावा, सर्व आपले पुण्यप्रतापांनीं घडून येईल. एक वेळ नागपुरास जातो. तेथील प्रसंग पाहून कोणकोणते सरदार व मुत्सदी आपले मिळणींत आहेत हे विचार सर्व ध्यानास आणून बाद बरसाद सर्व घडेल. हें यजमान साहेबांनीं ऐकून बहुत संतोष झाला. हें वर्तमान सन ११८१ चे सालीं.

चिमाबाईसाहेब आणि धाकटे चिरंजीव व्यंकोजी भोंसले यांजबरोबर महिपतराव सुभेदार व नारो रघुनाथ यांजला देऊन रवाना करण्याचा विचार

केला. तो ऐकून रामाजीपंत भाऊ, महिपतराव सुभेदाराचे घरास येऊन एकांतास बसले. तेव्हां सर्व मागील विचार सुभेदारास रामाजीपंत भाऊनीं समजाविलें कीं, आपली दौलत मुनसीचे विचारें गमाविली. हा मजकूर तपसिलें कसा आहे तो तुमचे बंधु आपाजी भगवंत याजला पुसावें, म्हणून त्याजला बलावून समक्ष ताकीद केली व आतां पुढील विचार पाहतांना नागपूरची सर्व मंडळी एक होऊन त्यांजकडेस मिळाली. पुण्यासही आपलें, संधान नसतां साबाजी बोवाकडील बळकटी आहे, तेव्हां तुमचें जाणें व कोणताही उद्योग करणें, वृथा दिसण्यांत येत आहे. याजवरून सुभेदार महिपतराव यांनीं रामाजी केशव यांस बोलले की, आम्हांस व तुम्हांस हें काम केल्याखेरीज गत्यंतर नाहीं. असो. एकदां खटपट करून पाहावी. पुढें ईश्वरेच्छा. हें ऐकून रामाजी केशव आपले घरास आले. नंतर चिमाबाईसाहेब व मन्या बापूसाहेब व महिपतराव सुभेदार व नारो रघुनाथसुद्धां नागपुरास आले.

**महिपतरावांचें कारस्थान**:—चिमाबाईसाहेब सरकार वाड्यांत राहिले. महिपतराव व नारो रघुनाथ सेनाधुरंधराचे हवेलींत राहिले. दर्याबाईसाहेब व साबाजीबोवा, व मुनसीशीं भेटी झाल्या. साबाजीबोवा जवळ कारभारी भवानी शिवराम होते. आठ चार दिवस गुजरल्यावर एक दिवशी जाबसालाकरितां महिपतराव मुनसीचे घरास गेले. त्याशीं बोलावयाचें ते बोलले. परंतु त्याचे ध्यानास न येतां त्यांनीं उत्तर केलें कीं, सांप्रत बाईसाहेब गरोदर आहेत, हे सारे विचार पुढें पाहून घेऊं, आतां या प्रसंगांत आपण पडू नये. सेनाधुरंधरानें इतका आक्षेप करणें सल्ला नाहीं. चंद्रपूरचे भरोशावर इतक्या जोरजबैरीच्या गोष्टी सांगतात कीं काय ? हें महिपतरावांनीं ऐकून उत्तर केलें कीं, अवल किल्ल्याचे भरंवशावर आहेत, हें न जाणावें. सेनाधुरंधराचा प्रताप आपणांस वाकबच नाहीं तेव्हां काय बोलावें? हे सर्व विचार दिवाकरपंत जाणून आहेत, ते सांप्रत येथें कैदेंत आहेत, त्यांजला विचारावें. व त्यांचे सल्लेनें कोणतीही गोष्ट करावी. यांतच बरें आहे. सेनाधुरंधराची दहशत जानोजीबोवा सेनासाहेबांसही होती. हें दिवाकरपंत यांजला पुसावें. असें बोलून रागानें उठून आपले स्थळास आले.

मग चिमाबाईसाहेब व मन्या बापूसाहेब बिदा होऊन चंद्रपुरास गेले. पाठीमागें महिपतराव सुभेदार व नारो रघुनाथ राहिले. सुभेदार यांजकडे

दिवाकरपंताचा पैगम आला जे, आम्ही सर्व प्रकारें तुमचे आहों, तसेंच भवानी काळोनीही निरोप पाठविला, आम्ही सर्व गोष्टींनीं हजरच आहों. तो आतां येथें आपासाहेबांनीं यावें. चिंता नाहीं, फौज त्यांची आहे. तसेच मातबर सरदार बोवासाहेबाचे वेळचे शिवाजीपंत टाळकुटे यांनीही सांगितलें आम्ही आपासाहेबांकडे आहोंत. सिदोजी गुजराचे ज्येष्ठ पुत्र जगदेवराव गुजर, व गोविंदराव मुगुटराव, भवानी आटोळे यांचेंही सर्वत्रांचें म्हणणें पडलें कीं, सर्वत्र चाकरीस हजर आहोंत. शेवटी सर्वत्रांनी निश्चय केला कीं, जागेश्वर दैवत नागपुरास बुधवार पेठेंत आहे, त्याचे दर्शनास म्हणून जावें. तेथें बेल उचलून महिपतराव याचे हातावर द्यावा. अशी पक्कायत झाली. असें सर्वत्रांसी झालें. एक दर्याबाईसाहेब व साबाजीबोवा, भवानीपंत मुनसी व भवानी शिवराम, हे मात्र राहिले. हें सर्व वर्तमान चंद्रपुरास सेनाधुरंधरांकडे लिहून सूचना केली. त्याचें उत्तर सेनाधुरंधरांकडून, जे भवानी काळो साबाजी बोवाचे पदरचे. पहिले पासून फौज त्याचे स्वाधीन, बक्षी तेच, याप्रमाणें असतां आपले धन्याकडे जितका प्रेम राहील तितका आम्हांकडे राहणार नाही. फंदोबा तुम्ही जलद येणें असें पत्र महिपतराव यांजला आलें. मग दर्याबाई साहेबांशीं विनंति केली महाराज आपण महाडिकांची, बाबासाहेबांसी विवाह जाहला. त्या संगाचा महिमा हाच की, या दोघांच्या जुरतीच्या गोष्टी आपणास आहेत. त्यांत मुधोजीबोवा, थोरले बाबासाहेबांचे पुत्र, व जानोजी बोवाचे बंधु, एक पिण्ड त्यास किती अभिमान असावा. त्यांत कर्ते पुरुष. याचे हात जानोजीबोवास माहीत, हें आपलेही लक्षांत आहे, मी विनंति काय करूं ? हें बोलून आपले घरास आले. तंव बाईसाहेब, व मुनसी व साबाजी बोवा एकत्र होऊन ठरविलें कीं, जें आहे तेंच आहे. यासी जाऊं देऊं नये. कैद करावें. म्हणजे सर्व साध्यच आहे. ही बातमी कच्ची संताजी नायकांनीं महिपतराव यांजला सांगितली कीं, अशांत निघतां तरी बरें आहे. हें ऐकून खांसरांत* बसून रातोरात पळून जेरीगोदडचे मार्गे चंद्रपुरास आले. सारा अजबाब टाकिला. तों दुसरे दिवशीं बाईसाहेब साबाजीबोवा व मुनसी यांस कळलें कीं, सुभेदार व नारो रघुनाथ न पुसतां गेले. त्याचा अजबाब

* बैलगाडी.

जातो तो जाऊं द्यावा किंवा नाहीं असें मुनसींनीं बाईसाहेबांस विचारल्यावरून जाऊं देणें अशी परवानगी झाली.

इकडे महिपतराव सुभेदार दोन दिवसांत नागपुराहून चंद्रपुरास गेले. सेनाधुरंधर यांची भेट झाली. पूर्वी चिमाबाईसाहेबांनीं कच्चें वर्तमान नागपूरचे . गरोदरपणाचें वगैरे सांगितलेंच होतें. त्याजवर मागाहून जीं बोलणी झाली तीं महिपतराव यांनीं ऐकून विनंति केली आणि खात्री केली कीं, चिंता नाहीं, पुण्याचें संधान ठेविलें पाहिजे. याजवरून मुधोजी भोंसले सेनाधुरंधर यांनी व्यंकटराव काशी यांची सिद्धता करून, माधवराव बल्लाळ पंतप्रधान यांजपासून, सेनासाहेबांची वस्त्रें सन ११८१ चे सालीं आणवून सेनासाहेब सुभा, साबाजीबोवांस[१] केलें, हें मुधोजी भोंसले सेनाधुरंधर यांजला चंद्रपुरास समजतांच, रोष येऊन बोलले जे, "आतां वांचून काय करणें आहे?" याजवरून चिमाबाईसाहेब व लहान मोठे कारभारी यांचे विचारें बाहेर निघण्याचा बेत केला. त्या प्रसंगी महिपतराव बोलले कीं, "आमचे भाऊबंद काके चुलते, सोयरे हे म्हणून आहेत की हें शरीर स्वामीकार्यास अर्पण आहे. असो. सर्वत्रांचा निश्चय होऊन विजयादशमीचे मुहूर्तानें बाहेर निघावें." हा बेत ठरवून कांही पायदळ एदलाबाद व कायरबोरीहून बोलाविलें. तों हजार बाराशें पायदळाचा जमाव येऊन दाखल जाहला, व गोविंदराव पागेसुद्धां सेगांवीं होते ते चंद्रपुरास आणून विसोबा बापू, उमाजी आबाचे चिरंजीव, याजला पागेची व शिलेखान्याची[२] मालकी देऊन, यांचे हाताखाली गोविंदराव पागे, व एसोबा पानतावणे कारकुनीचे कामीं व निंबाजी शिवदेव यांजकडे एकांडे व घरपागा, राजेश्वर दिनकर यांजकडे व पांडुरंग सूर्याजी बक्षी व आपाजी भगवंत चिटणवीस व रामराव अनंत गावड्याचे पतक व उमाजी विनायक पंतप्रधान यांजकडेस विसाजीपंत बिनीवाले यांचे बरोबर होते, त्यांजला पत्रें पाठवून अमदानगराहून आणविले.

असा जमाव झाला. हें होऊन निघण्याचा निश्चय करून चंद्रपुरीं चिमाबाईसाहेब व चिमणा बापू भोंसले, व मन्या बापूसाहेब, यांजजवळ

---

१. धाकटे रामराजे यांचें चरित्र पृष्ठ ३७ पहा.

२. हत्यारें ठेवण्याचें गृह.

महिपतराव याचे पुत्र बळवंतराव त्याचे हाताखालीं नारायण रघुनाथ असे होऊन, चंद्रपुरचा बंदोबस्त केला.

**मुधोजीची साबाजीवर स्वारी**:—रामाजी केशव यांनीं आपले फडणशीचे हिशाचे कामीं, उमाजीपंत आबास ठेविलें. बाबूराव गोविंद व चिमाजीबोवा यांजकडे बल्लालपूरचे* राजाचा कारभार नेमून दिला व बापूजी धर्माजी पहिलेपासून चिमाबाईसाहेबांचे प्रेमांतील जाणून शिरपूरचे कामावर ठेवून, सरकार स्वारी रघोजीबोवा बापूसाहेबांसहित निघोन, त्या समयीं रामाजी केशव यांजला स्वारी समागमें घ्यावयाकरितां, महिपतराव सुभेदार पंतप्रधान मशारनिल्हेचे घरीं आले असतां उत्तर केलें कीं, "सेनाधुरंधराचे सोबतींत राहून उद्योग करून थकलों, तुमची उमेद आहे तरी श्रम करावे, आमचें येणें होत नाही." याजवरून रामाजीपंताचे चिरंजीव गबाजी याजला घेऊन सुभेदार सेनाधुरंधर यांजकडे आले. नंतर स्वारी चंद्रपुराहून निघाली तों कायरबोरीचे मार्गे एदलाबादेस आली. तेथून इब्राहिमबेग धवसे जफरूद्दवला नबाबाकडील सरदार निर्मळचे त्याजवळ होते. त्यांजकडेस संदर्भ लावून ते व आपण एक व्हावें असा बेत सेनाधुरंधरांनीं महिपतराव यांचे साहयानी लिहून पाठविला कीं, आम्ही तुम्हांकडेस येतों, आमची मदत करून कार्य सिद्धीस न्यावें. असें लिहिण्याचें कारण हेंच कीं, धवशाचा व सेनाधुरंधरांचा मुफासला जवळ राहिला. आणि याजपाशीं फौज थोडी. धवशाची जमा बहुत त्याचा व मुनसीचा प्रेम भारी, तेव्हां दगा केल्यास परिणाम नीट नाहीं, हें समजून त्यास भुलथापीचीं पत्रें पाठवून सेनाधुरंधर जलदी करून दरमजलींनी माहुराहून वऱ्हाडांत गेले.

**मुधोजीकडील लोक**:—तेव्हां नागपुरांतील लोक फुटून भवानी आटोळे पांचशें लोकांनिशीं व गोविंदराव मुगुटराव आपले लोकांनिशीं व शिवाजीपंत टाळकुटे दोन हजार लोक व जगदेवराव गुजर शेंदीडशें स्वार घेऊन, आपासाहेबांजवळ येऊन पोंहोचले. व तिकडेस लोकांचा जमाव वऱ्हाडप्रांतीं खंडोजी आडाव करांडे यांचे पदरचे व रणसिंग नाईक निंबाळकर दहिगांवकर व शंकराजी राजे घोरपडे व घाडगे झुंझारराव असे देशाहून साबाजी भोंसले

---

* हा गाव चंद्रपुरापासून तीन कोसांवर वर्धातटाकीं आहे. गोंड राजांची ही पूर्वी राजधानी होती. हल्लीं येथें कोळशाच्या खाणी आहेत.

यांनीं बोलाविले होते सबब ते येत होते. त्यांस मुधोजीबाबा यांनीं वकील, पाठवून बोलणें लाविलें कीं, तुम्हीं आम्हांकडे असावें. त्यांनीं उत्तर केलें जे " आम्हांस चारशांचा शेरा व जातीचें बोलणें शिवाय या प्रमाणें ठरवून आम्हांस बोलाविलें असतां, तुम्हांकडे कसें यावें. याजवरून महिपतराव सुभेदार यांनीं राजमंडळचे लोकांची खात्री करून साडेचारशांचा शेरा व जातीचें बोलणें तहाशिवाय दोन हजार जास्त व हत्ती एक असें कबूल करून आणिलें. तेव्हां सदहू जमाव भारी झाला. तिकडे साबाजीबोवा सेनासाहेब सुभ्यांचीं वस्त्रें घेऊन फौज लक्ष्मणराव पाटणकर व सिदोजी गुजर व सुरतसिंग हजारी व नऱ्होजी जाचक व जगोजी यादव व मजितखान रोहिले वगैरे घेऊन निघाले तेही वऱ्हाडाचे सुमारें आले.

**दर्याबाई व साबाजीकडील मंडळी** :—साबाजीबोवा व दर्याबाईसाहेब यांजकडून भवानीपंत मुनसी अळजपुरास इस्मायलखान भाई याजकडेस आले. मुधोजीबोवा, रघोजीबोवा यांजकडून महिपतराव दिनकर भाईचे भेटीस अळजपुरास गेले. बोलावणें दोहीकडील आलें सबब इस्मायल खान कांहीं एक दिवस राहून पिसेपणाचें सोंग घेंऊन आपला कारभारी जिवें मारिला. मुनसीस जा म्हणून दोहींकडूनही अवघड यास्तव ही सल्ला योजून महिपतराव याजकडे मुधोजीबोवाचे योगानें आस्था फार तेव्हां २०० स्वारांनिशीं पोंहोचवावयास रामचंद्र दादो बरोबर दिले. ते मुधोजीबोवाजवळून पोंहोचून माघारे फिरले. भवानीपंत मुनसीचे सोयरे यांजलाही इस्मायलखान भाईनीं मारावयाचा विचार मार्गात केला; कारण हा खेळ मुनसीनें केला, यास्तव पळून रामचंद्रपंत अळजपुरास पोहोंचले. पुढें मग पळून गोविंद दादोस घेऊन मुलें लेंकरासुद्धां पहाडांतून निघून बऱ्हाणपुरास गेले.

**कुंभारीची लढाई** इ. स. १७७३ :—इकडे फौज मुधोजीबोवावर देवाजीबोवाजवळ २५००० व साबाजी भोंसले दर्याबाईसुद्धां २०००० असा जमाव होता. मुधोजीबुवाचें "सीताकांताचें"* निशाण, रामाजी केशव यांचे पुत्र गबाजी करीत होते. रघोजीबुवा चंद्रपुराहून निघाले ते वेळेपासून "सेनासाहेब सुभा" अशीं ताकीद पत्रें प्रांतावर सुरू जाहलीं. त्यांचे दिवाण महिपतराव दिनकर यांनीं "लक्ष्मीकांताचें"* निशाण करावें अशी ताकीद

* 'सीताकांत' हीं अक्षरें निशाणावर लिहिलेलीं होतीं. तसेंच

सेनासाहेबांचे नांवें वऱ्हाडप्रांतीं व गंगथडीस चालले. नंतर आकोले बाळापुराजवळ कुंभारगांव[१] येथें साबाजी भोंसले व मुधोजी भोंसले यांची लढाई जाहली. सेनाधुरंधराचा हत्ती निशाणाचा मुलाना मदारी या नांवाचा होता व साबाजीबोवाकडील निशाणाचा हत्ती बरमबाली या नांवाचा याणें मदारीस लढाईचे समयीं टक्कर मारली. तों हत्तीवरील निशाण सेनाधुरंधरांकडील खालीं आलें. लढाई सिकस्त जाहली. जिजाजी भोंसले गोत्र पुरुष मारले गेले, सबब सुतकामुळें बारा दिवस लागले. व उभयतांकडील सरदार यांणीं बोलण्यांत आणिलें कीं, भांडूं नये; सल्ला करून सफाई करावी. याजवरून मुधोजी भोंसले यांणीं लढाई दोन दिवस तहकूब केली. आणि सख्यत्वाचा विचार करून परस्पर लेख झाले कीं, रघोजी भोंसले यांजला जानोजीबोवांनीं मालक केलें, ती मालकी त्यांचीच आहे. साबाजी भोंसले यांणी दिवाणगिरीचा कारभार मुधोजी भोंसले सेनाधुरंधर यांणीं मिळून करावा, असें होऊन सेनाधुरंधर यांणीं शकट–भेद[२] करून दर्याबाईसाहेबांस आपलेकडेस आणलें व ते सेनाधुरंधरापाशी येऊन राहिले.

नंतर मुनसीचा विचार थकलासा जाहला. साबाजीबोवाजवळ कारभारी भवानी शिवराम होते व धवशा[३] याजला सेनाधुरंधराचें बोलावणें पेशजी गेल्यावरून तेही निर्मळेहून आले होते. इकडे दर्याबाईसाहेबाचे व सेनाधुरंधर यांच्या भेटी होऊन सफाई झाल्यावरून धवशे याजला सेनाधुरंधरांनीं उत्तर लिहून पाठविलें कीं, "आमचें कार्य झालें." ही संधि पाहून भवानी शिवराम यांणीं साबाजीबोवास सुचविलें कीं, "उगीच दोन दिवस डोळेझांक करून दिवस घ्यावे हें चांगलें नाही; धवशे अनायासें आले आहेत यांजला आपलेकडे मिळवून घेऊन सेनाधुरंधराचें पारिपत्य करावें." याजवरून साबाजीबोवांनी धवशे यांजला सामलातीस बोलाविलें. त्याजवरून पुनः बिघाड जाहला. तेव्हां सेनाधुरंधरांनीं इस्मायलखानास आपले मदतीस बोलाविले. त्याजवरून खानमशारनिल्हे सेनाधुरंधराकडे आले. दर्याबाई-

---

'लक्ष्मीकांत' हीं अक्षरें निशाणावर असत.

१. कुंभारी—ही लढाई सन १७७३ त झाली.

२. फंदफितुर करणें.

३. लेखांक ११ पृष्ठ २६ टीप २ व लेखांक २६ पृष्ठ ६५ टीप ३ पहा.

साहेब यांजपाशीं आहेतच तंव भाई येऊन भेटले. तों धवसे व साबाजीबोवा एक होऊन सेनाधुरंधर वगैरे यांचे पाठीमागें लागले. ते सेनाधुरंधर वराडांतून नागपुराकडे आले. वाटेंत रामाजीचे पुत्र गबाजी यास मांदगी होऊन काल जाहला.

मग मुधोजीबोवाची स्वारी नागपुरावर आली. नागपुरांत तुळजोपंताचे[१] पुतणे माणको अमृत[२] व चिरंजीव यमाजी तुळजो ते भेटीस आले. नागपुरचे मुक्कामीं भेटी झाल्या. मुनसीचीं मुलेंमाणसें व पुत्र लक्ष्मणपंत होते ते धरले. दिवाकरपंत कैदेंत होते ते सोडविले. हुशनखान फौजदार व भिवाजीपंत याजला बरोबर घेऊन सेनाधुरंधर चंद्रपुरास गेले. शहराबाहेर स्वारी उतरली. महिपतराव सुभेदार शहरांत आले. रामाजीपंताचे[३] घरीं जाऊन बहुतां प्रकारें समाधान त्याचे पुत्र वारले म्हणोन केलें. आणि चलावें म्हणून बोलले. त्यांचें येणें न झालें. त्याचे कनिष्ठ पुत्र माधवराव नाना बिबाजीबोवाजवळ छत्तीसगडास होते त्यांस आणावयास पत्रें पाठविली. रामाजीपंत चंद्रपुरींच राहिले. तेव्हां सेनाधुरंधरांनीं चिमाबाईसाहेब व चिमणाबापू व मन्याबापू यांस घेऊन निघाले. महिपतराव याचे पुत्रासही बरोबर घेतलें. सुभ्याचें काम नारो रघुनाथ यांचे जिमेस केलें. निबाजी शिवदेव याजला दीड हजार स्वारांनिशीं चंद्रपुरीं ठेविलें. धवसा येणार म्हणोन तेथोन कूच करून एदलाबादेस कायरबोरीचे रोखें निघाले. माहुरास गेले, मागें धवसा व साबाजीबोवा नागपुराहून चंद्रपुरास न जातां माहुराकडून वराडांत आकोलें बाळापूर कारंज्यावरून अलजपूरचे सुमारास आले. वाटेंतून धवसा फिरून हैद्रराबादेस जाऊन रुक्कनद्दौला यास माहुराजवळ ठेवून घेऊन अलजपुरावर साबाजीबोवा धवसे रुक्कनद्दौला एकत्र होऊन अलजपुरास मोर्चे बसविले. सेनाधुरंधर आषाढमासी अलजपुरास होते. तेही बंदोबस्त पक्का राखून दहा पांच कोस जळगांव जामादेचे सुमारास गेले. तशांत रुक्कनद्दौला व धवसे यांणी विचार केला कीं, इस्मायलखान पेशजी आम्हांकडे न येतां सेनाधुरंधराकडे जाऊन मिळाले. सबब त्यांचा सुभा

१. मागें पृष्ठ ३६ टीप ६८ पहा.
२. मागें पृष्ठ ७५ पहा.
३. रामजी केशव तिखे.

काढून अलजपूर हस्तगत करावें. हें सेनाधुरंधर यांणीं पाहून बाळकृष्णभट पटवर्धन यांस मध्यस्तीकरितां रुक्कनद्दौला याजकडे पाठविलें. याचे, हाताखालीं देवाजीपंत चोरघोडे यांस दिलें. भटजी व देवाजीपंत यांणीं रुक्कनद्दौलासी भेटी घेतल्या, रुक्कनद्दौलांनी विचारिलें कां आलांत? त्याजवरून उत्तर केलें जे सेनाधुरंधरांनी व भाईनीं आपणाकडे जाबसालाकरितां पाठविलें. याजवरून रुक्कनद्दौला बोलले की, अलजपूर ही जागा आमची. मामलेदार हे आहेत. ठेविल्यास राहावें. नाही तर इतका जोर कशास पाहिजे. याजवरून उभयतां बोलले कीं, मामलत आपली, चार महिने बरसात गेल्यावर आपण घ्यावी, सांप्रत भांडूं नये. नंतर देवाजीपंत याचा व इस्मायलखान भाई यांचा द्वेष होता तो त्यांणीं मनांत आणून ओळख नसतां, आंतले बेतानीं सूत्र लाविलें. तेव्हां धवशे देवाजीपंतांस बोलले कीं, सेनाधुरंधर पंधरा वीस कोसपर्यंत गेले, तर एक रात्रींत अलजपूर आम्ही घेतों, हें तुम्हीं करावें. असें ऐकून देवाजीपंतांनीं सेनाधुरंधरास पत्र लिहिलें की, "महाराजांनीं जळगांव जामोदेचे सुमारें जावें, वीस कोसांची लांबण पडली म्हणजे आपले आज्ञेप्रमाणें तहही होतो. सर्व महाराजांचे मनोदयानुरूपच घडेल." असें लिहिल्यावरून दर्याबाईस घेऊन सेनाधुरंधर जळगांवाकडे फसली सन ११८२ चे साली गेले. इकडे धवसांनीं अलजपुरास मोर्चे बसवून गोळे सुरू केले. फारच कडी केली. तंव इस्मायलखान भाई जातीनें बाहेर येऊन यांचे मोर्चे उठवून लावले. ते दिवशीं भाईची फत्ते जाहली. दुसरे दिवशी गोळे कां वाजतात म्हणोन सेनाधुरंधर यांणीं बातमी पाठविली. बातमीवाला माघारी खबर घेऊन आला की, लढाई जबरी जाहली. तेव्हां रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा दर्याबाईसाहेब व सेनाधुरंधर फौजेसुद्धां येऊन रुक्कनद्दौला व धवशा याची कही मारली. तिकडून झार्मसिंग यांणीं किल्ल्यावरून लोक पाठवून पहाडांतून तिकडूनही कही मारावी, त्याजवरून रुक्कनद्दौला लाचार झाले. किल्ल्यावरून भाईनीं मार दिला. असें आठपंधरा दिवस झालें.

त्या संधींत माधवराव पेशवे पडल्यावर* नारायणराव पंतप्रधान झाले. यांणींही माधवराव यांचे मागें सेनाधुरंधराशीं द्वेष चालविला. खंडेराव

* मेल्यावर.

दरेकर पंधरा सोळा हजार फौजेनिशीं सेनाधुरंधराचे पारिपत्यास पुण्याहून रवाना केले. ते गंगथडीस आले. तेथून सेनाधुरंधरांनीं रघोजीबोवा सेनासाहेब सुभा यांजवळ कारभारी मल्हारपंत अण्णा पाटणकराचे दिवाण, व शंकाजीराजे बोरपडे यांचे कारभारी गंगोपंत असे देऊन फौजेसुद्धां अलजपुराजवळून रवाना केले ते घाटाजवळ लाखणवाड्यास गेले. इकडे चंद्रपुरीं महिपतराव सुभेदार यांचे बंधु राजोबा व निंबाजीबोवा दोन तीन हजार फौजेनिशीं ठेविले होते. धवसे चंद्रपुरास लागतील तेव्हां मजबूद मनुष्य लढणारा असावा म्हणून उभयतां बंधु व मोरो शंकर पागा कुटुंबाचे रक्षणास्तव, बलकुबल* पडल्यास घेऊन बाहेर जातील. यास्तव घरपागा व दोनशें स्वार, व्यंकटराव काशीची पागा शंभर स्वार, निंबाजी शिवदेव याचे तैनातीस ठेविले होते. चंद्रपुराभोंवतीं सटवाजी भोंसले व देवाजी नारायण वगैरे निसबत साबाजी बोवा सन ११८२ चे साली प्रांतांत फिरत होते. तशांत दोन हजार लोकांनिशीं निंबाजी शिवदेव वैरागडास प्रतापगडाकडे ठेवून, कांहीं तंबी करून खंडणी घेतली. नंतर ब्रह्मपुरीवर आले. तेथें लढाई जाहली. तों मोरो शंकर गोळ्या लागून कामास आले. मग तेथून चंद्रपुरास आले, तों सरकारचें बोलावणें आलें की, तुम्ही जलदी येणें. रघोजीबोवा गंगथडीस खंडेराव दरेकर यांजवर जातात, सबब तुम्ही जलद यावें, याजवरून तीन हजार फौज व घरपागा दोनशें स्वार घेऊन राजोबा व निंबाजी बोवा मिळोन निघोन चालले. ते वेळेस रामाजी केशवही निघोन या समागमें निघाले, ते दरकूच लाखणवाड्याचे घाटाजवळ येऊन भेटले. रघोजीबोवा यांनी महिपतराव दिनकर याचे पुत्र बळवंतराव महिपत अलजपुरास मोर्चे लाविले, ते समयीं वेळ्यांस ठेविलें ते महिना दीड महिना होते. त्यांस रघोजीबोवांनीं स्वार देऊन बाळापूर परगण्याचे वेळे‡ सरकार पाटीलकी देशमुखी तेथें होती, त्यास तेथें आपलेजवळ नेलें, व इकडून राजोबा

---

* संकटसमय.

‡ वेळे—व्याळें—हा गांव वऱ्हाडांत बालापूर तालुक्यांत आहे. तेथील पाटीलकी पहिल्या रघूजीनें खरेदी घेतली होती. तेथें गांवास परकोट वगैरे खुणा अद्याप आहेत. (सं.)

व निंबाजी शिवदेव, रामाजी केशव आले. फसली सन ११८२ चे सालीं. असे सर्वत्र मिळोन पंधरा वीस हजार फौज जाहली. खंडेराव दरेकर याजवर जरब पडली. तेही मुक्काम करून तिकडे राहिले.

**सुरतसिंग हजारीः**—इकडे सुरतसिग हजारी सात भाऊ याचा तपशील, सुरतसिंग व बिकमराम भय्या व भगवंतसिंग हजारी व दीपसिंग हजारी व किरतसिंग हजारी व मदतसिंग हजारी व छत्तनसिंग हजारी वगैरे सात भाऊ संगमनेरकर हे दाभाडे यांचे चाकर होते. सुरतसिंग यांनीं कारभार खासगीचा कांही एक दिवस करून होते. लायक, हुषार, शाहणे पाहून सुरतसिंग याजला पागेचें काम सांगितलें. दरोबस्त पागा जिमेस केली. आणि सेनापति यांनीं पुत्रवत् लोभ करून होते. तों सेनापतीशीं व पंत-प्रधानाशीं बिघाड होऊन एक दोन लढाया झाल्या. यांत त्या प्रसंगी सुरतसिंग हजारी यांनी घोडे चालवून दाभाडे सेनापतीचा अत्यंत लोभ जाहला. याज-वर सेनापतीचा काळ जाहला. तेव्हां नाना भाऊ पेशवे यांनीं लढाईचे प्रसंगीं हजारीचें कामकाज पाहून लोभ करून जवामर्दी मनुष्य जाणून बाराशें लोकांचें पतक चाकर ठेविले. हत्तीवरील निशाणें येणेंप्रमाणें असतां, राक्षसभुवनची लढाई होऊन जानोजी भोंसले नागपुरास येऊं लागले, ते काळीं सुरतसिग हजारीस पतकासुद्धां जवामर्द मनुष्य म्हणोन जानोजीबोवांनीं आणून ठेविलें, आणि बावीस महाल वरघाटचे जाहागिरी दिले. जानोजी-बोवा माधवराव यांची भेट घेऊन माघारे आले. जानोजीबोवांचा काळ झाल्यावर दर्याबाईचा व मुधोजीबोवाचा रसाभास[1] होऊन, साबाजीबोवाचा व मुधोजीबोवाचा कलह लागला. ते काळी सुरतसिंगाचे शंभर स्वार बैतुलाचे ठाणावर होते, तेव्हां सुरतसिंगांनीं आपले भले लोक यांस बैतुलास सांगोन पाठवलें कीं, मुधोजी भोंसले यांजकडून कोणीं आलें असतां मानूं नये. असें लिहिल्यावरून ते सावध होते. तों झामसिंगाचे पुतणे गंगासिंग यांजला मुधोजीबोवांनीं बैतुल वगैरेचे बंदोबस्तास पाठविलें. तेव्हां गंगासिंग हजार लोकांनीं मोहऱ्यावर तीनशें स्वारांनिशीं गेले. तेथें लढाई झाली. ते काळीं पन्नास स्वारांनीं बेलाशक हजार लोकांवर चाल करून गेले. हजार लोकांचा मोड जाहला. छोटेलाल भंडारवाले यांनीं 'बारनिशी' गंगासिगास

१. रसाभास एकी.

मारलें ते ठार जाहले. फौज गंगासिंगाची पळाली. याजवर सुरतसिंग हजारी यांनीं साबाजीबोवांस सल्याचे पोटी म्हटलें कीं, "भावाभावांचा कलह होऊन फौजेचा व प्रांताचा नाश व्हावा हें चांगलें नाही." या म्हणण्या-वर साबाजीबोवांनी वैषम्य मानून मनांत आणलें कीं, हजारीचें आंग मुधोजी-बुवाकडे आहे. मजीना उभ्या राहिल्यावरून हजारी मजकूर सेनाधुरंधराकडे जाऊं लागले. ते अलजपुराकडे जाते वेळेस सटवाजी भोंसले यांजला हजारीचे पारिपत्यास पाठविलें. ते समयीं पुसल्यावर लढाई होऊन कांहीं एक अफरा-तफरा होऊन सात आठशें लोकांनीं मुधोजीबावा जवळ पोंचले. तों इकडे अलजपुराकडे अलजपुराबाहेरून सेनाधुरंधर यांनीं कहीवाले माणसें वगैरे मारावी व लष्करांत अवाई व्हावी कीं, रात्रौच सेनाधुरंधर येऊन लुटतात. हें ऐकून रुक्कनद्दौलाची फौज हवालदील जाहली. कही येईना. आंब्याचा पाला सुद्धां राहिला नाहीं. उत्तरेकडेस किल्ला गोवळच्याचे बाजूनें ही कही झामसिंगांनीं मारावी, आंतून भाई इस्मायलखानांनीं जेर केलें. तें रुक्कन-द्दौलास समजलें कीं, कसेंही करून समेट घालून आपले मुलालेंकरांत जावें. त्यांजवरून बाळकृष्णभट पटवर्धन यांस पैगम करून सेनाधुरंधर यांचे भेटीची योजना केली. सेनाधुरंधर सांगतील तसेंच करूं, असा निश्चय पक्का होऊन रुक्कनद्दौलाचा व इस्मायलखान भाईचा तह झाला. पहिलें बोलणें चार महिन्यांचें होतें तें राहून अलजपूर पौष माघांत द्यावें असा ठराव होऊन, तह जाहला. मग सेनाधुरंधर व रुक्कनद्दौलाचे भेटीचा योग बाळकृष्ण भट पटवर्धन यांचे विद्यमानें पक्कायत जाहला. देवाजीपंतांनी फितूर केला, सबब ते रहित होऊन भेटीचा योग जाहला. रुक्कनदौलाचे फौजेचे कोरबंदी* दुतर्फा सेनाधुरंधर खांसे खांसे सडे हजार बाराशें लोकांनी त्याच्या फौजेंतून भेटीस आले. हवद्यांत बसून खवासखान्यांत महिपतराव सुभेदार समागमें उमाजी विनायक वगैरे असतां तिकडून रुक्कनद्दौलाही आले. मध्यंतरीं उतरून उभयतांच्या भेटी झाल्या. नंतर आपले जमावासहित कोरबंदीचे बाहेरून आपले स्थळास आले. मेजवान्या झाल्यास आठ रोज झाले.

**पुण्याचें कारस्थानः**—तंव व्यंकटराव काशी व लक्ष्मणराव काशी रघोजीबोवा यांचे नांवें सेनासाहेब सुभा यांचीं वस्त्रें आणावयाकरितां पेशजी

---

* कोरबंदी—सैन्यरचना.

पुण्यास गेले होते. तेथें असतां इकडे वस्त्रें न मिळतां, खंडेराव दरेकर यांणीं साबाजीबोवांची मदत करून सेनाधुरंधरांचें पारिपत्य करावें यास्तव नारायणराव यांनी पाठविलें. ते समयी मुधोजीबोवा यांनी व्यंकटराव काशी व लक्ष्मणराव काशी यांस लिहिलें कीं, "आतां तुम्ही कोणतेही गोष्टीचा संशय न घेतां, दादासाहेबांशी राजकारण करून ज्या तऱ्हेनें बनेल त्या तऱ्हेनें आपली गोष्ट सिद्धीस न्यावी." याजवरून लक्ष्मणराव काशी यांनीं दादासाहेबांचे भेटीचा उद्योग मांडला. तो पूर्वी हैदरनायकाचा वकील, दादासाहेब कैदेंत असतां सरकार वाड्यांत जात येत होता, तो धरून त्याचें पारिपत्य करून बंदोबस्त फारच केला. रीघ न होई. असें असतां युक्तीनें जाण्यायेण्यास्तव नारायणराव पंतप्रधान नासीक त्रिंबकास गेले, त्या संधीत जाणें येणे सुरू केलें. आणि सखाराम हरी परभु व मानाजी शिंदे फांकडे आदीकरून नारायणराव यांचे चालीवरून रुष्ट होते. फंदांत मिळवून घेतले कीं, दादासाहेबांस आम्हीं बाहेर काढल्यावर तुम्ही सामील होऊन अनुकूल व्हावें असा विचार करून दादासाहेबांजवळ हवेलीत जाऊन दादासाहेबांस दरवाज्याजवळ बाहेर आणलें. जवाहीर अंगावर होतें तों दरवाज्यावर दुशाख[१] जळत होती; त्या उजेडानें लक्षुमणराव याचा हात धरून पुढें चालले. तों शिरपेंच जवाहीर चमकले, तें पहारेवानांनी पाहून धांवून येऊन विनंति केली कीं, हे काय? आमची डोसकीं जातील. तेव्हां लक्ष्मणराव हात सोडून पळाले ते बाहेर किल्ल्याचे चबुतऱ्यावर ब्राह्मण जानवी करीत बसले होते, त्यांत लपून बसले, आणि ब्राह्मणास म्हणाले कीं, पहारेवान तुम्हांस धरावयास येतात, त्याजवरून सर्वत्र ब्राह्मण पळू लागले त्यांत हेही पळाले. मार्गातून शिपाई पहारेवान आले, तों सारेच ब्राह्मण पळतात. कोणास धरावें हें जाणोन माघारे आले. लक्ष्मणराव काशी निघोन कोथळ्यास गेले. ही बातमी नारायणराव यांस स्वारींत समजली. याजवरून येऊन चौकशी केली. खोजलाग लागला नाही. मग दादासाहेबांचा बंदोबस्त करून ठेविलें. देवपूजा करूं देऊं नये; कीं या योगानें माझा भाऊ मारला असें म्हणोन खोलींत ठेविलें. दादासाहेब अर्घ्यप्रदान सूर्यदर्शन घेतल्याविना अन्न भक्षू नये, हा नेम होता. खोलींत

१. दीप.

राहिल्यामुळें पाच उपोषणें जाहलीं व दादासाहेबांचे स्त्रियेस लुगड्यांत फंदाचे कागद लपविले या निमित्यानें लुगडें फेडून छळणा करावी; ‡ असे अविवेकी विचार पाहून, लक्ष्मणराव* काशी कोथळ्याहून पुण्यास येऊन नारायणराव यांजकडील तुळाजी खिजमतगार व त्याचा कारकून फंदांत मिळवून त्याचे हातून खडगसिंग व सुमेरसिंग व महमदईसफ गारदी यांचें सहा हजार माणूस सरकार वाड्याचे पहाऱ्यावर होतें. सबब तीन लक्ष रुपयांची चिठी खास दस्तुर दादासाहेबांची आणून गारदी यांस देऊन नारायणराव धरावे, असा विचार केला. यांतील कांहीं एक इषारा त्या दिवशीं नारायणराव पेशवे आंग्रे[१] सरदार कोंकणांतील आले होते त्यांचे भेटीस जाऊन येत असतां मार्गांत पर्वती जवळ समजलें. याजवरून हरीपंत तात्यांस सुचवून बोलले कीं, "आतां आम्हांस निद्रेनीं व्यापिलें. सबब आम्ही जातों, झोंप घेऊन येतों. तोंपावेतों तुम्हीं जलदीनें येणें म्हणजे जे या फंदांत आहेत त्यांचें पारिपत्य करण्यांत येईल. हें बोलले.

**नारायणराव पेशव्याचा खून** इ. स. १७७३:—तों तुळाजी खिसमतगार जवळ होता यानें ऐकून सर्व लोकांस हुषार केलें कीं, झोंप घेऊन उठतात तंवपावेतों जलदी कार्य उगवावें. याजवरून गारदी यांनीं सर्व जमाव पांच सहा हजार लोकांचा हजेरीचे वाटण्याचे हवेलीचे जवळ बोलावून जागजागीं नाकेबंदी करून वाड्यांत आले. तों नारायणरावसाहेब यांजपाशी नारोजी नाईक होता तो बोलला कीं, नहराची† वाट मला ठावूक

---

‡ वरील आरोपांत अतिशयोक्ति असण्याचा बराच संभव आहे.

* परभू जातीचा छळ नारायणराव ह्यांच्या मरणास अंशतः कारणीभूत होता. परभू लोकांकडून लिहून घेतलेला दस्तऐवज त्यांनीं प्रथम जाळून टाकविला तेव्हां नारायणरावाचें प्रेत दहनास जाऊं दिलें असें म्हणतात. या दस्तऐवजाची नक्कल आमच्या पाहण्यांत आहे. त्याजवर तेव्हांच्या ११ प्रमुख परभू गृहस्थांच्या सह्या आहेत. (प्र. आ.) नारायणरावानें परभू लोकांचा छळ केल्यामुळें ते सर्व नारायणरावाच्या विरुद्ध असून दादासाहेबांस सामील होते. लक्ष्मणराव काशी व व्यंकटराव काशी हेही प्रभु ज्ञातीचेच होते. (सं.)

१. राघोजी आंग्रे सरखेल.

† नहराची–नळाची. वाड्यांत नळ आणिला होता त्यांतून पळून

आहे तिकडून तुम्हांस घेऊन जातों. याचें उत्तर रावसाहेबीं केलें कीं, या सालीं पाण्यांतील सर्पभय ज्योतिष्यांनीं सांगितलें आहे, तेथें ही सल्ला चांगली नाहीं. असें म्हणोन नाईकाचें न ऐकतां भाऊसाहेबांची स्त्री पार्वतीबाई होती तिजकडे जाऊन हें वर्तमान सांगितलें तेव्हां ती बोलली की, हें कृत्य तुमचे पितृव्याचें आहे, त्यांजकडे जावें म्हणजे प्राण वांचेल. त्याजवरून दादासाहेबांकडे जाऊन पायांवर डोई ठेविली, आणि बोलले जे, मजला वांचवावें. त्या समयी दादासाहेबांनी उत्तर केले की, माझे मागें कोठडी आहे, त्यांत जाऊन लपावें. तें रावसाहेबांचे विचारास न येतां गळयास मिठी मारिली. तों गारदी येऊन पोंचले. त्यांनी दादासाहेबांस बोलले की, सोडावें. दादासाहेबांनी पुढें आपला हात करून म्हणाले की, बाळ आहे याजला मारूं नये, वांचवावें. तों तुळाजी खिसमतगार यानें नारायणरावाचे पाय धरून ओढले. गार्द्यानी कमरेंत तेग्याचा हात चालविला. ते समयी वार पुरा लागून कारगीर[1] जाहला. केशरी भात खाल्ला होता तो पडला. दादासाहेबांचे हातावर वार आला. डोईसही लागलें. नारायणराव मारले गेले. सन ११८३ सालीं. दादासाहेबांची द्वाही वाड्यांत फिरली. दादासाहेब बोडके बसले होते. सुमेरसिंगानें आपलें पागोटें त्यांचे डोईस घातलें आणि बोलले, जे दुसमान मारला, खुष करावें. आम्ही सर्व आपले आहोंत. तंव गांवांत गुल जाहली. तेव्हा मातबर सरदार मुत्सद्दी जमा जहाले. भवानराव प्रतिनिधि व बजाबा पुरंदरे व मोरोबा फडनवीस व सखाराम बापू व हरीपंत फडके व त्रिंबकराव मामा वेशीचे चावडीवर बसले, आणि मनसुबा आपले ठिकाणीं करतात की हें काय झालें ? दोघे खांसे आंत जनानखाना आवरून आहेत. तेव्हां वाड्यास तोफा लावाव्या म्हणून ठरविलें. तों सखाराम बापू बोलले कीं, दोघे खांसे आंत असतां तोफा कशा लावतां ? असें बोलतात तंव पर्यंत गार्दी यांनी दादासाहेबांची द्वाही फिरविली. हें ऐकून सखारामपंत व हरीपंत उठोन गेले. वरकड मंडळी सर्वत्र बसलीच होती. तितक्यांत, भवानराव प्रतिनिधि मातबर, पेशव्यांचें बरोबरीचें प्रस्त, ते बोलले की, दादा-

---

जाण्यास मार्ग होता असें यावरून होतें. भुयारांतून चोरवाट होती असेंही म्हणतात.

१. लागू.

साहेब व आम्ही कांहीं परके नाहीं. वाड्यांत जाऊन शोध मनास आणावा. असें म्हणोन उठोन सरकारवाड्याकडे गेले. बजाबा पुरंदरे समागमें घेतले. वाड्यांत गारद्यांस सांगितलें जे, भवानराव व बजाबा पुरंदरे आले म्हणोन सांगावें व त्याजवरून आज्ञा जाहली कीं, दोघांस येऊं द्यावें. मग दोघे आंत गेले. दादासाहेब बसले होते. भवानराव प्रतिनिधि जवळ जाऊन बसले आणि पुसलें की, आपण आहेत, राव दिवस नाहीत! तेव्हां कोठडींत लोथ पडली होती ती पाहून भवानराव बोलले आपण असतां असें घडावें कीं काय? दादासाहेब बोलले की, ईश्वर इच्छा अशीच आहे यास उपाय काय? आतां सार्थक करावें. त्रिंबकराव यांस बोलवावें, असें भवानराव बोलले. उत्तर दादासाहेबांनीं दिलें, बोलवा–मग त्रिंबकरावांस बोलाविलें. ते आले. सरंजाम तयार करून न्यावयास सांगितलें. तो नारायणराव यांची स्त्री गंगाबाईनी आक्षेप मांडिला की, शय्यागमन करितें. तें दादासाहेबांनी समाधान केलें कीं, तुजला एक मास जाहला आहे, तूं जाऊं नको, मजला पूर्वीपासून राज्याची अपेक्षा नाही, हे वार्त्याचे[1] कर्मानींच ही दशा जाहली यास काय करूं? स्नानसंध्या देखीलही करूं देऊं नये हा विचार त्याचा. तुजला पुत्रच होईल. न जाहल्यास तुझे ओटीत दत्तक देऊन त्याचे नांवें राज्यकारभार चालवू. असें बहुत प्रकारें समजावून ठेवून घेतलें. नारायणराव यांचें दहन प्रहर रात्रीस केलें. नंतर दुसरे दिवशीं सरकार वाड्यांत आपलें कोणी नाहीं, तेथें सखाराम हरी होते त्यांस आज्ञा केली कीं, तुमचे लोक कांहीं आहेत की काय? त्यांनीं विनंति केली जे, स्वामीस येथून काढावें. यानिमित्त दहा हजार फौज आपले ममतेंतील आतां हजर आहे. आज्ञा जाहली कीं, तूर्त चारशें लोक येऊं द्यावे. याजवरून लोक बोलाविले. ते आले. त्यांचे खास पहारे वाड्यांत त्या लोकांचे बसविले. नंतर दादासाहेबांनीं आज्ञा केली कीं, भोंसल्याचे वकिलास बोलवावें. त्याजवरून त्रिंबकराव मामा यांनी महिपतराव विश्वनाथ साबाजीबोवाकडून वकिलीचे कामावर होते त्यांना बलावून आणिलें. हे आपले मातबरीनें इतमामानें गेले. दादासाहेब बोलले कीं, हे नव्हेत. कोथळेकर व्यंकटराव काशी व लक्ष्मण काशी यांस बोलवावें. याजवरून

---

१. वारता—मरणारा, नारायणराव.

तपास करून घेऊन आले. पाहून दादासाहेबांची मर्जी संतोषास पावली. नंतर मुधोजीबोवास आणविण्याकरितां पुण्याहून पांचशें स्वारांनिशीं लक्ष्मणराव काशी यांजला खास दस्तुर पत्रें लिहून दिल्हीं कीं, आपण लौकर यावें, आमचे संकटकाळीं सर्व प्रकारें उभयतां बंधूंनीं जागा धरून राहून प्राणाची आस्ता ठेविली नाहीं. त्यामुळें हे दिवस दृष्टीस पडले. तेव्हां आतां तुम्हांपरते आमचे आप्त कोण आहेत ? याजवरून लिहिलें आहे. तरी आपण जलद यावें म्हणजे सेनासाहेबांचीं वस्त्रें तुमचे लिहिण्याप्रमाणें देण्यांत येतील, व पुढील कारभार दौलतीचे तुमचे विचारें ठरतील. तुम्ही शुभ इच्छिलें आहांत, त्वरेनीं यावें. अशीं पत्रें लिहून याजवर मर्जी प्रसन्न होऊन बहुमान वस्त्रें गळ्यांतील कंठी मोत्यांची देऊन रवानगी केली, आणि बोलले की, सेनाधुरंधरास घेऊन यावें म्हणोन आज्ञा जाहली. याचे पूर्वीच मशारनिल्हेनीं बातमी सेनाधुरंधराकडे पाठविली की, पुण्यांत गारदी यांचा दंगा होऊन नारायणराव पेशवे मारले गेले. रघुनाथ बाजीराव ऊर्फ दादासाहेब यांची द्वाही फिरविली. अशी बातमी एकाएकीं अलजपुरास आली.

तशांत महिपतराव सुभेदार रुक्कनुद्दौला याचे येथें जात होते. तों वाटेंत बातमी आल्याची पत्रें पाहिलीं. बहुत संतोष जाहला. माघारे येऊन सेनाधुरंधरास वाचून दाखवावें, तो रुक्कनुद्दौलाकडले वकील समागमें आनंदराव नामें गृहस्थ होता. त्याजकरितां ती बातमी वाटेंतून मल्हारराव पागे याजबरोबर सेनाधुरंधरांकडे पाठविली. आणि आपण असे हर्षयुक्त होऊन रुक्कनुद्दौलाचे येथें येऊन बाहेरचे डेऱ्यांत बसले. हें वर्तमान त्याजला समजलें की, महिपतराव आले. नबाब रुक्कनुदौला खाना खात होते, तेथेंच यांजलाही बोलाविलें की, आपण येथेंच यावें. चिंता नाहीं. यांनी उत्तर पाठविलें की, आपण स्वस्थ भोजन करावें, आम्ही येथें नीट बसलों आहोंत. हा निरोप ऐकून नबाब रुक्कनुद्दौलांनी सांगून पाठविलें कीं, तुम्हांस आमची शपथ आहे. तुम्हीं येथेंच यावें. मग नबाब रुक्कनुद्दौला खाना खात होते तेथें गेले. जवळ बसविले, कांहीं एक गोष्टी झाल्यानंतर सुभेदारांनीं बोलण्यांत दर्शविलें कीं, "ईश्वरी माया विचित्र आहे. घटकेंत काय करितो हें कळत नाहीं. मनुष्यांनीं आपले ठिकाणीं अभिमानांत न राहावें, यांतच चांगलें आहे. हें ऐकून नबाबास चिंता जाहली कीं, याचा चेहरा हर्षयुक्त व भाषणें या रीतीचीं.

तस्मात् काय विघ्न आहे हें समजत नाहीं. हें चित्तांत आणोन फारच उद्विग्न जहाले. तसेंच जेवण आटोपून एकांतास दुसरे डेऱ्यांत बसले. तेथें आणिक-ही विचारिलें कीं, आपण असें उत्तर कां केलें ? तेव्हां सुभेदारांनीं चित्तांत विचार केला कीं, ही बातमी यांजला कळेलच. लपणार नाहीं. त्यापेक्षां आपण आधींच यांजला सांगावें. याजवरून बोलले कीं, पुण्यांत गारदी यांचा दंगा होऊन नारायणराव पेशवे मारले गेले. रघुनाथराव दादासाहेब पेशवे यांची द्वाही फिरली. ही बातमी मार्गात तुमचे वकिलादेखत आली. हें पाहून महाराजांकडे पाठविली. हें ऐकून रुक्कनुद्दौलाचे होण* निघोन गेले सचित झाले. तेव्हां सुभेदारांनीं कच्चें वर्तमान सांगितलें कीं, लक्ष्मणराव काशी व व्यंकटराव काशी तेथें वकिलीवर माधोराव नारायणराव बल्लाळ यांजकडे असतां त्यांचा पक्ष साबाजीबोवाकडे व मुधोजीबोवांस ठिकाण लागूं नये, वरते खंडेराव दरेकर वीस हजार फौजेनिशी पारपत्यास पाठविले व खांसी स्वारी आपली आम्हांकरतां अलजपुरास आले. हें सर्व झालें. सेनाधुरंधरास ठिकाणच नाहीं, तेव्हां सरकारची सूचना वकिलास होतीच. त्यांनीं दादासाहेबांची भेट घेऊन त्यांचीं खास दस्तुर शिक्क्याचीं पत्रें मुधोजीबोवा यांचे नांवाची आणिली जे, आमचें झाल्यास सर्व प्रकारें तुमचाच अभिमान आहे. अशीं दोन चार पत्रें आली. तेथें चौक्या पहारे असतां आंत प्रवेश करून लक्ष्मणराव काशी यांनी काढले, परंतु खबर होऊन पुनः राहिले. नंतर गारदी यांचा दंगा होऊन कार्य झालें. व्यंकटराव काशी व लक्ष्मणराव काशींनीं तेथील संधान ठेवून बंदोबस्त केला आणि दोन चार दिवसांनी तेही महाराजांस न्यावयास येतात असें पक्कें जाणावें. तेव्हां नबाब रुक्कनुद्दौला बोलला, हें खरें आहे. तुम्हीं त्यांचें अन्न ठेविलें तेव्हां तुमचेच आहेत त्यांशीं आम्ही सर्वस्व माधवराव बल्लाळ व नारायणराव बल्लाळ असे असतां त्याचे पक्षांतील असें असतां कठिणत्व फारच आहे. यास्तव आपण आमचा व रघुनाथराव तात्याचा स्नेह करून द्यावा. जसें सांगाल तसें ऐकूं. असे प्रकारें बोलले आणि चिंतातुर झाले. तों त्यांची बातमी आली. ती यांचे समक्षच वाचली. मग फारच चिंता रुक्कनुद्दौलास प्राप्त जाहली. आणि महिपतराव यास प्रेमयुक्त बोलले कीं, मी उदईक तुमचे घरास येतों. काय करणें तें करावें ?

* घाबरून गेला, जीव उडाला.

तुमचे सरकारचे वकील व्यंकटराव व लक्ष्मणराव काशी तेथें आहेत. व सखाराम हरी परभू तुमचे कारभारी स्वजातीचे त्यांचे हातून आमची स्वस्थता करून द्यावी. तेव्हां सुभेदारांनीं उत्तर केलें कीं, ते आमचे चुलत बंधु आहेत. तेव्हां रुक्कनुद्दौलानें उत्तर केलें की, तेथें ते आहेत तेव्हां आमची सफाई महाराज व तुम्ही करालच. यानें तरी महाराजाची दोस्ती याच प्रसंगाचे पूर्वी दहा बारा दिवस झाले, संपादिली. साबाजीबाबा व धवशा यांचें न ऐकिलें. तुमचे मर्जीनुरूप त्यास टाकिलें. धवशांनीही दुखणें काढून आजारी म्हणाले. आपले डेऱ्यांत आहेत. त्याजला या सल्ल्यांत घेणार नाहीत. त्याजला टाकून दरकूच आम्ही हैदराबादेस जाऊं व तुम्ही सांगाल तसें करण्यांत येईल. असें बहुत रीतीनें समाधान करून सेनासाहेब धुरंधरांसही बहुत प्रकारें निरोप सांगावें म्हणोन बिदा केलें. ते आपले ठिकाणास येऊन सेनाधुरंधर यांस त्याचें बोलणें निवेदन केलें. तेव्हां सेनाधुरंधर रागें भरले कीं, त्याचा अभिमान धरून फळ काय ? तो बेइमान आहे. खाविंद त्याचा नबाब सलाबतखान त्याजला यानी कैद करून आपण दौलत भोगतो, त्या सुभेदारांनीं विनंति केली की, मोठीं मनुष्यें आहेत. उदईक तेच आपले भेटीस येणार आहेत, याजला समाधानीचीं भाषणें करावीत, या प्रसंगी ते बहुत हवालदील आहेत. याप्रमाणें बोलणें होऊन दुसरे दिवशी रुक्कनुद्दौला थोडकेसे स्वारांनी महिपतराव सुभेदार यांचे डेऱ्यांत आले. भोंसल्यांचे दिवाणाचे घरी येण्याचा सिरस्ता नसता येणें झालें. तेव्हां हें वर्तमान सेनाधुरंधरास कळतांच अत्तरदान, पानदान, वगैरे पाठविलें तें घेऊन सरकारचे वाड्यांत स्वारी नबाब रुक्कनुद्दौलाची चालली. तों मध्यंतरी बाळकृष्णभट पटवर्धन याची पागा सरंजाम वगैरे बसावयाची चांदणी तेथें भटजी कोठें राहतात म्हणोन यांनी विचारिले. तों भटजी जवळच होते, त्यांस बोलले की, तुमचे म्हणण्यावरून सेनाधुरंधराचे भेटीस आलों. तुमचे मनोदय पूर्ण केले. याचाही उपकार जाणोन काय करणें असेल तें करावें. तसेंच सेनाधुरंधर यांचे डेऱ्यास आले. भेटी होऊन बोलणें झालें त्या अन्वयें सेनाधुरंधरांनीं उत्तर केलें कीं उदईक भाई इस्मायलखानाशी भेट घेऊन मेजवानी द्यावी. आणि सर्व कबूल केलें. दुसरे दिवशीं भाईचे भेटीस शहरास जाऊन वस्त्रें मेजवानी जवाहीर घेऊन भाईचा निरोप घेऊन निघाले. याचे दुसरे दिवशीं रुक्कनुद्दौला यांनीं सेनाधुरंधरास व

भाईस मेजवानी केली. वस्त्रें व जवाहीर देऊन निरोप दिला. आणि आपणही रजा घेतली. ते वेळेस बोलले कीं, रघुनाथराव दादा पेशवे हे आमचे सर्वस्वी मालक. आमचे तर्फेनीं आपण आहां. जशी सूचना होईल तशी वर्तणूक घडेल. आपले आहोंत. असें बोलून मग त्याच रात्रौ निघोन धवशे व साबाजी भोंसले यांस टाकून हैदराबादेस दरकूच रुक्कनुद्दौला गेले. तशांत पुण्याहून लक्ष्मणराव काशी यांनीं आज्ञा घेऊन स्वार झाले. ते अलजपुरास येऊन पोंहोचले. आद्यंत तपशिली वर्तमान सेनाधुरंधरसाहेबांस दादासाहेबाचें निवेदन केलें. दादासाहेबांनी आपलें पोहोचणें जलदी व्हावें याजकरितां डाक बसविली आहे तेव्हां आपण सडे डाकेवर चलावें. लष्कर व दर्याबाईसाहेब व रघोजीबोवा भोंसले चिमाबाईसाहेब सर्वत्र मंडळी वगैरे मागाहून येतील. आपले निघण्यास दिवसगत लागू नयेत. याजवरून सेनाधुरंधर निघोन गावेलगडास दर्याबाई वगैरे सर्वत्र मंडळी होती यांजपाशीं आले. महिपतराव सुभेदारही समागमें होते. बाळकृष्णभट पटवर्धन यांनीं सारें वर्तमान देवाजी पंताचे फंदाचें निवेदन केलें. यजमानास तें कळूनच होतें. रुक्कनुद्दौलाचे तहांत यांजला घेतलें नाहीं सबब देवाजी पंतही आपले जागी समजूनच होते. तेव्हां दर्याबाईसाहेब व आपासाहेब व चिमाबाईसाहेब, या सर्वत्रांचे विचारें भटजीनीं ठरविलें की, देवाजीपंतास कैद करावें. हे वर्तमान पंत मजकुरास समजल्यावरून पंत महिपतराव सुभेदार यांचे ठिकाणास नारो अनंत खासनीस किल्ल्यावर चिमाबाईसाहेबांजवळ राहात होते त्यांचे घरी, महिपतराव राहात होते तेथें आले. सायंकाळचे प्रदोषपूजेचा नेम सुभेदारास होता. हा पंत मजकुरासही विदितच होता. तेथें देवपूजेचा समय पाहून ब्राह्मण होत्साता* साष्टांग नमस्कार घातला. सुभेदारांनी नाना प्रकारें समजाविलें परंतु खात्री होईना. महिपतराव यांजला पूजेचा नेम टाकून उठतां नये असें संकट पाहून देवावर हात ठेविला कीं, तुम्हांस कैद करणार नाहीं. या सांभाची शफत असे. तुम्ही उठून बसावें. देवाजी पंतानें देवावर हात ठेविला तो पाहून खात्री जाहली. मग नारो अनंतांनीं उठवून बसविलें. देवाजीपंत बोलले कीं, मजला आणलें तसें नागपुरास पोहोंचवावे, सर्वस्वी मी तुमचा आहें,

* महिपतराव हा जातीनें प्रभु म्हणून ब्राह्मणानें पाया पडणें विपरीत असा भाव.

सुभेदाराची देवपूजा जाहली. सायंकाळचे फराळास नारो अनंत यांनीं केलें होतें; मग देवाजीपंत दादास सुभेदारांनीं आक्षेप करून उठविलें कीं, फराळ करावा. अन्न होय पाठ देऊं नये. मग संध्या करून सुभेदार व नारो अनंत, देवाजीपंत असे त्रिवर्ग मिळोन फराळ केला. लक्ष्मणराव काशी ही फराळास होते. तेथें सुभेदारांनीं अन्नावर हात ठेविला की, किल्ल्यावरून तुम्हांस आधीं उतरूं, मग आम्ही उतरूं. आपण कांहीं चिंता करूं नये. असें ऐकून देवाजी पंताची खात्री होऊन उत्तर केलें कीं, आतां चिंता कशाची ? तसेच दरवाजास सुभेदार गेले व सरकारास व दर्याबाईसाहेबांस विनंति केली कीं, देवाजीपंतास किल्ल्याखालीं उतरावें. त्यास कैद ठेविल्यास नफा काय ? हें ऐकून यजमान सेनाधुरंधर दर्याबाईसाहेबांनी फारच तांडावा केला. त्यांचें पारपत्य अवश्य करणें प्राप्त. बाळकृष्ण भटजी हे तेथेंच होते. तेही बोलले याचें कर्तृत्व तुजला माहीत नाही तुझे पायां पडला यांजवरून तूं बोलतोस परंतु या फंदांत तू पडू नको. आम्ही याच्या पायांत बिडचा टाकितों आणि पारिपत्य पुरतें करतों. तेव्हां सुभेदारांनीं उत्तर केलें कीं, तो येथें राहील तर आम्ही येथेंच राहूं, आम्हांस किल्ल्याखालीं उतरावयाचें नाहीं; आपणास त्याचें भय झालें तरी त्यांनी काय करणें आहे ? जवळच न राहिला तेव्हां काय करतो ? आणि आठ महिने आम्हांजवळ होता, तेव्हां त्यांनीं काय केलें ? स्वामी समर्थ या समयास काम सांगितलें आपले बरोबर साळसुदीनें वागतां तर आज हाच होता, याचे दैवीं नाहीं, हतभाग्य, याचीच नुकसानी जाहली. धनी कृपावंत होऊन ज्याचे मस्तकावर हात ठेवतील तोच मोठा आहे. आठ महिने काय केलें ? यास नागपुरास रवाना करावें. आक्षेप फार पाहिला. सुभेदारावर लोभ भारी, यास्तव कबूल. त्याजवर मग सारे किल्ल्याखालीं आले. देवाजीपंत यांस महिपतराव सुभेदार यांनी आपले बिऱ्हाडास आणून ठेविलें.

**मुधोजी दादासाहेबांस मिळतो**:—सन ११८१ चे सालीं स्वारी मुधोजी भोंसले यांची पुण्यास रघुनाथराव दादासाहेबांकडे चालले. तंव तिकडे त्रिंबकराव मामा यांनीं महिपतराव विश्वनाथ यांस घेऊन साबाजी बोवाचें बोलणें लाविलें कीं, दहा लक्ष रुपये घ्यावे, आणि वस्त्रें सेनासाहेबांचीं साबाजी भोंसले यांस द्यावीं. नगदी साहुकारी निशा देववितों. तेव्हां

व्यंकटराव काशीनीं विनंति केली:—" स्वामीचे जीवा प्राणाशीं गांठ. हैदराचे वकिलाची गति काय जहाली ? मुधोजीबोवा सर्वस्व स्वामीशीं लक्ष लावून असतां हें असेंच घडावें. आतां दहा लक्ष काय ? क्रोडों रुपये देतील. त्या प्रसंगीं याचें लक्ष कोठून होतें. यावर जसें ध्यानास येईल तसें करावें ! " मग हास्यवदन होऊन आज्ञा केली, " सर्वत्रांचा आक्षेप आहे, तेव्हां तुम्हीं कांहीं पुर्जा[१] लिहून द्यावा. " त्यावरून यांनी तीन लक्षांचा पुर्जा लिहून दिला. तो ठेवून आज्ञा केली की, तुम्हीं आपले यजमानास घेऊन यावें. ते स्वदस्तुर निशाणी लिहून देतील. असें झाल्यावर सखारामपंत बापू व हरीपंत तात्या फडके वगैरे पळाले होते, ते सखारामपंत आले, हरीपंतास धरून आणिलें, तशांत मोरोबा दादा फडणीस येऊन विनंति दादासाहेबांस केली की, हरीपंत निमकहराम आहे. परंतु स्वामीनीं संरंक्षण करावें असें नाही. सध्यां गारदी याची निशा हरीपंत करील. तीन लक्षांची आज्ञा नगदीची झाली, बरें आहे. त्यावरून मोरोपंत दादा यांनी अभिमान धरून सावकारी निशा आपले कडोन तीन लक्ष रुपये हरीपंताचे नांवें करून आणून दिले. गार्दी यास ते रुपये देऊन धरणें उठविले. सखाराम हरी परभू रात्रंदिवस दादासाहेबां-जवळ तेथेंच एकांतीं प्रेम संपादिला. त्याचे लोक आणिक बोलाविले, व कामकाज मुखत्यारी त्याला सांगितली. नंतर सुतक निवृत्ति[२] जहाली.

तों इकडून मुधोजी भोंसले गाविलगडाहून[३] तयारी करून साडेचार पांचशें स्वार घेऊन निघाले ते पुण्याचे मार्गे चालले. पाठीमागें दर्याबाईसाहेब व रघोजी भोंसले सेनासाहेब व बाळकृष्ण पटवर्धन आदि करून महिपतराव सुभेदार यांचे जिमेस फौज व कारभार केला. चिमापा चिटणीस, साबाजी बाबाकडून यशप्रद वर्तमान ऐकून आले होते, सबब सरकार सेनाधुरंधर साहेबांची मर्जी याजवर खप्पा होती. त्याची सफाई महिपतराव यांचे

१. पूर्जा—खत, रोखा.

२. नारायणरावाच्या वधाविषयीं जास्त हकीकत का. प्र. इ. सा. या पुस्तकांतील ' ग्रामण्याची हकीकत ' पृष्ठ ४–६ पहावीं म्हणजे मिळेल.

३. हा किल्ला वऱ्हाडांत सातपुड्यांत मेळघाटांत असून त्याचेजवळच चिखलदरा म्हणून वऱ्हाडांतील थंड हवेचें ठिकाण आहे.

विद्यमानें होऊन बरें गेलें. तसे दिनाजीपंत सुभेदार हेही होते त्यांजला फौजे समागमें ठेविलें. त्या प्रसंगीं लक्ष्मणराव काशी याजवर मुधोजीबोवांची मर्जी प्रसन्न होऊन मोत्यांची कंठी व बहुमान वगैरे देण्यास सिद्ध केली. लक्ष्मण राव यांनीं विनंति केली की, "अशी आम्हीं काय चाकरी केली कीं, कंठी व हें सर्व असावें ?" तेव्हां सेनाधुरंधर यांनीं आज्ञा केली कीं, "तुम्हीं केलें असें कोणींच केलें नाही, आजचे काळी सर्वस्व प्राणास उदार होऊन दादा-साहेबांस आपलेसे केलें, यापरतें काय आहे ?" यांनी विनंति केली "चाकर लोक होतों, धन्यांनी चाकरी सांगितली ती केली. तीर्थरूपाचा काल धन्याचे पायापाशी झाला हें ऐकून स्वामीनीं कृपावंत होऊन सर्वस्व चालविलें, त्याची उत्तीर्णता खावंद मायबाप आहेत." याजवरून यजमान कृपावंत होऊन सर्वस्व बहुमान वस्त्रें कंठी मोत्यांची व खासदस्तुरची चिठी लिहून दिली. त्यांतील मजकूर ऐसा जे:——

राजश्री लक्ष्मणराव काशी व व्यंकटराव काशी गोसावी यांस:——उपरि, आमची सेवा तुम्ही निष्ठेनें केली, याअर्थी वाढविलें. महत्त्व वंशपरंपरेनीं चालवूं यांत अंतर करूं तरी श्री * * ची शपथ असे असें जाणिजे. चंद्र २९ माहे मोहोरम बहुत काय लिहिणें.

याप्रमाणें लिहून दिलें. त्यांचें उभयतां जातीचें चालवावें सबब बंदो-बस्त करून दिला, आणि महिपतराव काशी धाकटे बंधु पुण्यांत होते त्याचे जातीचें चालावें यास्तव त्यांचे पागेचा बंदोबस्त असामीदार वगैरे करून दिला; आणि स्वार होऊन पुण्याचे मार्गे चालले. पाठीमागें उभयतां बाईसाहेब व रघोजी बोवा व बापूसाहेब व चिमणाबापू खंडीजी भोंसले व मन्याबापू व महिपतराव दिनकर कारभारी असे होते. व भाई इस्मालखानाची भेट मेजवानी होऊन निघाले. ते समयीं देवाजीपंत चोरघोडयास किल्ल्याहून पेशजी वचन देऊन घेऊन आले होते. यांजला महिपतराव सुभेदार यांनीं आपले जवळून हजार रुपये खर्चास व स्वार समागमें देऊन नागपुरास रवाना केलें. नंतर दरकूच पैठणाहून फौजेसुद्धां पुण्याचे आलीकडे पांच मजलीवर जाऊन पोंहोचले. याचे अगोदर सेनाधुरंधर दादासाहेबांजवळ पोंहोचून भेटी घेऊन संतोष जाहला. (असें) असतां हेही मंडळी पोंहोचली. भेटी

होऊन फारच आनंद जाहला. तेथें पेडगांवचे मुक्कामीं मुहुर्तानीं दादासाहेब चार घटका दिवस आल्यावर, रघोजी भोंसले यांजला सेनासाहेबांचीं वस्त्रें व जवाहीर शीरपेंच कंठी मोत्यांची तुरा व भुजबंद वगैरे दिले. सेनासाहेबांचीं दिवाणगिरीचीं वस्त्रें महिपतराव दिनकर यांजला, शिरपेंच कंठी सुद्धां दिलें. चिमणाजी रखमांगद यांजला चिटणविशीची वस्त्रें शिरपेंच शिरस्त्याप्रमाणें समारंभांनीं देऊन रवाना केलें. ते दिढा प्रहरा दिवसांत आपले लष्करांत आले. प्रथम दर्याबाईसाहेबांचे वाड्यांत जाऊन नजराणे केले. बाहेर येऊन दरबार करून सेनासाहेबांच्या नजरा केल्या. पेशव्याकडील मंडळी आली होती. सखाराम हरी, दादासाहेबांचे दिवाण झाले होते. या सुद्धां सर्वांस निरोप दिले. नंतर दादासाहेब यांनीं जो कारभार करणें तो नबाबावर मोहीम देणें इत्यादिक सेनाधुरंधर यांचे विचारें होत असावा. पंत प्रधान यांजकडील फौज अवग्र गोविंदराव गायकवाड सुद्धां समागमेंच होते. दरकूच बेदरचे सुमारें पंढरपुराकडून जावें असा निश्चय करून चालले. वाटेंतून नळदुर्गाचे मुक्कामी सखारामपंत पुरंधरे व नाना फडणवीस व मोरोबा फणडवीस यांनीं दादासाहेबांस विनंति करून पुण्यास जाण्याचा निरोप मागितला. सबब त्यांचा सरंजाम त्यांजकडेस बहाल ठेवून निरोप दिला. ते पुण्यास गेले. इकडे दादासाहेब पंतप्रधान व सेनाधुरंधर व रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा फौजेसहित मेहेकरदेमर येथें मुक्कामास आले. चंपाषष्ठी तेथें जाली. तेथून बेदरास जाऊन मोर्चे बसविले. पूर्वेकडून व दक्षिणेकडून मोर्चेबंदी करून लढाई झाली. नबाब बंदेगानअल्ली तेथें किल्ल्यांत होते, ते जेर होऊन भेटीचा विचार त्यांनीं केला. दादासाहेबांचे भेटीस बंदेगान अल्ली नबाब जातीनें आले. डेऱ्यांत येऊन भेटी झाल्या. नबाबांनीं डाली* सोडून पुढें ठेविली, व सिक्केकटचार[१] ठेऊन सफाईचें बोलणें बोलूं लागले जे, "तुमचे विचारास येईल तें करावें." याजवरून दादासाहेबांनीं नबाबाची ग्लानी पाहून रुक्कनुद्दौलास निराळें बसवून सल्ला नबाबाशीं केली की, "तुम्ही आम्ही एकत्र होऊन पुढें हैदर टिपू यांजवर कर्नाटक प्रांतीं मोहीम करावी." असा विचार करून मुलुख अथवा पैका घेणें असा बेत होता, तों नबाब जातीनें आले,

* पागोटें (राजमुगुट)

१. (आ) बखरींत नबाबानें कमलदान पाठविलें असें आहे.

व लाच्यारीचें बोलणें ऐकून दादासाहेबांनीं तो बेत रहित करून त्याजवर कृपा केली आणि पुढील मसलद टिपूवर करणें जरूर यास्तव मेजवानी होऊन कूच करावें असा सिद्धांत जाहला. याजवरून नबाबांनीं दादासाहेबांस मेजवानी करून वस्त्रें अलंकार वगैरे दिले. त्या बमोजिबप्रमाणें रघोजी भोंसले सेनासाहेब व मुधोजी भोंसले सेनाधुरंधर व सेनासाहेबांचे दिवाण महिपतराव दिनकर व ( गोविंदराव ) गायकवाड सेनाखासखेल यांजलाही वस्त्रें शिरपेंच मोत्यांच्या कंठ्या आदि करून बहुमान देऊन संतोषविलें. तशांत नबाबानें सेनाधुरंधर यांजला "साठचाळिशीचा" निश्चय वराडांतील पेशजीप्रमाणें चालावा असा करार करून दिला. सल्ला होऊन अवघ्र फौज दादासाहेब व सेनाधुरंधर सेनासाहेब नबाबांसुद्धां कूच करून दंडवती सुमारें आले.

**बारभाईचें कारस्थान**:—याचे अगोदर साबाजी भोंसले यांचे पारपत्यास त्रिंबकराव मामा यांस समागमें पंचवीस हजार फौज देऊन त्याजसमागमें हरीपंत नेमिले. याप्रमाणें दादासाहेबांनीं रवाना केलें. नबाबाकडील शहावरजंग फौजेसुद्धां व सेनासाहेब रघोजी भोंसले व दर्याबाईसाहेब वीस हजार फौजेनिशीं हेही मिळाले. साबाजीबोवावर चालले ते दहापांच*कोसांचे अंतरांनीं कलबुर्ग्यावरून कर्नाटकांत चालले. व मुधोजी भोंसले सेनाधुरंधर फौजेचे बखेड्याकरितां मध्यें कांहीं एक दिवस मुक्काम करून फौजेचा समेट केला, व पांच हजार फौज महिपतराव दिनकर यांजसमागमें देऊन, ऐसे दर्याबाई व रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा यांचे समागमें त्रिंबकराव मामा यांचे सामलातीस जाण्याकरितां दंडवतीवर येऊन सेनाधुरंधर कुटुंबासुद्धां दादासाहेबांवर जावें असा बेत करून समागमें कारभारी महादाजी बल्लाळ लष्करी फडणविशीचे कामावर व पांडुरंग सूर्याजी बक्षी वकिलीस, व दादासाहेबांकडेस जाण्यायेण्यास व्यंकटराव काशी व लक्ष्मणराव काशी व व्यंकटराव गोपाळ बक्षी व चिमाजी रुखमांगद चिटणवीस व गोविंद मुकुंद जामदारखाना याचे जिमेस, त्याचे हाताखालीं नारो शंकर फडणविसाकडील कारकून, याशिवाय फौज बरोबर घेऊन सेनाधुरंधर मागाहून कूच करून दादासाहेबांकडे गेले. त्याजला एक[1] मजल पोहोंचवावयाकरितां

१. ( आ ) बखरींत महिपतराव सातआठ कोस गेले असें आहे.

महिपतराव दिनकर[१] गेले. याजबरोबर पांच हजार फौज नेमिली होती. ती दंडवतीवर मुक्काम करून वाट पाहात होती. त्यांत बळवंतराव[२] महिपत व निंबाजी शिवदेव व राजेश्वर[३] दिनकर जमावासहित व मल्हारराव पागे सिल्लेखाना जवाहीर त्यांचे स्वाधीन, व रामाजी केशव व मल्हारपंत पाटण-कराचे दिवाण, व उमाजी विनायक आपले पतकासुद्धां हनमंतराव बाजी, घाटगे व गोंविदराव नाईक निंबाळकर व उमाजी राजे भोंसले व नाईक निंबाजी घाटगे व त्रिंबकराव रामचंद्र सरदार पेशव्यांकडील नवे ठेविले होते ते. असा जमाव दंडवतीचे मुक्कामी असतां, सखारामपंत पुरंधरे व नाना फडणवीस दादासाहेबांचा निरोप घेऊन, पेशजी पुण्यास गेले होते. त्यांनीं मसलत करून गंगाबाईसाहेब गरोदर होती तिजला पुरंदरास नेऊन ठेविली. आणि पुणें प्रांतीचा जागजागी बंदोबस्त केला, व त्रिंबकराव मामास पत्रें पाठविली की, तुम्ही, रुक्कनद्दौला आणि साबाजी भोंसले एकत्र होऊन दादा-साहेबांचें पारिपत्य करावें व रुक्कनद्दौलाचे हातें नबाबाशी बोलवावें. आमचे मसलतीस अनुकूल झाल्यास तुमचा मुलूख पेशजी पांसष्ट लक्षांचा व दौलताबाद किल्ला घेतला तो देण्यांत येईल, व फौजेचे खर्चास कुचाचे लाख रुपये व पन्नास हजार मुक्कामाचे, येणेंप्रमाणें देऊन, यांत साबाजी भोंसले वगैरे यांस साधन करून घेऊन, हें कृत्य करावें व आमचे मदतीस असावें. हा पैगाम करून रुक्कनद्दौलास त्रिंबकराव मामा यांजकडून पोंहोचतांच, पेशजी दादासाहेबांनी बेदरचे मुक्कामी बंदेगान अल्लीशी सल्ला केला, ते वेळेस, मसलतींत न घेतां, निराळे रुक्कनद्दौलास बसविलें होतें, सबब कुन्हा पोटांत ठेवून, या सल्यास त्यांनी नबाब बंदेगान अल्लीस अनुकूल केलें. याजकरितां नबाबांनी दादासाहेबांस भोलावा देऊन सात आठ मजलेचे अंतऱ्यांनी कूच मुक्काम करून चालले होते, व रुक्कनद्दौलांनीं तहवरजंगास इषारा करून दंडवतीवर फौज महिपतराव समागमें त्रिंबकराव यांजबरोबर रघोजी भोंसले सेनासाहेब दर्याबाईसाहेब होतीं यांजकडे जावयास राहिली होती ती

---

१. (आ) बखरींत महिपतराव सातआठ कोस गेले असें आहे.
२. महिपतराव दिनकराचा मुलगा.
३. महिपतराव दिनकराचा बंधु.

तहवरजंगांनीं फौजे समेत जाऊन छापा घालून लुटलीं. यावर महिपतराव दिनकर सेनाधुरंधरास, पोंहचवून माघारे आले, तों हें वर्तमान मार्गात समजलें, तसाच जमाव राहिला. तो समेटून दर्याबाईकडे आले. महिपतराव यांचे फौजेंत खर्चाची अडचण होती सबब आपले चिरंजीवांचे आंगावरील कंठी, तोडे, गोफ वगैरे मोडून लोकांस फौजेचे खर्चास दिले. हें वर्तमान दर्याबाईसाहेबांस समजल्यावरून, दिनाजीपंत सुभेदार यांज समागमें दहा हजार रुपये खर्चास पाठवून दिले. वस्ता मोडल्या हें दिनाजीपंतांनीं पाहून, दर्याबाईसाहेबांस हें वर्तमान समजलें. याजवरून मुलास पाहावयास बोलावून नेऊन वस्त्रें व दागिने, कडी, गोफ सोन्याचे दिले; आणि कूच करून मजल दरमजल त्रिबकराव मामाकडे चालले. तशांत रास्ते, दादासाहेबांचे फौजेंतून आपले पतकासुद्धां[१] पळून निघाले तेव्हां फितूरसा दिसला. हें महिपतराव यांनीं ऐकून अंदेशा केला कीं, अवग्र फंद जाहला. परंतु दादासाहेबांची कृपा सेनाधुरंधरांवर पूर्ण आणि नबाबास वांचविल्याचें कारण सेनाधुरंधर असें असून आमची फौज लुटली व फंदांत मिळाले. दुर्दशा करून आपले पुत्र बळवंतराव महिपत व गजोबा, व त्रिबकराव मोरेश्वर फार हैराण होते, याजकरितां मनाजीपंत फडणीस बरोबर देऊन चंद्रपुरास रवाना केले. आपले समागमें निंबाजी शिवदेव व उमाजी विनायक व मल्हारराव पागे, बापूजी धर्माजी व गोविंदराव मामा अशी मंडळी घेऊन फौजेसहित रघोजी बोवा सेनासाहेब सुभासहित त्रिबकराव मामांचे भेटीस दर्याबाईसाहेब गेल्या. भेटी होऊन माघाऱ्या आपल्या लष्करांत आल्या. तैशियांत साबाजी भोंसले व त्रिबकराव मामा एकत्र होऊन कूच करून गंगातीरास आले. तेव्हां फितूर उघडच दिसला. ते संधींत दादासाहेबांस हें वर्तमान समजल्यावरून त्यांनीं मसलत करून साबाजी भोंसले यांजला पत्र लिहिलें. कारण कीं, "उत्तर आल्यास बरें आहे, न आल्यास फंद खचित समजावा याजवरून लिहिलें की, "बत्तीस लक्षांचा[२] मुलूख, अशिरचा किल्ला तुमचे जातीस राहावयास. नूतन पद देण्यांत येईल. इकडे लक्ष ठेवून चाल धारणा

---

१. अधिकारांतलें सैन्य.

२. लेखांक ( ४ ) पहा. दादांनीं या समयीं हाच करार साबाजीशीं केला.

ठेवणें." याचें उत्तर आलें नाहीं, व नवाब वंदेगान अल्ली मार्गाहून दादा साहेबांकडे न जातां माघारे फिरले. तेव्हां फंद जाहीर झाला. सबब दादासाहेब कर्नाटकचा रोख टाकून माघारे फिरुन आले. त्या संधींत दर्याबाईसाहेब व रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा महिपतराव दिनकर फौजेनिशी बरोबर असे त्रिंबकराव मामा यांनी मेजवानी रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा यांस केली. वस्त्रें शिरपेंच कंठी मोत्यांची वगैरे दिली. जशी दादासाहेबांनीं दिवाणगिरीची वस्त्रें बहुमान दिली होती तशींच महिपतराव दिनकर यांजलाही दिलीं. व रामाजी केशव व दिनाजीपंत सुभेदार व मल्हारपंत पाटणकराचे दिवाण कारभारी केले होते, व गोंदाजी भाऊ लडी आदीकरून सर्वत्रांस वस्त्रें साडेतीन सनगाप्रमाणें दिलीं. बहुतां प्रकारें समाधान करून दाखविलें. परंतु महिपतराव सुभेदारांस चैन नाही. दादासाहेबांचे पक्षांतील. तेव्हां कसें घडेल ? हे साबाजी व नवाब एक झाले. आपण येथें राहावें परंतु दर्याबाई, त्रिंबकराव यांस मिळाली असतां समजलें नाहीं, कारण दर्याबाईसाहेबांशी व साबाजी भोंसले यांशी द्वेष भारी; याजकरितां त्रिंबकराव यांत दर्याबाई नाहीं; दर्याबाईचा लोभ महिपतराव यांजवर भारी दिसूं लागला. व रघोजी भोंसले व बाळाबाई ही आपलेच आहेत असें असतां, दर्याबाईनीं एक दिवस महिपतराव यांजला बोलावून बहुत प्रेम करून बोलले जे, "तुजला एक विचार पुसतें. हे सारे त्रिंबकराव–नवाब–साबाजीबोवा एक झाले. दादासाहेब मुधोजीबोवा येथें नाहींत. आपण यांतच मिळावें. बचाव होईल; पुढेंही बरें आहे. आम्ही मुधोजीबोवाचें डोचकें कापूं तर यांत तुम्ही अनुकूलच असावें." या प्रकारें अघटित भाषणें नाना प्रकारें बोलले. सुभेदारांनीं ऐकून उगेच राहिले. तेव्हां आणिक दर्याबाई साहेब बोलले जे, याचें उत्तर कांहीच दिलें नाहीं." सुभेदारांनीं रागानें उत्तर केलें कीं, "आम्ही असें बोलणें ऐकून जीवित ठेवूं नये. लहानाचे मोठे त्यांचें अन्न खाऊन झालों, तेव्हां आपण असें बोलणें आणि आम्हीं ऐकणें हें उभय पक्षीं उचित नाहीं." असें बोलून उठले. तंव बाईसाहेब बोलल्या कीं, "तुजला राग आला. तुझें चित्त पाहिलें कीं, आपासाहेबांकडे तुझें लक्ष कसें आहे." हें बोलून खात्री बहुतशी केली. याजवर हे घरास आले. सचिंत झाले. नंतर दुसरे दिवशीं दर्याबाईनीं बोलाविलें आणि म्हणाले कीं, त्रिंबकराव यांज-

कडे जाऊन कांहीं बोलावयाचें आहे तें बोलून आपली तयारी केली, आणि त्यास बोलले कीं, आम्ही पुढें जातों, तुम्ही जेऊन लवकर यावें. आपले कारभारी दिनाजीपंत व गोंदाजी भाऊ लडी व रामाजी केशवही त्यांचे मिळणींत; पानशांचे सोयरे, हे सारे एक, तेव्हां बाईसाहेब दिनाजीपंतास घेऊन पुढें गेले. आणि त्रिंबकराव यास बोलले की, महिपतराव सर्व प्रकारें दादासाहेब व मुधोजीबोवा यांचा पक्ष; सखाराम हरी, ते दादासाहेबांचे दिवाण, लक्ष्मणराव काशी व व्यंकटराव काशी हे त्यांचें सर्व मंडळ एक हे पंचवीस हजार फौज आमची त्यांचे स्वाधीन आहे, आमचें कांही चालत नाही असें नाना प्रकारें बोलले. तेव्हां यांस कैद करावे, कळू देऊं नये, आतां येईल, प्रेम दाखवून जें करणें तें करावें, आम्ही त्यास बोललों, तों आम्हांस त्याने उत्तर अमर्याद केलें याजकरितां त्याचें पारिपत्य करावें. " हे त्रिंबकराव यानी ऐकून उत्तम म्हणून बोलले. इतक्यांत मागाहून महिपतराव सुभेदारही गेले. त्रिंबकरावांनी तार्जीम देऊन मानसन्मान करून फौजेचे खर्चाचें वगैरे बोलणी करून बिदा केले. एकांती बोलले जे, "आपण उदईक एकटेंच यावें सध्यां बाई आहेत." याजवर हे घरास आले. याजला दुसऱ्या वेळी म्हणजे संध्याकाळीं बोलावून आणिले. सुभेदार गेले. त्रिंबकराव गोदावरीचे कांठीं मुक्काम होता, तेथें सायंकाळची संध्या करीत होते तों हे गेले. त्यांस बहुत प्रेमयुक्त भाषण केलें की, "तुम्ही खातरजमेनी असावें, तुमचे ठायीं आस्था फार आहे, सखाराम हरी तुमचे बंधु, तेव्हां सखाराम हरीवर आमचा लोभ विशेष, कर्नाटकांत त्यांनी कामकाज केले, त्याचे सरभाईत थोरले रावसाहेबांजवळ इतराजीत असतां त्याजवर रावसाहेब यांची कृपा झाली. कामाकाजांत वागणुकीत तेथें कायते जाणून त्यांनी हें साबाजीबोवांचे पारपत्याचें कार्य सांगितलें. येथें प्रसंग विलग झाला. नबाब व साबाजी भोंसले एक, व कांहीं मंडळी सखारामपंताचे आप्त पुण्याहून त्यांजकडे आले, तेव्हां चार दिवस त्यांजसारखेंच असावें, तुम्ही खातरजमेचीं जवामर्द माणसें, जवामर्द तुमची फौज, ती माझी आहे. चिंता नाहीं. उदईक तुम्हांस पन्नास हजार रुपये सध्यां देतों, आणि ही गंगासाक्ष आहे," गंगेवर हात ठेविला. मायावादी गोष्टी केल्या. सुभेदार यांचे विश्वासावर; दुसरे दिवशीं पन्नास हजार रुपये खर्चास पाठविले; आणिकही दोनचार दिवसांनीं देतों, चिंता नाहीं.

तो दिवस गुजरला. तिसरे दिवशीं प्रातःकाळींच बोलावूं पाठविलें, हे स्नान संध्या करून तिसरे दिवशी पालखीत बसून एक कोतवाल* घोडी, पांच खिजमतगार, दहा जामूदजोड्या, बरोबर घेऊन गेले. डेऱ्यांत बसविले. येतों म्हणून सांगून पाठविलें की, आपणांशीं कांही बोलावयाचें आहे; बोलावूं येऊन दुसरीकडे पालखी आणून त्यांत महिपतराव सुभेदार यांस घालून हजार लोक बरोबर व दोन खिजमतगार यांचे समागमें मात्र दिले; वरकड मनुष्यें तेथेंच कैद केली. चंदनवंदनचे सुमारें पाठविले. चंदनचे[१] किल्ल्यावर त्यांजला कैद केलें; आपण त्रिंबकराव दरकूच पंढरपुरास गेले. इकडे, दर्याबाईसाहेबांस आनंद झाला. दिनाजीपंत सुभेदार, व गोंदा भाऊ लडी, रामाजी केशव, मल्हारपंत हे कारभारी. त्यांत मुख्य दिनाजीपंत असे चालले. महिपतराव सुभेदाराचे चुलते उमाजी विनायक व निंबाजी शिवदेव हजार दीड हजार लोकांनिशी मल्हारराव पागे असे होते. तंव त्रिंबकराव पंढरपुरास गेले. समागमें दर्याबाई, रघोजीबोवा, साबाजीबोवा व नवाब निजाम अल्लीखान रुक्कनद्दौला सारे इकडून गेले व तिकडून दादासाहेब भवानराव[२] प्रतिनिधि, मुधोजीबोवा, सखाराम हरी, महमद इसफ या जमेतीनें येऊन त्रिंबकराव यांची लढाई कांमेगांवावर झाली. सारी फौज टिकून, त्रिंबकराव एकलेच आपले फौजेनिशी साह्य तेथें आले. जखमा आंगावर, त्रिंबकराव यांस लागल्या. धरले गेले. दादासाहेबांजवळ पाडाव करून आणिले, आणखी आनंदीबाईसाहेबांनीं बटकी हाती शेणाचे दिव्यांनीं ओंवाळिलें, यश घेऊन साबाजी भोंसल्याचे आले यशस्वी झाले. फौज फितूर सारी. दुसरे दिवशीं भवानराव प्रतिनिधीस, रुक्कनद्दौला यांणी निरोप पाठविला कीं, "दादासाहेबांजवळ तुम्ही मुक्काम करून राहणें ठीक नाहीं, कूच करून इकडेस यावें, त्रिंबकराव पाडाव होऊन गेले तेव्हां त्या फौजेंत कोणी सरदार नाहीं, आम्ही तुमचे आहोंत, साबाजी भोंसले व दर्याबाई ही आपलीच आहेत, महिपतराव

---

* रिकामी.

१. महिपतरावास कैदेंत ठेवण्याचें काम दर्याबाईच्या मसलतीवरून त्रिंबकराव मामांनीं केलें.

२. (आ) बखरीत दादासाहेबांनीं भवानराव प्रतिनिधीच्या सांगण्यावरून त्रिंबकरावाशी लढाई केली असें आहे.

याजला कैद केले, या योगांनी मुधोजी भोंसले यांशीं व दर्याबाईसाहेब याशीं विरुद्धच आलें आहे, त्यास आपण यावें." यावरून भवानराव प्रतिनिधि दादासाहेबांजवळून कूच करून रुक्कनद्दौलाकडेस आले. दादासाहेब हवालदील (झाले) त्रिंबकराव यांणी दादासाहेबांस याद[१] दाखविली की, सारे फंदांत (आहेत) यांची नांवें एक मधोजी भोंसले व सखाराम हरी व महमद ईसब हे मात्र नाहींत, वरकड सारे अंबारीचे माहुता सुद्धां त्याच मिळणींत आहेत; हें पाहून दादासाहेब फारच उदास झाले. त्रिंबकराव[२] मेले. त्यांजला दहन करून तसेंच कूच करून बऱ्हाणपूरचे मार्गे दादासाहेब निघाले. ते वेळेस सेनाधुरंधर यांणीं व्यंकटराव कासी यांस, आतून फौज फुटफाट झाली; ते वेळेस सखारामपंत पुरंधरे याजकडे मुधोजी बोवानीं पाठविलें, ते प्रसंगीं दादासाहेबांस विनंति केली जे, "मुले माणसें, कोंथळ्यांत आहेत त्यांस काहाडावयास जातों." त्याणी आज्ञा केली. ते समयीं सखारामपंताकडे पुरंधरास जाऊन बोलले की, "मुधोजीबोवा भोंसले यांचें लक्ष आपलेकडे आहे. महिपतराव सुभेदार यांचे कारभारी यांचेही लक्ष आपणांकडे पहिलेपासून, त्यास उगेच, त्रिंबकराव मामांनी तेथील दर्याबाईजवळ कारभारी यांचे म्हणण्यावर हे कैद केले. त्यास आपले जवळ आणवावें, म्हणजे सेनाधुरंधर आपलेच जाणावे. याचे स्वाधीन आहेत, हे स्वामीचे लक्षांतच आहे." हें ऐकून सखारामपंतांनी चंदनचे किल्ल्यापासून महिपतराव यास आपले जवळ आणविले बोलणी[३] प्रेमाची झालीं. बहुमान वस्त्रें वगैरे दिली. यांणी[४] विनंति केली की, "जेजोरीचें देवदर्शन घेतों. मुधोजीबोवा दादासाहेबांपासून निघाले जाणावे; पहिले चंद्रपुराहून आपलेच भरंवशावर निघणें झालें. त्याची पक्कायत झाली." जेजोरीस जाण्याचा निरोप दिला. सिरपेंच, कंठी वगैरे दिली. देवदर्शन घेऊन लवकरच येऊन मुधोजीबोवांस श्रीमंतांपासून

---

१. (आ) बखरींत "वारीदारासुद्धां फितुरीची याद दाखविली" असें आहे.

२. फसली ११८३ साली चैत्रमासी मामांचा काळ झाला.

३. महिपतराव, नाना आणि बापू यांची भेट पुरंधरास होऊन प्रेमाचीं भाषणें झालीं.

४. महिपतरावानें.

काढावें, हें करणें तुम्हांकडेस आहे. सर्व कबूल केलें. बाबाजीबोवा चिटणीस होते. तेथें जामीन देऊन पुरंदरचे किल्ल्याखालीं आले. तेथून जेजोरीस महिपतराव आले. मनसुबा केला जे, आपले स्थळास जावें. तेथील पाटील कदम म्हणोन होता. त्याजपाशीं घोडीं विकत घेऊन आपण व महिपतराव कासी मिळून निघाले. ते तुळजापूरचे मार्गानें निघाले. इतक्यांत इकडेस भवानराव प्रतिनिधीस त्रिंबकराव याचे फौजेंतील मालकी द्यावी, हा बेत साबाजी भोंसले आदि करून यांणी ठरविला. वस्त्रें द्यावी इतक्यांत समारंभाचे वेळेस, साबाजीबोवांचे फौजेंत हत्ती मही[१] सुटला. गलबलींत भवानराव यांचें पागोटें पडले, म्हणून ते दिवशीं मसलत राहून दुसरे दिवशीं आणिक समारंभ केला. तों भवानी शिवराम बोलले जे, "याजविशी अपशकून झाला हे ठीक नाही. आपणास महत्कार्य करणें आहे, त्यास हरीपंत फडके येथें फौजेंत आहेत व पुण्यास सखारामपंत व नाना फडणवीस आहेत. तेव्हां त्यांचें लक्ष हरीपंतांकडे आहे, त्याजला उभें करावें. मातबर माणसें रावसाहेबांचे[२] कृपेंतील." आक्षेप बहुतच भवानी शिवरामाचा. त्या प्रसंगी साबाजीबोवा बोलले की, "आम्हास खर्चास पैका कोण देतो, नबाबाची फौज मदतीस आली आहे, त्याजला मदत खर्च दिल्याशिवाय कसें होईल?", तेव्हा हरीपंत बोलले की, "त्रिंबकराव मामा मेले तरी काय चिंता आहे? श्रीमंतांचे पदरी त्या सारखे फौजा वागविणारे बहुतेक आहेत." त्याजवरून धैर्य होऊन सखारामपंताचे व नाना फडणविसाचे संधानावरून हरीपंत यांजला फौजेची मालकी देऊन, साबाजीबोवांनीं रुक्कनद्दौलास लिहून पाठविलें की, "आज कूच करून सामलातीस बोलावून दादासाहेबांवर चालले." मग हरीपंतांनी पत्र सखारामपंतांस पाठविलें की, "महिपतराव दिनकर सुभेदार याजला आपलेजवळ आणून सोडावयाचा विचार करून आपले जवळ आणिले, हें ठीक नाहीं. पुनः त्यास जेथें होते तेथें ठेवावें. त्यांस सोडल्यास मुधोजी भोंसल्यांची नड कायमच आहे. महिपतराव कैदेंत आहे याजकरितां सेनाधूरंधर दम खाऊन आहेत." असाच आक्षेप[३] साबाजीबोवांचा व दर्याबाईचा

---

१. हें हत्तीचें नांव. २. माधवराव बल्लाळ पंतप्रधान.

३. हरिपंताप्रमाणेंच साबाजीचें व दर्याबाईचें महिपतराव दिनकराविषयीं म्हणणें होतें.

व पंतमजकुरांचा भाऊपणा, याचें कारण पंतमजकुराचा व मुजुमदाराचे सोयरे यायोगानें फडके दर्याबाईचे बंधु, यांचे मार्फतीनें पेशजी साबाजीबोवास, सेनासाहेब सुभा याची वस्त्रें आणिलीं होतीं. तेव्हां दर्याबाई हरीपंताचे येथें जाऊन बोलल्या की, "महिपतराव यांजकडेही लिहिलें. अनर्थ झाला." तसेंच रुक्कनद्दौलाचें म्हणणे पडलें कीं, "सोडू नये." अशीं पत्रें तिघांचीं आलीं. हरीपंताचे पत्रासहित पुरंदरास पोंहचली. तीं वाचून पाहिलीं. त्याचेपूर्वी महिपतराव यांस जेजोरीस जाण्याची आज्ञा झाली होती. ते तुळजापूरचे मार्गानें निघाले व व्यंकटराव कासी याणी आपलीं मुलेंलेंकरें कोथळचाहून काहडिली आणि आपण पुरंदरास गेले. सखारामपंत व नाना फडणवीस यांणी हें पत्र येतांच दोन हजार फौज तयार करून महिपतराव सुभेदार यांस धरून आणावयाकरितां पाठविली. लाग लावीत त्यांचे मागें गेले. तंव महिपतराव दिनकर व महिपतराव कासी एके गांवीं दुकानांत मुक्कामास उतरले होते. स्वार हजार बाराशें पाहिले. स्वारांनीं महिपतराव कासीस विचारिलें की, "इकडून भोंसल्यांचा दिवाण गेला कीं काय?" त्याणें उत्तर केलें की, "आम्हास वाकव नाहीं, परंतु दोनशें स्वार आतांच इकडून गेले, अशांत जाल तर सांपडतील." याजवरून ते स्वार तसेच निघाले. नंतर यांणी कूच करून तुळजापूरचे मार्गानीं बालेघाट, परळी, आष्टी, देऊळघाट प्रगण्याचें गांव मालगणी आहे तेथें मल्हारराव परभू महिपतराव याचे साडू होते त्यांणी त्यांजला मेजवानी करून एक घोडी मातबर, बसावयास दिली. बहुमान वस्त्रें देऊन पंचवीस स्वार बरोबर दिले. तेथें कळलें की, सेनाधुरंधर अलजपुरास[१] आहेत; तेव्हां उभयतां महिपतराव येऊन पोहोचले. भेटी झाल्या. तसेंच भाई इस्मायलखान यांस कळलें की, महिपतराव उभयतां आलेत. त्यांच्या भेटी झाल्या. हें ऐकून न बोलावितां आपणच त्यांचे मकानास आले. तंव सेनाधुरंधर यांणीं मनसुबा केला जे, सखारामपंत आपले स्नेही, त्यांचे भेटीस पुरंदरास आपण जावें, सुभेदारांनीं व महिपतराव कासींनी विनंति केली कीं, "आम्हीं तेथूनच आलों. सारे विचार पाहिले. जाणें ठीक नाहीं. कारण साबाजीबोवांनीं त्यांची सारी

---

१. एलिचपूर.

मसलत उभी केली, तेव्हां मल्हारपंत साबाजीबोवा रुक्कनद्दौला व दर्याबाई-साहेब सर्वत्र एक आहेत. सखारामपंत त्यांचे स्वाधीन हें सर्व आम्ही पाहून आलों. स्वामीचे पुण्यप्रतापांनीं निघणें झालें. सारा विचार झाला, तों मागें धांवणें आलें होतें हें सविस्तर निवेदन केलें." भाईनें ऐकून बोलले जे, "सुभेदारांचें म्हणणें खरें आहे, आपण जाणें सल्ला नाही." तेथून महिपतराव कासीची रवानगी सखाराम पंत यांजकडे ( सेनाधुरंधरांनीं ) पुरंदरास केली. त्यांचा भाव–गर्भ[1] समजण्यास्तव केली. हें जाऊन तेथेंच पोहचले तों पूर्वी व्यंकटराव कासी तेथें होते. त्याजला महिपतराव दिनकर पळून गेल्यामुळें सखारामपंतांनी कैद केलें. याजवरून महिपतराव कासी पंत मशारनिल्हेशी बोलले की, "आपणास इमान दिलें. त्या अन्वयें मुधोजी भोंसले यांजला दादासाहेबांपासून निराळें करून अलजपुरास आणिलें. आणि त्याच उद्देशें आम्ही जाऊन कार्य आपलें केलें, आतां अभिमानी आपण आहेत. मुधोजी भोंसले याचें लक्ष आपल्याकडेस आहे." त्याच अन्वयें पत्रें सेनाधुरंधर यांची सखारामपंतास गेली. इकडे मुधोजी भोंसले यांजला खर्चाची अडचण सबब अलजपुराहून उमरावतीस आले. तेथील लोकांचे दंड करून आणिले. आणिकही प्रगण्याच्या खडण्या घेऊन रोजमुरा लोकांस वांटला. नंतर महिपतराव सुभेदार याचे चिरंजीवाचे लग्नाकरितां चंद्रपुरास जाण्यास निरोप दिला; व मुधोजी भोंसले यांजपाशीं कारभारी महादाजी लष्करी व चिमणाजी रखमांगद चिटणवीस व येसाजी पानतावणें असे राहून व्यंकटराव गोपाळ यांजला गंगथडीचा सुभा सांगून फौज नवीन आणावी या निमित्य गंगथडीस रवाना केले. मुधोजी भोंसले अलजपुरी राहिले. रघोजी भोंसले आणि दर्याबाई आणि हरीपंत फडके, रुक्कनद्दौला असे दादासाहेबांचे मागें लागले होते ते बऱ्हाणपुराहून निघोन थोडकेसे जमावानिशी सुरतेकडे गेले. साबाजीबोवा व हरीपंत त्यांचे मागेंच होते. त्यांतून साबाजीबोवांनीं हरीपंतांचें आंत्र[2] घेतलें कीं, दर्याबाईसाहेबांजवळ फौज सेनाधुरंधर यांची आहे, ती उधळून दिली असतां, मुलाची जात रघोजी भोंसले यांचा बंदोबस्त करणें अवघड नाहीं, हें समजाविलें. त्यावरून पंत मशारनिल्हेचा रुकार

१. अंतर्गत हेतु.
२. अंतस्थ [ मत ].

पडला. यावरून रुक्कनद्दौलास आघाडीस सल्ला करून बऱ्हाणपूरचे मुक्कामीं दर्याबाईस लुटलें. ते समयी रघोजी भोंसले यासमागमें निम्बाजी शिवदेव व उमाजी विनायक व मल्हारराव पागे व रणसिग नाईक यांनी बोलणें वगैरे असे समीप असतां जातीनें रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा याणी जवामर्दी केली. बाळाबाईसाहेबांचे हत्तीवरील माहुत गोळीनें मारला. तो हत्ती शत्रूनी वळवून चालविला असतां शत्रूचा पराभव करून हत्ती माघारां फिरविला. अशी जवामर्दी जाहली. नंतर रघोजीबोवा व दर्याबाई तापीनदींत उभे राहिले. तेथें हरीपंत फडके जाऊन दर्याबाईचें बहुत समाधान करून आपले लष्करांत रघोजीबोवासुद्धां आणिले. ते समयीं निवाजी शिवदेव व उमाजी विनायक व मल्हारराव पागे व दिनाजीपंत सुभेदार असे लाखनवाड्याचे* वाटेनें निघाले. अलजपुरास सेनाधुरंधर याजवळ जाऊन पोंहोचले. रणसिंग नाईक निंबाळकर हे आपले जमेतीसुद्धां सांभाळून निघाले. ते आपले मुलुखाकडे गेले. हरीपंतांनी कांही एक दिवस दर्याबाईस ठेवून रघोजी भोंसले सेनासाहेब यांसहित साबाजी भोंसले यांचे स्वाधीन सन ११८३ चे साली केलें. ते वरसातीचे हंगामांत साबाजी भोंसले नागपुरास रघोजीबोवा दर्याबाईस घेऊन आले. इकडे महिपतराव सुभेदार चिरंजीवाचे लग्न करून अलजपुरास जावें, तंव साबाजीबोवा यांणीं मार्गांत भवानी काळू कारंजावर दहा हजार फौजेनी ठेविले होते व विठ्ठलपंत सुभेदार उमरावती, भांब वगैरे जिल्ह्यांत होते. आपळाजी नारायण व देवाजी नारायण, सटवाजी भोंसले असे चंद्रपूरचे आसपास महिपतराव यांस धरावें, याप्रमाणें साबाजीबोवांनीं केले होते.

**मुधोजीवर हल्ला**:—तों इकडे मुधोजी भोसले सेनाधुरंधर अलजपुरास मसलत पुसण्यासाठीं आले होते. यांजला खर्चाची अडचण पडली. राजगड, भोपाळ इकडील पठाण मुधोजी बोवाजवळ चाकर होते, यांनीं खर्चास मागितलें तें न मिळालें; त्याजवरून राजगडकर पठाणांशीं बोलाबोली जाहली. तों पठाणांनीं अदावत धरून सेनाधुरंधर भाई इस्मायलखान यांचे येथें शहरांत गेले, तेथें जाऊन माघारे येतांना गांवकुसाचे दरवाजाजवळ एकाएकी येऊन पडले. स्वारी पालखीत होती. ते समयीं जगदेवराव

---

* लाखनवाड्याचा घाट वऱ्हाडांत दक्षिणेस आहे. यांत कांहीं चूक दिसते. ( सं. )

गुजर व देवाजी डोंगरदेव व चिमाप्पा चिटणीस समागमें होते. ते पठाणांवर आले. त्यांशीं लढाई जहाली. जगदेवराव गुजर कामास[१] आले. व मुधोजीबोवांस जखमा आल्या. हातावर एक जखम. तसेंच मुधोजीबोवा व पठाणाशी कुस्ती जाहली. पेशकबज हातांनीं धरलें त्यामुळें आंगठा तुटला. परंतु सोडलें नाही. अशी कुस्ती पठाणांशी व मुधोजीबोवांशी होत असतां, ते वेळेस देवाजी डोंगरदेव यांनीं जवामर्दी करून पठाणाचे डोळ्यांवर हूल चालवून सेनाधुरंधरांस वांचविलें. पठाणास मारिलें.[२] तेव्हां हुल जाहली. याजवरून इस्मायलखान येऊन मुधोजीबोवांस घेऊन आपले स्थळास गेले. जखमेस[३] टाके दिल्हे. करामत बहुतच केली. लष्करांत गडबड जाहली की शहरवाल्यांनी दंगा केला. याजवरून भाईनी लष्करांत सांगून पाठविलें की, महाराज खुशाल आहेत. लष्करवाल्यानीच दंगा केला. सबब शोध लष्करांत घेतला तों खरेंच. मग त्या पठाणांतील कांहीं पडले व एक पठाण नवाब नामें त्या जमेयतीजवळ उतरला होता, त्याजवरून त्याचें डोकें मारलें. पुढें कांही एक दिवसांनी जखमा बऱ्या झाल्या.

हें वर्तमान चंद्रपुरी महिपतराव सुभेदार यांस समजलें की, सेनाधुरंधरांस जखमा आल्या. हे ऐकून सुभेदार मशारनिल्हे ते क्षणी तयारी करून थोडकेसे

---

१. मरण पावले. यासंबंधानें ( ई ) बखरीत लेख आहे तो:—"जगदेवराव गुजर गुजाबादादाचे चुलते यांणीं तलवार खैंचून रोहिल्यांवर धांवले. तो रोहिल्यानी याजला मारून घेतलें. मुधोजी भोंसले पळून तेल्याचे घाणोडीत गेले. तों दोघे रोहिले मागें लागून गेले. तों एका रोहिल्यानें राजाशी कुस्ती करून पटकून गळा सुऱ्यानें कापू लागला. तों राजे याही हाताने सुरा धरला असतां, बोटें कापलीत व सहावें बोट होते तें कापून गेले. गळा कापावा इतकियात एक भंगिरा शहराचा भांग घोंटीत होता तो सोटा घेऊन धावून रोहिल्याचे मस्तकांत मारला. तो रोहिला एकाच सोट्यानें पार पडला. दुसरा रोहिला एका रजपुतानें शहरच्या मारला. राजेसाहेब जखमी होऊन वांचले."

२. चिमाजी रखमांगद यांचा खिजमतगार शहाजी पवार यानें मारलें. असें ( आ ) बखरींत आहे.

३. लाल महंमद आणि रहेमान यांच्या हातीं जखमा बांधून चांगले केलें. या समयीं मन्याबापू आणि चिमणाबापू मुधोजीबरोबर होते. ( इ. )

जमाव व घरपागेनीं समागमें राजेश्वर दिनकर यासुद्धां निघाले. तों भोंवताले चंद्रपूरचे आसपास साबाजीबोवाचा बंदोबस्त. यांत जें होईल तें होवो. परंतु सेनाधुरंधराची भेट घ्यावी, हा निश्चय करून मुहूर्त न पाहतां निघाले. पांढरकवडा, एदलाबाद भांबेवरून अलजपुरास गेले. सेनाधुरंधर साहेबांस भेटले. जखमा सैन्यासही आल्या होत्या त्याही बऱ्या जाहल्या.

दादासाहेब यांजकडून महमद इसफ गारदी पांचचार हजार जमियेतीनिशीं अलजपुरास आले. सारे एकत्र झाले. नंतर दसरा करून कार्तिकांत सेनाधुरंधर नागपुराकडे निघाले. समागमें आपाजी भगवंत व निंबाजी शिवदेव व राजोबा व मल्हारराव पागे व येसाजी उमाजी शिलेखानेवाले व बापूजी धर्माजी व पांडुरंग सूर्याजी व गोविंदराव व महिपतराव सुभेदाराचे मातुल आनंदराव दिघे व त्रिंबकराव विठ्ठल व सदाशिव माणकेश्वर व माणिकराव अशी मंडळी सुभेदारांकडील आपापले जमावासहित व चिमाण्पा चिटणवीस व कृष्णराव[१] माधव व नरसिंगराव चिमणाजी[२] असे होते. व ब्राह्मण मंडळी ही पैकी महादाजी लष्करी व येसोबा पानतावणे व देवाजी डोंगरदेव यांसमवेत सेनाधुरंधर फौजेनिशी अलजपुराहून निघाले. तेव्हां इस्मायलखान भाईकडेस महिपतराव सुभेदारास पाठविलें कीं, आमचे मदतीस यावें. तेव्हां त्यांनी पर्याय लावून आले नाही. तेथून सुभेदार परतून आल्यावर चालले ते मजल दरमजल काटवलाजवळ आले. तेथून चिमणा बापूसाहेब याजबरोबर महिपतराव सुभेदार यांची पागा वगैरे जमावासुद्धां देऊन विठ्ठलपंत सुभेदार साबाजीबोवांकडील यांजवर पाठविले. ते मुकाविल्यास पोंचून चिमणा बापूसाहेबांस अलीकडे चारशें लोकांनिशी मागें कोसाभरावर येऊन आठशें स्वारांनिशी त्याजवर महिपतराव पुढें गेले. सटवाजी भोंसले व विठ्ठलपंत सुभेदार सात आठ हजार जमावानिशीं तिकडून चालून येऊन लढाई जाहली. महिपतराव यांस यश आलें. शंभर पाऊणशें घोडे पाडाव करून आणले. नंतर चिमणा बापूसाहेब महिपतरावासहित आप्पासाहेबांस येऊन भेटले. तेथून गिरड व पवनारचे सुमारें आप्पासाहेब आले.

---

१. कृष्णराव माधव हा चिमाजीचा पुतण्या. चिमाजी व माधव हे रुकमांगदाचे पुत्र.

२. चिमाजी रुकमांगद चिटणीस.

इकडे चंद्रपुराहून नारो रघुनाथ सुभेदार यांणीं मनाजीपंत फडणवीस व उमाजीपंत आबा याजवळ दारूगोळी सरंजाम व हजार पांचशें पायदळ देऊन बिदन केलें. ते लष्करांत आपासाहेबांजवळ पोहचले. त्याजवर सुभेदार यांनी विनंति केली की, चंद्रपुरास जाऊन तेथें हणमंत जोशी चांगला आहे. त्याचे मुहूर्तानें लढाईस निघावें. तेव्हां सरकारचे मर्जीस येऊन स्वारी चंद्रपुरास गेली. पांचचार दिवस राहून हणमंत जोशी याचे मुहूर्ताने निघोन मजल दर-मजल गिरड व नागपूरचे सुमारें आले. सेनाधुरंधर यांजकडील सरदार महमद इसफ गारदी पांच हजार स्वार पायदळसुद्धां, गुणाजी माने स्वार तीनशें, यशवंतराव नायक निबाळकर दोनशें स्वार, व सूरतसिंग हजारी बाराशें स्वारांनीं, खंडोजी आढाव पांचशें स्वार, व रुपाजी आठोले व सखोजी गांवढे, रामजी गांवढे तीनशें स्वार, व भवानजी घाडगे झुझारराव यांची पागा दोनशें व उमाजी विनायक हजार स्वार व राजेश्वर दिनकर तीनशें स्वार, व चिमाजी बाबाजी तीनशें स्वार व काशीराव लक्ष्मण यांचे चुलत बंधु व निंबाजी शिवदेव हजार स्वार, सरकार पागा, मल्हारराव पागे चारशें, गोविंदराव पागे त्यांचे तैनातीस येसोबा पानतावणे व बापूजी धर्माजी व आप्पाजी भगवंत चिटणवीस व गोविंदराव कृष्णराव माधव खडुलकर पंचवीस स्वार व अवांतर फुटकळ मानकरी पांच सातशें; विश्वनाथ शंकर व पांडुरंग सूर्याजी बक्षी व रामराव आनंद व चिमाजी रुकमांगद चिटणवीस व कृष्णराव माधव व नरसिंगराव चिमणाजी व गोपाळराव चिमणाजी व आप्पाजी चिमणाजी असें परभू मंडळ व ब्राह्मण मंडळीपैकी महादाजीपंत लष्करी व मनाजीपंत फडणवीस व उमाजी माधव व येसोबा उमाजीचे पुत्र, व नारो शंकर निसबत गोविंदराव जामदार व दिनाजीपंत सुभेदार असे जमावांनीं, व रामचंद्र दादो इस्मायलखानाकडील जानोजीबोवांचे वेळेपासून वकिलीचे कामावर होते, व त्यांचे बंधु गोविंद दादो झामसिंगाकडून वकिलीस होते, हेही जवामर्द माणसें जाणून समागमें होते. जमाव सारा एकत्र करून सेनाधुरंधर यांनीं स्नान गंगाजळी करून नित्य नेम सारून मरण संकल्प चित्तांत आणोन कान्हासुदर हत्ती दादासाहेबांनीं दिला होता त्या हत्तीवर हौद्यांत बसले. खवासी रवळोजी पाठोले मातबर मनुष्य बसविला, व चिमणा बापू ( खंडोजी भोंसले ) यांसमागमें सोयरे मंडळी, कुसाजी गुजर पन्नास स्वार व महादाजी गुजर पन्नास स्वार व मानाजी मोहिते

पंचवीस स्वार, व नाईकजी अहीरराव पन्नास स्वार, व जानराव गुजर ही मंडळी हौद्यापुढें. महिपतराव दिनकर सुभेदार यांचे जवळ मानसिग वाघ वगैरे परभू मंडळी आपलाले जमावांनी व त्याजपुढें महमद इसफ व खास हौद्याचे पाठीमागें कांही लोक चंद्रपूरचे पायदळ, त्यांजमध्यें मनाजीपंत व उमाजीपंत व महादाजी लष्करी, नारो शंकर, दिनाजीपंत सुभेदार व रामचंद्र[1] दादो व गोविंद दादो असे नक्षानीं चालले. पांचगांवाचे[2] मैदानांत आले.

इकडून साबाजीबोवा आपले जमावानिशी समागमें सरदार मजीदखान रोहिले स्वार पांचशें व त्याचे पुत्र महमद अमीनखान चारशें स्वार, व जागोजी यादव पांचशें स्वार व लक्ष्मणराव पाटणकर दोन हजार स्वार, व नरोजी जाचक दोन हजार स्वार, व सटवाजी भोंसले दोन हजार स्वार, व हणमंतराव बाजी घाटगे शंभर स्वार, व चिमाजी बाजी घाटगे दोनशें स्वार व विठ्ठल, बल्लाळ सुभेदार पांच हजार फौज, व संभाजी शिरके हजार स्वार, व मानसिंग मोहिते चारशें स्वार, गोविंदराव त्रिबक व सिदोजी गुजर व मुत्सद्दी शिवाय तोफखाना व पायदळ दोन हजार व जानराव यशवंत पागे, सरकारचे मुत्सद्दी मंडळीपैकीं नवीन कारभारी भवानी शिवराम दिवाण, भवानी काळो बक्षी त्यांचे पुतणे पांडुरंग गणेश व बळवंतराव भवानी, देवाजी नारायण व आपळाजी नारायण चार हजार फौज, व महाडीक दोनशें स्वार व बक्षीकडील सखाराम अवधूत व अवांतरही फुटकळ मानकरी घाडगे, पाटणकर, नाईक, निंबाळकर, यादव वगैरे पतकें दोन हजार.

**पांचगांवची लढाई** इ. स. १७७५:—याप्रमाणें फौजेचा जमाव करून, साबाजीबोवा जंगी[3] हौद्यांत बसले, व रघोजीबोवांस अंबारीत बसवून

---

१. "रामचंद्र दादो व गोविंद दादो उभयतां बंधु मुधोजी भोंसल्याचे हत्तीसमोर उभे होते. आपले सरकारचे खैरखवाहा जाणून सरफराज केले. गोविदपंतांस गाविलगडचे किल्ल्याची वकिली दिली आणि तेव्हांपासून रामचंद्रपंतास आपले जवळ ठेविलें." असें ( ई ) बखरींत आहे.

२. हा गांव नागपूरच्या दक्षिणेस ३ कोसांवर आहे. येथें इ. स. १७७५ चे जानेवारींत २७ व्या तारखेस लढाई झाली. ( उ ) बखरींत पुढील लेख आहे:—"नागपूरचे आग्नीय कोणीं पांच कोस मौजे सालई व मौजे पांचगांवचे मध्यें युद्धप्रसंगास उभे" राहिले.

३. लढाईच्या.

समागमें ठेवून त्यांचेमागें खवासखान्यांत घाडगे[1] यांस बसवावें हा नेम करून घाडगे मशारनिल्हेस ताकीद केली कीं, "तुम्ही यांचे मागें बसून आम्हांस कांहीं झालें असतां यांजला मारून टाकावें." हा बेत जाहला. हें ऐकून बापू साहेबांनीं हत्तीवर बसविते वेळेस कृष्णाजी नलवडे यांचा हात धरून आपण हौद्यांत बसले व पाठीमागें नलवडे मजकुरांस बसविलें. तेव्हां घाडगे मशारनिल्हे तसेच राहिले. दुसरे अंबारींत नाना[2] जोशी व नाना करांडे रघोजी करांडयाचे दिवाण यांजवर लोभ साबाजीबोवाचा विशेष असे, तयारींनीं मुकावल्यास येऊन गोळे सुरू केले. सिदोजी गुजर मध्यस्थीस सेनाधुरंधरांकडे पाठविले. ते सेनाधुरंधरांचे व्याही, साबाजीबोवाकडून आले कीं, आपसांत लढाई कशास पाहिजे ? बापूसाहेब आज अथवा उदईक मालकच आहेत. असे प्रकारें बोलले. यश आम्हांस द्यावें. अशीं भाषणें होतात यांजमुळें सेनाधुरंधरांकडील फौज थवकली. इतक्यांत साबाजीबोवांकडील गोळे सुरू होतच होते. त्या गोळ्यांनीं दलपत बेनिगीर गोसावी मातबर माणूस, जहामर्द माणूस, एकांड्यांतील तो उडाला. निंबाजी शिवदेव याच्या अबदागिऱ्या ओढून घोडीं जखमी जाहलीं. याजमुळें महिपतराव याजला विषाद येऊन महमद इसफ गारदी याजला आपलेजवळ बोलावून बोलले कीं, "माणसें गोळ्यांनीं जायां होतात. या प्रसंगी कसूर करणें आतां ठीक नाहीं." हें ऐकून रोषांनीं घोडीवरून इसफ मजकुरांनी उडी टाकून पायउतारा होऊन जमाव समागमें घेऊन पुढें चालून गेले, आणि सेनाधुरंधरांकडेस महिपतरावांनीं जाऊन विनंति केली जे:—"आपण उभयतां बंधूच आहांत, आम्हांसारख्यांनीं गोळ्यांनीं उडावें आणि आपण तमाशा पाहावा हें काय ? याजकरितां पूर्वीच विनंति करीत होतों कीं, ही गोष्ट घडणार नाहीं." तेव्हां सरकार आज्ञा जाहली की, "आतां लढाईचें तोंड लागलें, याजवर काय पाहावयाचें आहे ? सिदोजी गुजर बोलावयास आले, यास्तव उभे राहून बोलणें प्राप्त; त्यांतूनही शें पन्नास लोक जायां जखमी झाले. आतां व्याहीपणा हें कार्य झाल्यावर पाहण्यास येईल." याप्रमाणें बोलून समागमें लोक देऊन आपले फौजे पलीकडेस गुजर

१. लक्ष्मणराव घाडगे, लक्ष्मणराव पाटणकर आणि तुकोजी नलवडे खवासखान्यांत होते, असें ( ई ) बखरींत आहे.

२. बारामतीकर.

मशारनिल्हेस पोंहोचवून दिल्हें. पुढें तोफांचा व बाणांचा मार साबाजीबुवा कडील चालला. लष्कर सेनाधुरंधरांकडील जाया जखमी फार झालें. साबाजी बोवाकडील लोक लुटीस लागले. इकडील बहुतेक लोक कामास आले व थोडासा जमाव राहिला.

**साबाजीचा मृत्यु**:—हें पाहून, साबाजीबोवा जातीनें हौदा सुकसेन हत्तीवर होता त्यांत बसून आघाडीस चालले. दोन चार अंबाऱ्या बरोबर होत्या असे सेनाधुरंधर याजवर चालून प्रथम सांग[1] चालविली. तें सेनाधुरंधर यांचे हत्तीवरील माहूत नूरमहंमद फौजदार यांनी गजबागानी[2] सांग टाळिली. मग तीर चालविला. तो मुधोजीबोवा सेनाधुरंधर यांचे हातास लागला. मग सेनाधुरंधरांनी बंदूक जोडगोळ्या घालवून चालविली. तों गोळी साबाजीबोवाचे मस्तकास लागली. तसेंच खेलोजी पाटील यांनीं सेनाधुरंधराचे खवाशीतून बंदूक चालविली. ती गोळी साबाजीबोवाचे कानसुळाजवळ[3] लागली. ते समयी साबाजी भोंसले सन ११८४ चे सालीं पौषमासी वद्य दशमीस ठार झाले. तेव्हां नाना जोशी अंबारीत होते. त्याजला सेनाधुरंधरांनी गोळी मारली, तोही ठार झाला. नाना करांडे चिटणिशीचें लिहिणें साबाजीबोवाजवळ लिहीत होते, म्हणोन कृष्णराव माधव चिटणवीस यांणी महिपतराव सुभेदार यांजला शपथ घातली की, "आमचा शत्रु याजला तुम्ही मारावें." याप्रमाणें बहुत निकटीनें बोलले. तें महिपतराव यांनीं ऐकून भाल्यांनी नाना करांडे याजला मारिलें. नंतर साबाजीबोवांकडील निशाणी नौबत होती, त्या नौबतवाल्यास आज्ञा केली कीं, "फत्तेचें सैदोन वाजवावें." त्याजवरून सैदोन वाजूं लागलें. तेव्हां लोकांस भ्रम जाहला की, साबाजीबोवांची फत्ते होऊन मुधोजीबोवांस धरलें. याजवरून लोक सारे मुजऱ्यास येऊं लागले. तों मुधोजीबोवांस फत्ते पाहून निघोन जावें असें होऊं लागलें. तशांत भवानी शिवराम यांनी दुरूनच पाहून पळाले. तसें भवानी काळो आपले जमेतीनिशीं समागमें ज्येष्ठ पुत्र

१. ( भाल्यासारखें ) टोंचण्याचें शस्त्र.

२. हत्तीला टोंचण्याचा गज ( अंकुश ).

३. जोड गोळी उजव्या डोळ्यास लागली असें ( उ ) बखरींत आहे. धाकटे रामराजे यांचें चरित्र पान ४३ पाहा.

बळवंतराव नामें होते ते, व आपण आले. सारांश मान मुधोजी बोवांचा पाहिला. तेथें रामचंद्र दादो व गोविंद दादो पुढें घोड्यावर स्वार होऊन उभे राहिले होते, त्यांनीं भवानी काळू यांशीं बोलले कीं, "आतां आपण यावें. आप्पासाहेबांची फत्ते जाहली, चिता नाहीं. आम्ही आहोंत." असें ऐकून भवानीपंत फिरले. ते पळून जाऊं लागले. ते वेळेस रामचंद्र दादोंनीं महिपतराव सुभेदार यांस सांगितले की, "दिवाण भवानी शिवराम गेले व बक्षी भवानी काळो हेही चालले हें ठीक नाहीं, कठिण दिसतें." असें सुभेदारांनीं ऐकून आपले जमेतीनिशीं जाऊन मेळविले. तों शिरसोजी[1] नामें आठोळे सुभेदाराजवळ होता, त्यांजला बोलले की, "पाहातां काय ? तुमचा बाप चालला." याजवरून त्यांनीं घोडा चालवून भवानी काळूस मेळवून वार टाकला तों जखम नाकावर लागली. रामचंद्र दादो हेही पोंचले. त्यांनी जखम हातावर मारली. जखमेनें जेर होऊन घोड्यावरून खाली आले. त्या वेळेस पांडुरंग गणेश पळोन सिवनी छपाऱ्यास गेले. महिपतराव व रामचंद्र दादो यांनीं समीप येऊन रामचंद्र दादो यांनी शालजोडी, भवानी[2] काळोचे अंगावर टाकली. मारों नका म्हणून ताकीद करून वांचविले. झोळी करून सरकारासमक्ष पुढें आणिले; सरकारांनी रोष करून सदाशिव माणकेश्वर याचे स्वाधीन केले.

मग महिपतराव सुभेदार बोलले कीं, साबाजीबोवांची अंबारी राहणें

---

१. "सटवाजी भोंसल्यास इषारा भवानी काळूचें नाक कापण्याचा केला." असें ( उ ) बखरींत आहे.

२. साबाजी रणांत पडल्यावर भवानी काळू यानें सैन्य गोळा करून लढाई चालविली तों गोविंद दादो आणि रामचंद्र दादो यांनीं उपदेशाच्या गोष्टी सांगून प्रतिबंध केला. परंतु भवानी काळूने तिकडे लक्ष पुरविलें नाहीं. तेव्हां त्या दोघां बंधूंनीं तरवार चालविली. "जखमा बहुत लागल्या. शिधोजी भापकर याच्या हातचे जखमेनें डोळा वगैरे जायां झाला. दंडावर व अंगावर २१ जखमा आल्या. घोडीही ते वेळेस वरती आली. तेव्हां खेतांत राहिले. हें वर्तमान मुधोजी भोंसले यांजला समजतांच आपण जातीनें येऊन यांजला उचलून जखमा शेकल्या. भवानी काळूची जखम कोणीं औरंगाबादचा कुंभार होता, त्यानें चांगली केली." बखर ( इ )

ठीक नाहीं. याजवरून हौद्याचे खांब तोडून पाडले. तें पाहून साबाजी बोवाची फौज पळूं लागली. मुक्काम तेथेंच जाहला. रात्रीं जखमी लोक पहाण्यास निघाले. सुरतसिंग हजारी व राजेश्वर दिनकर ठार झाले. निंबाजी शिवदेव व उमाजी विनायक जखमी; आणिकही फौजेपैकीं ठार झाले; व जखमी होऊन दुसरे दिवशीं साबाजीबोवाची फौज कांहीं पळाली, आणि थोडी बहुत राहिली. त्या लोकांस भय उत्पन्न होऊन तेही जाऊं लागले. त्याजवरून चिमणाबापूसाहेब ओलीस दिले. स्वारी नागपुरास आली. दर्याबाई-साहेबही आल्या. साबाजीबोवाच्या दोघी स्त्रिया सती गेल्या. जवातुबाई राख ही सती पडली. दहन झाल्यावर त्यांचा विधि जहाला.

दिवाकरपंत, भवानीपंत मुनशी व बाळाजी काळीकर व देवाजी व आपळाजी नारायण आणिकही कितीक सेनासाहेबांचे द्वेषी असतां त्याजविषयीं सुभेदारांनीं पुढें दौलतींत फंद न व्हावें सबब सफाई करून जुनीं मनुष्यें यांजला पेशजीप्रमाणें ज्याचे त्याजकडे ठेवून बंदोबस्त केला, व बाबूराव वैद्य पंतप्रधाना-कडून वकिलीस पेशजी साबाजीबोवा जवळ होते. त्यांचा प्रकार तसा झाल्यावर इकडेस आले. तेव्हां सेनाधुरंधर यांनीं महिपतराव दिनकर यांचे विचारें म्हटलें कीं, "व्यंकटराव[१] यांजला कैदेंत तुमचे यजमानांनीं ठेविलें आहे; त्यांजला पुढें किती दिवस ठेवावयाचें आहे?" असें बोलल्यावरून त्यांनीं आपले यजमानास पुण्यास लिहून पाठविलें. याजवरून पंतप्रधान यांनीं सेनाधुरंधराचे स्नेहाची वृद्धि असावी सबब सोडून त्यांजला नागपुरास रवाना करून दिलें.

**उमरावतीकर भोंसल्याचें बंड**, इ. स. १७७५:—इकडेस भवानी शिवराम पळून गेले होते, त्यांनीं शिवाजी[२] भोंसले उमरावतीकर यांस मिळणींत घेऊन बंड उभें करून नबाब निजाम अल्लीखान याजकडेस जाऊन रुक्कनुद्दौला दिवाण, नबाबाची व भवानी शिवराम याची दोस्ती, तेव्हां दिवाणाची भेट घेऊन बोलावयाचें तें बोलून त्याजला पल्ल्यावर आणिलें. याजवरून नबाब बंदेगान अल्ली व रुक्कनुद्दौला यानीं नागपुरावर चाल धरली. तें सेना-धुरंधरास समजतांच नबाबाकडेस कोणी शहाणा मनुष्य पाठवन सफाई करून पुढें दोस्ती चालवावी यास्तव कोण पाठवावे याचा विचार पाहिला. तो भवानीपंत मुनशीस पाठविलें असतां, पूर्वींपासून दर्याबाईसाहेबांचे प्रेमांतील

१. काशीराव लक्ष्मण प्रभु याचा वडील पुत्र. २. वंशावळ पहा.

तेव्हां यांजपासून चांगलेपणा निघणें दुरापास्त. हा संशय आणन गारदी महंमद इसफ याजला पाठवावें. परंतु दादासाहेबांचे पक्षांतील त्यास, व रुक्कनुद्दौलासी वांकडेंही आहे. तेव्हां हेंही ठीक नाहीं. याजवरून महिपतराव सुभेदारांनीं विनंति केली कीं, "दिवाकरपंतास पाठवावें." तेव्हां आज्ञा जहाली कीं, "अलजपूरचे मुक्कामीं याजला रुक्कनुद्दौलाकडेस बाळकृष्ण पटवर्धन या समागमें देऊन पाठविलें असतां, यांणीं तेथें फंद केला." तेव्हां सुभेदारांनीं विनंति केली जे, "देवाजीपंताचा व इस्माईलखानभाईचा द्वेष होता याजमुळें त्या प्रसंगीं तसें झालें. आतां दर्याबाईसाहेबांसीं व भवानी शिवराम यांसीं दिवाकरपंताचे विरुद्ध आहे, तेव्हां आपला उपयोग तेंच घडेल." असे रीतीनें सेनाधुरंधर साहेबांसीं बोलून संशय दिवाकरपंतांविषयींचा होता, त्याचें निराकरण करून, रवानगी करण्याचा निश्चय करून नबाबाकडे बिदा केले. आणि मागाहून आपण फौजेसहित कूच करून वराडांत गेले. दिवाकरपंत नबाबाचे फौजेंत पोंचल्याचे पूर्वीं बक्षिबेगम व रुक्कनुद्दौला यांचा आपसांत खिस्सा होऊन फंदांत मीर मुसाखान व रुक्कनुद्दौला मारले गेले. नंतर तेथें दिवाकरपंत पोंहचले. इभ्राहिमबेग जफीरुद्दवला धवशाचे विद्यमानें दिवाकरपंतांनीं संधान करून नबाबाची भेट घेऊन, सफाईचीं बोलणीं जहालीं.

इतक्यांत मुधोजी भोंसले सेनाधुरंधर व रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा व महिपतराव दिनकर व महंमद इसफ मंडळीसहित मुनशी चिटणीस सुद्धां नबाबाचे फौजेजवळ पोंहचले. पंतमजकुरानें आप्पासाहेबांच्या व नबाबाच्या भेटीचा पैगाम करून परस्पर भेटी होऊन निकाल करविला. ते समयीं नबाबाचा व याचा तह[१] नबाबाचे मनोदयानुरूपच करविला. एदलाबाद व कायरबोरी हे धवशाचे चिरंजीवाचे नांवांनीं करून दिले. स्वार चाकरीस ठेविले त्यांचे जिम्मे त्यांनीं दिल्हे. आमनेर व दारव्हे हे नबाबाकडेस देण्याचें

---

१. "परस्परें मेजवानी व जवाहिरात देणें घेणें झालें. आपासाहेबांनीं बापूसाहेबांस नबाबाचे पायांवर घालून विनंति केली कीं, हें राज्य तुमचें दिलेलें आहे. आम्ही तुमचे चाकरींत कसूर करणार नाहीं. वऱ्हाडचे मुलुखाचे हिफाजत ठेऊं. वऱ्हाडचे जहागिरदारांसही इजा देणार नाहीं. पहाडपटीचे गोंड लोक आपले हुकुमांत ठेवूं." असा लेख ( उ ) बखरींत आहे.

करून नबाबाची मर्जी दिवाकरपंतांनी आपणावर संतोषित करून घेतली. आणि अंतरंगी नबाबास सुचविलें कीं, राघोबादादा पेशवे याजपाशीं सखाराम हरी दिवाण आहेत त्यांचे बंधु बाबूराव हरी हे महिपतराव याचे चुलत बंधु, सांप्रत दोन हजार फौजेनिशी आप्पासाहेबांजवळ आले, व महंमद इसफही त्याचे पक्षांतील व लक्ष्मणराव काशी दादासाहेबांजवळ वागणुकीत कारभार करून आहेत. त्यांचे ज्येष्ठ बंधु व्यंकटराव काशी हेही त्या पक्षांतील. तेव्हां सारा समाज दादासाहेबांचा सेनाधुरंधरांजवळ आहे. व पुण्यांत सखारामपंत व नाना फडणवीस माधवराव पंतप्रधान यांजपाशी हे प्रमुख, याजकरितां महिपतराव दिनकर यांस कळू न देतां आपण एकांती आप्पासाहेबांस सुचवावें की, महिपतराव यांचा व तुमचा ऋणानुबंध आहे, परंतु राज्यकारणी विचार दौलतीचे कामास समय पाहून चालणें प्राप्त, हें समजून बेदरावर आम्ही राघोबादादाच्या वेळेस रुक्कनुद्दौलाना आमच्या कामांत असतां त्याचे मर्जीस्तव वेळ घेतली. तसे तुम्हीही, महिपतराव यांजला टाकून हुपारीने असावें. असा शकटभेद केला. यास्तव नबाब बंदेगान अल्ली जातीनें आप्पासाहेबांचे येथें येऊन स्नेहभावाचीं बोलणी जहाली, व सुकशेन[१] हत्ती नबावानें मागितला तो आप्पासाहेबांनी सरंजामासुद्धां दिला. ते समयीं आप्पासाहेबास नबाबांनीं एकांतीं घेऊन दिवाकरपंताचे सुचविल्याप्रमाणें वळवून निखालसता जाहली. ते काळी रघोजी भोसले सेनासाहेब सुभा यांजला डाली नबाब बंदेगान अल्ली यांचे हातांनी बांधून समारंभ केला. नंतर परस्परें निरोपाची वस्त्रें शिरस्ते-प्रमाणें बहुमानादि करून दिल्ही. तसेंच महिपतराव यांजला दिवाणगिरीची वस्त्रें बहुमान शिरपेच कंटी देऊन निरोप दिल्हा.

याजवर तेथून निघावें तों जफिरुद्दवलाचे मनांत इस्मायलखानाविषयी[२] द्वेष. कारण पेशजी धवसे साबाजीबोवांस मिळाले होते. तेव्हां भाई इस्मायलखान सेनाधुरंधरास मिळाले. सबब धवसे यांजला वैषम्य वाटून खान मजकुरासी मजीना उभा राहिला आणि लढाई नमूद होऊन इस्मायलखान मारले गेले. ते प्रसंगी रामचंद्र दादो यांजला जखमा लागल्या. हें वर्तमान सेनाधुरंधर यांनीं ऐकून इस्मायलखान भाईचा स्नेह स्मरोन जफिरुद्दौला धवशे याचे हातें नबाबाशीं बोलणें करून आपले विद्यमानें बहिलोलखां व सलाबतखां

---

१. याच हत्तीवर साबाजी पांचगांवच्या लढाईत बसला होता. २. एलिचपुरकर

यांचा बंदोबस्त जहागिरी बाळापूर वगैरे करून देऊन, नबाब कूच करून गेले. तेव्हां दिवाकरपंत दोन मजला नबावासमागमें गेले होते. ते माघारे आले.

तशांत दिवाकरपंतांनी बाबूराव वैद्य यांजला माधवराव पंतप्रधान यांजकडेस पाठवून सेनासाहेब सुभा यांचीं वस्त्रें[१] बापूसाहेबांचें नांवें आणविलीं.

नबाबाचे सुचविल्यावरून महिपतराव सुभेदार याजवर दिवसेंदिवस अनास्ता होत चालली. तों सेनाधुरंधर सर्वत्र मंडळीसुद्धां नागपुरास येतांना वाटेंत एक दिवस महिपतराव दिनकर यांजकडून आठोले सरदार तैनात होते, त्यांचे पुतणेची घोडी साबाजीबोवाचे लढाईत ठार झाली, सबब त्याजला कोतवाल घोडीवर अथवा हत्तीवर बसावयाची सर परवानगी होती. तों एके दिवशीं एक लुसकान[२] घोडी त्या गृहस्थास बसावयास पाठविली. हें पाहून महिपतराव यास व यजमान साहेब यांस जिद्द होऊन, तीच अदावत पोटांत ठेवून सेनाधुरंधरांनी महिपतराव यांजवर इतराजी केली. आणि गाविलगडावर कैदेंत ठेविलें.

नंतर आपासाहेब नागपुरास आले. मागाहून चिमाबाईसाहेब वगैरे मंडळी गाविलगडांत होती. यांजला बापूसाहेबांचे लग्नाकरितां नागपुरास बोलाविलें. तेव्हां बाईसाहेब यांणीं महिपतराव यांजला समागमें घेऊन नागपुरास आले. महिपतराव यांजला बुऱ्हाणशा राजे याचे किल्ल्यांत ठेविलें होतें व बाईसाहेब येऊन सर्वत्रांच्या भेटी झाल्या. तेव्हांपासून कारभार दिवाकरपंत करूं लागले. बाजद बरसात समारंभांनी लग्न[३] झालें. नंतर एका वर्षानें सन ११८६ फसली सालीं रवानगी सेनासाहेबांची पुण्यास केली.

सन ११८४ चे साली सवाई माधवराव जन्मले होते. कारभारी सखाराम बापू व नाना फडणवीस करून पंतप्रधानांचा राज्यकारभार चालविला. याजकरितां रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा याजसमागमें दिवाकर

---

१. लेखांक (७) पहा.

२. वाईट, रोडकी.

३. मोहित्यांची कन्या गजराबाई हिशीं लग्न झालें. लेखांक (३) पहा. व त्यांतील टीप १ पहा. भोंसल्याचे घराण्यांत सोन्याच्या सांखळ्या पायांत ही वेळपर्यंत घालीत नसत त्या ह्या लग्नापासून घालण्याची सुरुवात झाली. याबद्दल छत्रपतींची परवानगी पेशव्यांनीं मिळवून दिली.

पंत कारभारी व महादाजी लष्करी व कुशाबा* असे देऊन पुण्यास[१] पाठविले. सवाई माधवराव यांची भेट जाहली. मागें इकडेस मुधोजी भोंसले सेनाधुरंधर मुलखाची पाहणी[२] करावी याजकरितां शिवणी छपारें इकडेस फौजे सुद्धां निघाले. छपाऱ्याचे मुक्कामांत गेले. तों मंडलेवाल्याकडील उपद्रव इकडील प्रांतास लागला. याजवरून मंडल्याकडेस फौजा पाठवाव्या हा निश्चय केला. त्यांत सरदार मातबर भरंवशाचा योजून पाठविला पाहिजे, याजवरून महिपतराव दिनकर यांजला नागपुराहून बोलवून कृपावंत होऊन साहेबीं खासा जरिपटका व साहेबनौबत देऊन दहा हजार फौज महंमद अमीरखान व नऱ्होजी जाचक व लक्ष्मणराव पाटणकर वगैरे बरोबर देऊन रवाना केले. ते फौजसुद्धां जाऊन बरगी प्रांतांत उपद्रव केला आणि प्रांताची तसनस[३] केली. हें वर्तमान दामाजीपंत टाळकुटे यांणीं पुण्यास दिवाकरपंतास लिहून पाठविलें. याजवरून दिवाकरपंतांनीं सेनाधुरंधरांस लिहिलें कीं, मंडले प्रांत पंतप्रधानाचा, तेथें उपद्रव करूं नये. बहुत प्रकारें जबरीनें लिहिलें. तों यापूर्वीच महिपतराव यांणी मंडले प्रांतीं उपद्रव केल्यामुळें साडेतीन लक्ष रुपये सालिना देणें ठरविलें. इतक्यांत दिवाकरपंताच्या लिहिल्यावरून फौजेसहित महिपतराव याजला माघारे बोलाविले. ते फौजेसहित छपारेचे मुक्कामीं येऊन पोंहोचले. तेव्हां सेनाधुरंधर जातींनी देवगड पहावयाकरितां गेले आणि फौजेसहित जरीपटका व साहेबनौबद सुभेदार यांजसमागमें देऊन नागपुरास पाठविलें. ते नागपुरास येऊन पोंहोचले. तों सेनाधुरंधरही देवगडाहून नागपुरास आले. पुण्याहून रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा यांणीं नाना फडणवीस यांची सफाई करून आले. मंडल्याचे[४] सनदेविषयींही

---

* कृष्णराव माधव चिटणवीस.

१. पुरंधरास पाठविलें असें ( आ ) बखरींत आहे.

२. मुधोजी "आपण जातीनें गोंडवण प्रांत पाहून मुलुखाची सेर करावी या उद्योगानें नागपुराहून बाहेर निघून पवनी भानारे यांजवरून लांजीस जाऊन तिकडून शिवनीछपारे येथें आले." बखर ( आ ).

३. नासाडी.

४. शके १७१० मध्यें रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा पुण्यास आले. त्यांस मेजवानी बहुमान परस्परें होऊन .....गढेमंडळ येथील सनदा घेतल्या. --धाकटे शाहूराजे यांचें चरित्र पृ. ५२ पहा.

नानांशीं उद्घाटन केलें. परंतु मर्जीस न आलें. तेव्हां निखालसता करून सन ११८७ चे सालीं येऊन पोंहचले. दिवाकरपंत व महादाजी लष्करी, कुशाबा चिटणवीस या सर्वत्रांसहित सेनाधुरंधरसाहेब सुभा व सेनासाहेब दिवाकरपंत वगैरे यांच्या भेटी नागपुरीं जाहल्या.

ते काळीं महिपतराव यांजवर लोभ सेनाधुरंधरांचा पाहून तो कुन्हा[१] पोटांत दिवाकरपंत यांणीं आणून इतराजी करविली.

**तळेगांवची लढाई**:—यापूर्वी रघुनाथपंत दादासाहेब पेशवे सुरतेकडे गेले होते त्यांणीं तिकडून पलटणी इंग्रेज बहादूर याच्या घेऊन तळेगांवावर[२] आले. तेव्हां पुण्यांत सखारामपंत व नाना फडणवीस पंतप्रधानांचे कारभारी होते. यांणी महादजी शिंदे याजला लिहून पाठवून रघुनाथराव दादासाहेबांचे पारपत्यास पाठविलें, व आणिक कांहीं फौजा पाठविल्या. तेव्हां त्या पलटणीसीं लढाई होऊन जहामर्दी पलटणींनी चांगली केली. परंतु त्या लढाईत साहेब[3] बहादूर कामास आले. याजमुळें पलटणीचा माघारे जाण्याचा विचार ठरला.

हें पाहून दादासाहेबांनीं विचार केला कीं, महादजी शिंदे याचे आंत्र आपलेकडे पेशजीपासून पत्रोपत्रीं आहे. याजवरून संधान करून शिंदे यांजकडे एक पलटणीसुद्धां दादासाहेब आले. भेटी झाल्या. शिंदे यांणीं आपले जागीं विचार केला कीं, ज्याकरितां इतके विभू[४] होतात ते अनायासें मसलत गांठली गेली. परंतु या प्रांतीं याजला ठेवणें सल्ला नाहीं. यास्तव हिंदुस्थानांत गोहदचे सुमारें दादासाहेबांस ठेवावें म्हणजे या प्रांतीं गुल उठल्याप्रमाणें नाना फडणवीस व सखाराम बापूस लिहून त्यांचाही रुकार येविसींचा आणि तशांत मोरोबा फडणवीस यांणीं होळकरांशीं संदर्प करून भीड उभी केली, व नानांस आणि सखारामपंतांस धरावें हें पाहून शिंदे यांणीं दादासाहेब पेशवे यांजला समागमें फौज हरी बाबाजी बरोबर देऊन हिंदुस्थानांत जाण्याकरितां रवानगी केली. असा विचार जाहला असतां, सखारामपंतांनीं

---

१. किल्मिष.

२. पेशव्यांची बखर पृष्ठ १२७–२८ पहा.

३. कॅप्टन स्टुअर्ट.

४. व्यूह.

नाना फडणविसांचीं सूत्रें सोडून, दादासाहेबांकडे शकटभेद करून दादासाहेबीं पुण्यावर यावें असा केला. याजवरून हरी बाबाजीस मारून पलटण एक समागमें होती त्यासुद्धां दादासाहेब जाऊं लागले. त्या प्रसंगीं शिंदे यांणीं लढाईचा डौल केला व फडणविसांनीं काहीं फौजा हुजुरात वगैरे मदतीस पाठविल्या. ते हे एकत्र होऊन लढाई जाहली. ते काळी नाना फडणवीस यांणीं मुबईस राज्यकारण करोन दादासाहेब आपले स्वाधीन आणावे, याजवरून पलटणीवाल्यांनीं दादासाहेब यांजला महादजी शिंदे याचे स्वाधीन करून पलटण माघारी गेली. त्या घालमिलींत कागदपत्र[१] सखाराम बापूचे दादासाहेबांकडेस गेले होते ते शिंदे याजला सांपडले, ते नानाकडेस पाहावयास पाठविले. व नानांनी ती पत्रें दस्ताऐवजीं सखारामबापू याजला दाखविलीं. याजवरून कायल होऊन बोलूं लागले कीं, "तुम्हीं दौलतीचा बंदोबस्त केलाच आहे व माझा बंदोबस्त आधी करावा." असें होऊन त्याजला कैद[२] केलें.

त्याजवर होळकराकडेस शकटभेद करून मोरोबास[३] धरून नगरचे किल्ल्यांत कैद केलें, त्याजवरून शिंद्याच्या अनुमतें दादासाहेब यांजला गंगा[४] किनाऱ्यास कैद ठेविलें.

**भोंसल्यांची इंग्रजांस मदत**, इ. स. १७७९:—मग पेशजी दादासाहेबाचे मदतीस कलकत्त्याहून पलटणें येत होतीं तीं हुशंगाबादेवर येऊन दाखल जाहलीं. तों दादासाहेबांचा प्रकार तसा होऊन विभू समाप्त जाहला. सबब त्या पलटणीचा मुक्काम हुशंगाबादेस राहिला. त्या पलटणांत मालक मिस्तर गाडर[५] साहेब, त्याजसमागमें हरिभद्र,[६] विश्वंभरपंताचे पुतणे आले

---

१. पेशव्यांची बखर पृष्ठ १३१–१३२ पहा. बापूचीं स्वदस्तुरचीं फितुराची पत्रें नानांच्या हाती लागली होती.

२. सखारामपंतांस कैद करून सिंहगडावर ठेविलें. तेथून प्रतापगडास आणि तेथून रायगडास नेलें. चाळीस शेरांची बेडी घातली. खाण्यापिण्याचे हाल केले. शके १७०३ मध्यें रायगडीं वारले. धाकटे शाहूराजे यांचें चरित्र पृष्ठ ४९–५० पहा. पंतप्रधान यांची शकावली पृ. ३२.

३. मोरोबादादा फडणवीस. पेशव्यांची बखर पृष्ठ १३२ पहा.

४. कोपरगांवास बेटांत नेऊन ठेविलें. पेशव्यांची बखर पृ. १३०.

५. ज. गॉडर्ड.

६. "त्या समागमें वेणीराम शिवभद्र यांचे भाऊ रामचंद्रपंत होते"

होते. त्या समयीं नागपुराहून मुधोजी भोंसले सेनाधुरंधर यांणीं साहेब बाहादुराची खातर–तसली करावयास व मेजवानी वगैरे पोंहचावयास शिवबाळा हजारी याजला रवाना केलें. आपले जागीं विचार करून दूर–देशीं असें पाहिलें कीं, या प्रसंगीं इंग्रज बहादुराच्या दोस्तींत खलेल न ठेवितां दिवसेंदिवस स्नेहभावाची वृद्धि अंतरंगीं ठेविली पाहिजे. या सल्ल्यांत दिवाकरपंतास घेऊन इंग्रेज बाहादुराचा प्रेम राखून त्या पलटणीसुद्धां गाडर साहेब बहादूर याजला निरोप दिला, इत्यादि मजकूर बाबूराव वैद्य पेशजीपासून वकिलीस पंतप्रधानाकडून सेनासाहेबाकडेस होते; त्यानें नाना फडणवीस याजला सविस्तर लिहून पाठविलें कीं, इंग्रेज बहादुराचें व यांचें राजकारण[१] दफे[२] होऊन एकत्रता उभय पक्षीं जाहली आहे, याजमुळें नाना फडणवीस यांचे पोटांत दिवाकरपंताविषयी वैषम्य आलें कीं, सेनाधुरंधर त्याचे लगामीं आणि हे मसलत या डौलाची देतात आणि इंग्रेज बहादुरांचा विचार कीं, रघुनाथराव दादासाहेब यांजला पुढें करून दक्षिण आपले स्वाधीन करूं पाहातात. यास्तव ही मलसत नीट नाही. याजवरून बाबूराव वैद्य याजला त्यांणीं लिहिलें जेः—"तुम्हीं स्वच्छ त्यास बोलावें की, इकडील लक्ष तुम्हीं ठेवून दादासाहेबांचा पल्ला सोडावा हें म्हणणें कबूल करून इकडील मसलत आटोपली; असेंही झालें असतां दुसरे ठिकाणीं लक्ष ठेवून आहांत हें चांगलें नाहीं." इत्यादिक पर्याय बाबूराव वैद्य यांणीं दिवाकरपंतांसी बोलून जातां त्याचे आंगीं कारभाराचा तौर[३] यास्तव गर्विष्ठपणें उत्तर दिलें. तें ऐकून यांणींही सक्त जबाब देऊन आपले मकाणास गेले, आणि विचार केला कीं, भोंसल्यांचे घरांत शकटभेद करावा. याजवरून यांणीं पाहतांना महिपतराव दिनकर याचा व दिवाकरपंताच्या कारभारावरून वैमनस्य, याजमुळें यांणीं महिपतराव यास संधान लावून बिबाजी भोंसले छत्तीसगडास होते त्यांजला पुण्यास नेण्याविषयीं बोलून

---

असें (आ) बखरींत आहे. वेणीराम हा कलकत्त्यास भोंसले सरकाराकडून इंग्रजांपाशीं वकील होता. याच्या पूर्वी रघुनाथपंत म्हणून वकील होता. असें ( उ ) बखरींत आहे.

१. राजकारण संबंधीं लेख, ठराव इत्यादि.

२. दफन.

३. तोरा.

आंतले बेतानें पक्केपणा केला, आणि दिवाकरपंतासीं खलष होऊन निरोप घेऊन वैद्य मशारनिल्हे पुण्यास गेले. त्यांणीं येथील पर्याय अवग्र नाना फडणवीस यांस सुचविला. तेव्हां नाना यांणीं महिपतराव कासीस बोलावून निश्चयांत आणिलें कीं, बिंबाजी भोंसले छत्तीसगडास आहेत याजला फौजेचे खर्चांत सरंजामी बत्तीस लक्षांचा मुलूख व जातीचे राहण्यास जागा, बऱ्हाणपूरचा किल्ला, पंतप्रधानाचे येथून देण्यांत येत आहे. हें घेऊन त्यांणी हिंदुस्थानांत शिंदे होळकर यांचे सल्लामसलतीस राहून मोहीम करावी. याप्रमाणें तुम्ही तेथें जाऊन बिंबाजी भोंसले याजला घेऊन यावें. येविषयीचें उद्‌घाटन बाबूराव वैद्य यांणी महिपतराव दिनकर याशीं करून आले. तुम्हीं जातांना त्याची भेट घेऊन जावी. असें बोलणें होऊन पत्रें लिहून देऊन नाना फडणवीस यांणीं महिपतराव कासी याची रवानगी केली. ते नागपूरचे मार्गी येऊन महिपतराव दिनकर याची भेट घेऊन छत्तीसगडास गेले. तेथें सविस्तर मजकूर बिंबाजी भोंसले आबासाहेब यांशी बोलून फौजेसुद्धां त्याजला घेऊन नवागडचे मुक्कामापर्यंत आले. हें वर्तमान मुधोजी भोंसले सेनाधुरंधर यांजला समजल्यावरून व्यंकटराव कासी यांजला विचारिलें कीं, तुमचे बंधु महिपतराव कासी नाना फडणविसाकडून छत्तीसगडास जाऊन बिंबाजी भोंसले आबासाहेब यांजला घेऊन पुण्यास जातात. यांतील विचार कसा आहे तो समजावा. याजवरून त्यांणीं विनंति केली कीं, बाबूराव वैद्य यांची सारी कृत्रिमता आहे म्हणोन बोलले. त्याजवर दिवाकरपंत यांणीं सेनाधुरंधर साहेब यांजला समजाविलें कीं, सारा फंद याचाच आहे. याजला कैद केल्याशिवाय होणार नाहीं. असें होऊन कैद करण्याचा निश्चय ठरला. हें वर्तमान व्यंकटराव कासी यांजला समजल्यावरून महिपतराव दिनकर यांणीं विचार करून उभयतां नागपुराहून निघोन बऱ्हाणपुरास जाऊन मंडल्याचे मार्गीं छत्तीसगडास गेले. हें वर्तमान सेनाधुरंधर याजला समजल्यावरून त्याजकडे आणावयाकरितां स्वार पाठविले. तों स्वारांशीं व यांशीं गांठ न पडतां ते निघोन गेले. व भिवबा आचारी महिपतराव दिनकर याजकडील सांपडला. त्याजजवळ कागदपत्र[१] वगैरे दरोबस्त सांपडले. तेव्हां दिवाकरपंतांनीं पाहून

१. आचाऱ्याजवळ देवपूजेची कंठाळ होती त्यांत पुरंदराकडील महादजी शिंदे व बाळाजी जनार्दन फडणवीस यांचे दस्ताऐवजीं कागद

अवग्र सेनाधुरंधरास दाखविलें. तें पाहून सेनाधुरंधर यांणीं म्हटलें कीं, महिपतराव दिनकर यांचे वडिलांचें वैमनस्य याजवरून यांनीं उद्योग केला, तेव्हां पंतप्रधान व नाना फडणवीस यांचे मर्जीस विक्षेप येऊन असें झालें. आतां तुम्हीं पुण्यास जाऊन सफाई करून यावें.

**नाना फडणवीस व भोंसले यांचा इंग्रजांविरुद्ध करारः--** यावरून दिवाकरपंत पुण्यास[१] गेले. नानांशीं भेटी झाल्या. ते वेळेस नानांनीं[२] बोलण्यांत आणिलें कीं, "तुमचें लक्ष इकडेस असावें तें एकीकडेस ठेवून इंग्रेज बाहादुराशीं सख्यत्व ठेवितां. आणि इंग्रेज बहादुराचे मनांत कीं, दादासाहेबांस पुढें करून दक्षिण घ्यावी. या विचारांत तुम्हीही आहांत यावरून तुमचे घरांत आम्हीही शकटभेद करून, कळेल तसा विचार केला आहे." तेव्हां त्यांणीं विनंति केली कीं, "ज्यांत तुमचे मर्जीचा संतोष तेंच आम्हांस करणें जरूर आहे." याचें उत्तर त्यांणीं दिल्हें कीं, "तुमचे मनांत इकडील विषयीं स्वच्छता असली तरी तुम्हांकडील फौजा व सरदार मकसुदाबाद[३] पटणें प्रांतीं जाऊन मोहीम करावी." याजवरून यांणीं विचार केला कीं, "नानांचे मर्जीस झटका बसल्यास चांगलें नाहीं. तें समजोन त्यांचे मर्जीनुरूप इंग्रेज बहादुरावर मसलत कबूल करून फौजा मकसुदाबाद पटणें प्रांतीं पाठविण्यांत येतील, परंतु फौजेचा खर्च निभोन जो खांसा त्या प्रांतीं जाईल त्याचे जातीस पद मिळाल्यास आपले मर्जीचें संरक्षण व सेना-धुरंधरांचा संतोष, हे दोन्ही होतात." याजवरून नानांनी कबूल केलें कीं, "तुम्हांकडील खासा व फौजा मकसुदाबादचे सुमारें गेल्यास सेनाबहादुराचें पद मिळेल व मंडले प्रांतही देण्यांत येईल." असा सिद्धांत होऊन करार-मदार[४] ठरले. ते वेळेस सेनाधुरंधराचे तर्फेनें दिवाकरपंतांनीं इमान प्रमाण

---

सांपडले. ते कागद दिवाकर पुरुषोत्तम यांनीं पाहून सेनाधुरंधरास दाखवून महिपतराव दिनकर याविषयीं पोटांत वैगुण्य भरलें. (आ) बखर.

१. "सन ११८८ सालीं पुरंधरास दिवाकर पुरुषोत्तम गेले." (आ) बखर.

२. नानांचें मन बाबूराव वैद्य यांनीं भोंसल्याविषयीं कलुषित केलें होतें म्हणून नाना रागानें बोलले. (आ.) बखर. ३. मुर्शिदाबाद बंगाल.

४. या समयीं जे करारमदार झाले त्या संबंधानें लेखांक (११) पहा. हेच ठराव या वेळेस झाले. हा तह १९ कलमांचा आहे.

तुम्हासी होऊन त्याजकडील दिवाकरपंत आले.

इकडेस सेनाधुरंधर यांणीं बिंब्राजी भोंसले आबासाहेब नवागडास आले हें समजोन चिमाबाईसाहेबांची रवानगी छत्तीसगडास आबासाहेबांचे समजुतीकरितां केली. हे जाऊन रायपूरचे मुक्कामीं आबासाहेबांस आटपून आबासाहेबांची स्त्री आनंदीबाई यांचे विद्यमाने सफाई करून समेट केला. व चार महिने जाणें राहविलें व चिमाबाईसाहेब माघारी नागपुरास आली.

**इंग्रजांविरुद्ध एकजूटः**—तशांत पूर्वी दिवाकरपंत यांणीं नानांशीं करारमदार होऊन विनंति केली की, "आपलेकडील वकील आमचे सरकारांत हमेशा राहात आहेत. त्यास उभयपक्षी खलश न येतां संरक्षण होऊन वर्तणूक करील असा वकील योजून देण्यांत यावा." याजवरून बाबूराव वैद्य रहित होऊन सदाशिवपंत घुणे[१] नानांनीं वकिलीस नेमिले. ते काळीं नानांनी मोहिमेचा निश्चय ठरविला कीं, "सेनासाहेबांकडील फौजेनीं पूर्वेकडेस मोहीम करावी, व नबाब बंदेगान अल्ली याणीं दक्षिणेकडेस[२] मोहीम करावी, व शिंदे होळकर यांणीही हिंदुस्थानांतून उत्तरेकडेस मोहीम करावी. व पंतप्रधान यांजकडील फौजेनीं पश्चिमेकडील मुबईस स्वारी करावी असें चोहींकडून इंग्रजबहादुरावर शह द्यावा." असा विचार ठरवून दिवाकरपंताची रवानगी केली.

येथें येऊन सेनाधुरंधर साहेबांशीं पुण्यांतील अवघ्र मजकूर जाहला तो निवेदन केला. तेव्हां इंग्रज बहादुरावर मसलत करणें हें ऐकून सल्ल्याचा मार्ग चांगला नाहीं, व नबाव इमामुद्दौला इष्टिनसाहेब[3] बाहादूर याशीं स्नेह संपादिला आहे, असें असतां हें करणें नीट नाहीं. दिवाकरपंताचे लगामी राज्यकारण, तेव्हां विचार सेनाधुरंधरांनी आपले जागी केला कीं, बाहेर आंगीं फौजा पाठवून आपले मुलखांत ओडिसा प्रांतीं येऊन प्रसंग पाहून जें करणें तें करावें. यांत मर्जी पंतप्रधानाची राहती. व राज्यकारणात नीट दिसतें." सबब लाचारी जाणोन खंडोजी भोंसले ऊर्फ चिमणा बापूसाहेब याजबरोबर

---

१. गुणे

२. निजामाशिवाय हैदरअलीही या करारांत होता. त्यानें मद्रासेवर व निजामानें उत्तर सरकारवर स्वारी करावी असें ठरलें होतें. ( सं. )

३. हेस्टिंग्ज.

२५ हजार फौज व भवानी काळु कारभारी देऊन नाना शामराज फडनवीस, व महादाजी उमाजी व पांडुरंग सूर्याजी बक्षी व अमृतराव माधव चिटणवीस परभु व दत्ताजी यशवंत आठोले यांचे जमावासहित मुसाहेबीत* याप्रमाणें नेमून रवानगी केली.

**भोंसल्यांचा नानाशीं विश्वासघात** इ. स. १७८१:—तें पुण्याकडे रोंख दाखवून चंद्रपुराकडून जावें ते कटक प्रांती जाऊन पोंहचावें, तों इकडेस पुण्याहून सेनाबहादुरीची वस्त्रें आली. ती बांधाचे (बांदा) मुक्कामीं कटकास जातांना सेनाधुरंधरांनीं चिमणाबापूस खलिता देऊन परस्परें सेनासाहेबाची व सेनाबाहादुराची लिहिले करारमदार ठरविले ते :—आम्ही आतां उभयतां प्रथम अधिकारी जालोंत आतां कोणताही परस्परें दाया नाहीं. याप्रमाणें झाले. असें होऊन कटक प्रांती जाऊन सन ११८९ सालीं पोंहचले. ते वेळेस मकसुदाबाद प्रांती खंडणी पेशजी घेणें राहिली होती म्हणोन तिकडे शह दिला. तेव्हां नवाब इमामुद्दौला यष्टीन साहेब बहादूर याणीं बेणीरामपंत व विश्वंभरपंत वकील सेनासाहेबांकडील त्याजपाशीं होते त्यांचे विद्यमानें बोलण्यांत आणिलें की, " सेनासाहेबाचा व आमचा स्नेह घरोदोस्ती चालत आहे, व पुढें अजरामर चालावा आणि आम्हास टिपूकडील मसलत करणें आहे, व हमेशा आम्हांकडील जाणें येणें सेनासाहेबांचे कटक प्रांताच्या सरहद्दींतून आहे, त्यास मार्गांत खलेल होऊं नये. सबब तीस लक्ष खंडणी व शिवाय दहा लक्ष दरसाल तीन लक्ष रुपये याप्रमाणें घेऊन, चिमणाबापू सेनाबहादूर यांणीं इकडील शह सोडून द्यावा."†

**चिमणाबापू न लढतां परत**:—याजवरून सेनाबहादूर यांणीं दोस्ती कायमी ठेवून प्रसंग संपादून, नवाब इमामुद्दौला बाहादूर याचे मनोदयानुरूप घेऊन शह सोडून कटकास आले. एक वर्ष कटक प्रांती राहून माघारे सन ११९० साली नागपुरास येऊं लागले.

येतांना मार्गात छत्तीसगडांत रतनपूरचे मुक्कामीं बिंबाजी भोंसले आबासाहेब यांच्या भेटीस गेले. या प्रसंगीं महिपतराव दिनकर, व्यंकटराव काशी

---

* बरोबर, समागमें. † हा पत्रव्यवहार Persian Calender मध्यें छापला आहे. नानाचा वकील नारोपंत काळे यास नानानें मुद्दाम भोंसल्यांच्या लष्कराबरोबर पाठविलें होतें. (सं.)

व महिपतराव काशी हे तेथें होते. तशांत मुधोजी भोंसले सेनाधुरंधर यांणीं चिमणा बापू खंडोजी भोंसले सेनाबहादूर यांस लिहिलें जे, येतांना महिपतराव दिनकर, व्यंकटराव काशी व महिपतराव काशी याजला समजुती करून घेऊन यावें." यावरून आबासाहेब यांशीं बहुतां प्रकारें निखालसता, करून महिपतराव दिनकर, व्यंकटराव काशी यांजला समागमें घेऊन येण्याचा निश्चय केला. महिपतराव काशी यांजला आबासाहेबांनी आपले जवळ ठेवून घेतलें; कारण त्या प्रांतीं सिरगुजा, सोहागपूर व संबळपूर व चुटिया नागपूर व रेवा मुकुंदपूर आदिकरून अंमल जागोजागीं तिकडे तंबीस फौजा देऊन महिपतराव काशी याजला तिकडील पारपत्यास पाठविलें.

इकडे चिमणाबापू नागपुरास आले. त्या वेळेस महिपतराव दिनकर व्यंकटराव काशी याजला समागमें आणिलें. त्या संधींत पूर्वी चिमाजी[1] रखमांगद चिटणवीस यांचा काल झाला. त्याचे संस्थानीं शहाणा हौसदार दौलतींत माहितगार असें पाहून कृष्णराव माधव चिटणवीस यांजला स्थापित केलें. नंतर दिवाकरपंत यांचा काल नागपुरांत जाहला[2] पुढें सेनाधुरंधर व बापूसाहेब व सेनासाहेब सुभा असे सेनाबहादुरास आणावयाकरितां बांधापर्यंत जाऊन त्रिवर्गसाहेबांच्या भेटी झाल्या. नंतर नागपुरास आले. अवघ्र बंगाले प्रांतांतील वर्तमान निवेदन केलें.

तिकडेस, नबाब इमामुद्दौला इष्टीनसाहेब बहादूर यांणीं आसफउदौला याशीं स्नेहभाव करून काशींत आले असतां चेतसिंगराजे यांणीं फंद करून साहेबबहादुरास दगा दिला. ते वेळेस सेनासाहेबांकडील वकील वेणीरामपंत व विश्वंभरपंत यांणीं इमामुद्दौला बहादर याजला आपले म्यानांत बसवून, चेनारगडास गंगा उतरून जाऊन पोंहोचविलें. तेथील वर्तमान लखनौस नबाब आसफउदौलास जाहीर झाल्यावरून, नवाबानीं चाळीस पन्नास हजार फौज घेऊन चेनारगडाकडेस आले. त्याचें म्हणणें कीं, चेतसिंग आमचा जमेदार याणें इमामुदौला बहादर यांस बेआदबी केली. सबब त्याचें पारपत्य

---

१. सन ११९० फसलींत चिमाजी वारला. याला चार बायका होत्या त्या सती गेल्या.

२. हेस्टिग्ज यास भेटण्याकरितां दिवाकरपंत काशीस गेला होता असें इंग्रजी लेखांत आढळतें. ( सं. )

करणें जरूर. यास्तव त्याची फौज तिकडून आली व पलटणीही इंग्रज बहादुराकडील काशींत आली तेव्हां चेतसिंगास धैर्य होईना सबब तो पळून हिंदुस्थानांत गेला.

**चापमनची वकिली,** इ. स. १७८२:— नंतर नवाब इमामुदौला इष्टीनसाहेब बहादूर यांणीं त्या प्रांताचा बंदोबस्त करून बंगाल्याकडेस जाऊन मिस्तर च्यापलिनसाहेब बहादूर याजला सेनाधुरंधर व सेनासाहेब याजकडेस नागपुरास पाठविलें. त्यांणीं येऊन अवग्र सफाईचीं बोलणीं बोलून म्हटलें कीं, हैदरावर आमची मोहीम आहे. त्याजकरितां तिकडे सरंजाम वगैरे पोंहोचविणें जरूर आहे, याजकरितां कटकचे सुभे राजाराम मुकुंद याजला सक्त ताकीद असावी जे, चिलखा[१] उतरून जाण्यायेण्यास बेखलष जाऊं द्यावें. याजवरून सेनाधुरंधर व सेनासाहेब बहादूर दूरदर्शी यांणीं इंग्रज बहादुराची दोस्तीची पास ठेवून राजाराम मुकुंद याजला परवानगी लिहून पाठविली, व या दोस्तीकरितां करोड रुपयांची नुकसानी कबूल करून दोस्ती ठेविली, व साहेब बहादुरास निरोप देऊन माघारे रवाना केलें. येविषयींचा संशय पंतप्रधान यांचे चित्तांत असल्यास निखालसता करावी, नबाब बंदेगान अल्ली याचे चित्तांत असल्यास शोध मनास आणावा, व मसलतीचे मार्ग निराकरण करावें, याजकरितां बाळाजी विष्णु याजसमागमें भवानीपंत मुनसी देऊन हैदराबादेस नबाबाकडे पाठविलें. तेथीलही खुलासा ध्यानास आणिला तो खलष एदलाबाद प्रकरणावरून आला होता. सबब सफाई होऊन दोस्ती उभय पक्षीं चालावी असा सवरस[२] येऊन लौकरच परतून आले. उपरांतीक बाळाजी विष्णु व भवानीपंत मुनसी पुण्यास नानाकडेस पाठविले, कारण जे सेनासाहेब बहादूर यांणीं इंग्रजाचें पारपत्य करावें तें न करितां दोस्ती राखून फौजा माघाऱ्या आल्या, याजवरून पंतप्रधानाचे मनांत खलष आला, हें बातमीचे द्वारें समजलें. याजमुळें उभयतां मशारनिल्हे यांची रवानगी केली तेथें पुण्यास पोंहोचून नानांशीं बोलण्यांत आणिलें कीं, पहिले बेत चहूं देशीं मोहिमेचे ठरले असतां एकंदर आमची सरकारची फौज जाऊन सेनाबहादूर खिसा राखोन तिकडील हवेनें, फौजेंतील घोडीं बहुत जायां होऊं लागलीं,

१. ओरिसाच्या दक्षिणेकडील एक मोठें सरोवर.
२. सौरस्य.

सबब माघारे आले; बरकड इकडील फौजा कोणीकडेस मोहिमेस न जातां, आम्हांवरच दोष यावा हें ठीक नाहीं. याजवरून नानांनीं उत्तर केलें कीं, माधवरावसाहेब पंतप्रधान यांचें लग्न करणें झाल्यावर मोहिमेचा बेत आहेच. ( नंतर ) राज्यप्रकरण करण्यांत येईल याजवरून सफाई करण्यांत आली. माधवराव साहेब पंतप्रधान यांचे लग्नाचा निश्चय होऊन लग्नसमारंभ झाले. त्यास आहेर करून उभयतां मशारनिल्हे माघारे आले.

नंतर जफरुदौला[१] याचे चिरंजीव यहतिशामजंग हे निर्मळास नबाबाशीं बदलून किल्ला बळकावून लढाईसी नमूद झाले. त्या प्रसंगीं नबाबांनीं सेनासाहेबांची फौज मदतीस बोलाविली सबब यशवंतराव भवानीशंकर काळू याजबरोबर पांच हजार फौज देऊन रवाना केलें. तेथें जाऊन नबाबाचे हामराईत[२] राहून मर्जीचा संतोष होऊन माघारे आले. त्या प्रसंगीं बगाजी रघुनाथ याजला हैदराबादचे वकिलीस नेमस्त करून पाठविलें. त्यानंतर कांहीं दिवसांनीं नबाबाची इतराजी यहतिशामजंग याजवर असतां मशरुल मुलुक याचे योगानीं सफाई होऊन यहतिशामजंग अलजपूरचे सुभे होऊन आले. ते समयीं त्यांणीं वऱ्हाडांतील दुअमली असतां सेनासाहेबांकडील अमलास खलष[३] आणून जबरी दाखवूं लागले. त्या प्रसंगीं महिपतराव सुभेदार यांची रवानगी सेनाधुरंधर व सेनासाहेबांनीं केली आणि हैदराबादेस बगाजी रघुनाथ वकिलीस होते त्याजला लिहून सुचविलें कीं, " हल्लीं यहतिशामजंग अजलपूरचे सुभे होऊन आले आहेत ते जबरी दाखवून हरएक कामी खलष आणितात त्यापेक्षां नबाब बंदेगान अल्ली मशीर उन्मुलुक याशीं बोलून पेशजी इस्मायलखान पन्ही याजकडे सुभा होता त्याप्रमाणें त्याचे चिरंजीव सलाबतखान व बहिलोलखान याजकडेस सुभा झाल्यास, हरदो तर्फेची सफाई निघोन बंदोबस्त यथास्थित चालेल. " याजवरून वकील मजकुरांनीं तेथें बोलण्यांत आणिलें, त्याजवरून त्याजकडेस सुभा नबाबांनीं नेमिला. समागमें कारभारी अहमद अल्ली व विठलपंत सुभेदार फौजेसहित यांणी आज्ञेंत वागावें, असा सरकारी हुकूम होऊन रवाना झाले. ते यहतिशामजंग याशीं भेटी होऊन

१. धवसा    २. बरोबर
३. विघ्न

बोलणीं जाहलीं. वराड, चांदा, डामेडा* व गंगथडी वगैरे अंमल सुदामत चालत आहे त्याप्रमाणें पुढेंही चालवून उपसर्ग परस्परें न व्हावा, बंदोबस्ती कायम चालावी असें बोलणें होत आहे, तशांत हें ठरवून परत माघारे आले.

नंतर कांहीं एक दिवसांनीं पंतप्रधान यांजकडील कारभारी नाना फडणवीस यांणीं बदामीवर[१] स्वारी करण्याचा बेत केला. तिकडून नवाब बंदेगान अल्ली यांस त्यांणीं संदर्प लावून त्या मोहिमेस बोलाविलें. ते फौजे-सुद्धां येदगिरीचे सुमारें आले. तशांत भोंसले सेनासाहेब व सेनाधुरंधर यांजकडेस नानांची सूचना आली कीं, फौज मदतीस यावी व सेनाधुरंधर यांचें जाणें साबाजीबोवाची लढाई झाल्यापासून झालें नव्हतें, व सर्वत्र पंतप्रधान यांचे कारपरदाज यांची आर्ती भेट घडावी, यास्तव मुधोजी भोंसले सेनाधुरंधर फौजे सुद्धां जाण्याची तयारी केली. आपले मुलुखांतून बंदोबस्त गोंडवण, चांदा वगैरेचा राखून, वराडांत गेले. चिमाबाईसाहेब व बाळाबाई व ठकूबाई आदिकरून सातान्यास श्रीखंडोबाचे यात्रेस जाण्याकरितां जनानखाना समागमें घेतला. आपण जातीनें मोहिमेस जाणार. बदामी आदिकरून कर्नाटक प्रांतांत. सबब रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा याजला नागपुरास रवाना केलें. व वराडांतून पुढें जाऊन पुण्यास पंतप्रधान यांच्या व नानांच्या आदिकरून भेटी वानवडीच्या मुक्कामीं झाल्या.

तशांत गाविलगड बदलल्याचें वर्तमान[२] कळलें. ऐकून पुण्यास व्यंकाजी भोंसले नानासाहेब याजला तेथें ठेवून खंडोजी भोंसले चिमणाबापू ऊर्फ दाजी-साहेब यांजला समागमें घेऊन, सडे पुनः गाविलगडाजवळ सेनाधुरंधर येऊन किल्ल्याचे लोकांशीं प्रेम दाखवून किल्ला हस्तगत करावयाकरितां

---

* गोंडवन (?)

१. ही स्वारी सन १७८६ चे मे महिन्यांत झाली. पेशव्यांची बखर पृष्ठ १४८ पहा.

२. हा किल्ला प्रमोदसिंग याच्या ताब्यांत होता. याचा चुलता, झामसिंग जमादार याचा मेहुणा संतोकसिंग यानें फंद करून तो किल्ला बळकाविला. हें वर्तमान रामाजी केशव यांनीं पुण्यास सेनाधुरंधर आणि नागपुरास सेनासाहेबांस कळविलें. "कायस्थ प्रभूंच्या इतिहासाचीं साधनें" पु० १ अंक ५ पृ. ६ पहा.

कृष्णराव[१] माधव चिटणवीस, व संताजी नाईक जाधव यांजला किल्ल्यावर पाठवून किल्ल्यांतील माणसें यांजला भेटीस बोलावून पारपत्य फंदी माणसांचें करून दगाबाज लोक दूर केले. नंतर झामसिंग याचा आप्त तोच किल्लेदार केला. व ब्राह्मण कारभारी चंद्रपूरची शिवबंदी किल्ल्यावर कायम करून किल्ल्याचा बंदोबस्त राखिला.

**बदामीचा वेढा**, इ. स. १७८५:—बदामीस जाण्याकरितां सन ११९५ चे सालीं दरकूच पुण्यास गेले ते पंतप्रधान याचे फौजेंत भंडारकवठेचे मुक्कामीं दाखल झाले. नाना फडणवीस यांनीं पुण्याहून फौजेसहित आले. ते सेनाधुरंधरांच्या व यांच्या भेटी भंडारकवठेचे मुक्कामी झाल्या. समागमें तुकोजी होळकरास व हरिपंत[२] फडके व शिंदे यांजकडील जिवबादादा[3] फौजे सहित व मिरजकर परशुराम[४] भाऊ वगैरे फौजेसुद्धां होते. नबाब बंदेगान अल्ली हेही फौजे सुद्धां आले होते. ते परस्परें भेटी येदतगिरीच्या नजिक कृष्णातीरीं होऊन, स्नेहभावाचीं बोलणीं होऊन, बदामीचा किल्ला घ्यावा व कर्नाटकची मोहीम करावी इत्यादिक बेत करून, बदामीस दरकूच जाऊन पोंहचले. सर्वत्र एक विचारें होऊन मोर्चे बसविले. कांहीं एक दिवस गोळागोळीची लढाई होऊन हल्लेचे दिवशीं मुधोजी भोंसले सेनाधुरंधर यांचे चिरंजीव खंडोजी[५] भोंसले सेनाबहादूर यांणीं जहामर्दी बहुतशी केली.

---

१. प्रमोदसिंगाचा मेहुणा संतोकसिंग याची भेट घेऊन तेथें शकटभेद करून किल्ल्याच्या दरवाज्याजवळ संतोकसिंगाची भेट सेनाधुरंधराशीं झाली. ही कामगिरी कृष्णराव माधव यांनीं केली. ( प्र. आ. )

२. हरिपंत तात्या फडके हे पेशव्यांचे मोठे सेनापति होते. सेनाधिपत्य आणि कारस्थान याजमध्यें हे निपुण होते. यांनीं अनेक स्वाऱ्या करून जय मिळविला. हे सिद्धटेकास शके १७१६ आनंदनाम संवत्सरीं ज्येष्ठ शुद्ध दशमीस वारले. ( धाकटे शाहूराजे यांचें चरित्र पृ. ५९ पहा ) पंतप्रधान यांच्या शकावलींत ज्येष्ठ वद्य ७ स देहावसान झालें असें आहे. पुन: पेशव्यांची बखर ( पृ. १७४ ) यांत कार्तिकमासीं देवाज्ञा झाली असें आढळतें.

३. हा शिंद्याचा कारभारी व सेनापति होता.

४. तासगांव संस्थानचे मालक. पटवर्धन.

५. खंडोजी बरोबर या समयीं पुढील मंडळी होती. जयराम गणेश, आबाजी यशवंत, आपाजी सखाराम आणि महादाजी बल्लाळ लष्करी.

निशाण किल्ल्यावर चढविलें. तेथें लढाईत यांजकडील लोक जायां जखमी फार झाले असें होऊन बदामीचा[1] किल्ला घेऊन यश संपादिलें. नबाब व नाना फडणवीस यांणीं सेनाबहादुराची[2] जहामर्दी पाहून बहुत संतोष पावले.

खातरतसली[3] करून पुढें कर्नाटक प्रांतीं पंतप्रधानाकडील फौजा व नबाबाकडील फौजा व सेनाधुरंधर असे मिळून जावें तों नाना फडणवीस व नबाब बंदेगान अल्ली यांचा कांहीं एक मजीना आपसांत उभा राहिला, त्याजवरून नाना फडणवीस यांणीं पुण्यास जाण्याचा विचार केला व बंदेगान हाजरतीचें जाणें हैदराबादेचें ठरलें. तेव्हां कर्नाटकाची मोहीम राहिली. हें सेनाधुरंधर यांणीं पाहून तत्काळीं त्यांनीं व्यूह केला तो वृथा जातो हें मनांत आणून नबाबाचा व पुणेंकर कारपरदाज[4] यांचा स्नेहभाव असावा, कर्नाटकची मोहीम कायम व्हावी, दूर देशीनीं अंदेशा करून उभयतांचा प्रेम करून दिला. परंतु नानांचे मनांत पुण्यासच जावें कारण माधवराव नारायण पंतप्रधान वय लहान मागें एकादा फंद होईल; यास्तव तजवीज ठरली कीं, नाना यांणीं पुण्यास जावें, त्यांचे तर्फेनीं हरिपंत फडके फौजे सहित आणि नबाबांनीं हैदराबादेस जावें, याजकडील सरदार तहवरजंग फौजे सुद्धां हरिपंताचे समागमें नेमस्त केले व सेनाधुरंधर मसलतीचे बाणीकार यांणीं आपले मधवट चिरंजीव खंडोजी भोंसले सेनाबहादर फौजे सहित हरिपंताचे सामलातीस ठेवून, आपण माघारे पुण्यास आले.

येते समयीं नानांचा व नबाबाचा समेट करवून नबाब हैदराबादेस गेले. व नाना व सेनाधुरंधर पंतप्रधानाचे भेटीस आले. पंतप्रधान व सेनाधुरंधर यांशीं प्रेमयुक्त शिरस्तेबमोजीब भेटी होऊन आपले राज्यांतील खुषवक्तीच्या तऱ्हा दाखवून कृपेची वृद्धि बहुतशी झाली.

यापूर्वी चिमाबाईसाहेब आदिकरून जनानखाना सेनाधुरंधरांकडील

---

१. या मोहिमेचें वर्णन 'परशुरामपंत भाऊ पटवर्धन यांचे चरित्रा'चे सातवे भागांत सविस्तर दिलें आहे. पृ. ५१–५४ पहा.

२. खंडोजीनीं मोठा पराक्रम केला आणि प्रथम लगी चढविली असें (आ) बखरींत आहे.

३ समजूत

४ मुत्सद्दी

जेजोरीचे श्रीदेवाची व श्रीशंभुमहादेवाची वगैरे दक्षिण यात्रा करून सातान्यास जाऊन महाराज छत्रपति[१] सरकारच्या राजपत्न्यांच्या भेटी होऊन आपले वतनाचें गांव देऊर येथें आले. पुढें नागपुरास येण्याचा विचार; अशांत पुण्याहून सेनाधुरंधर यांणी पंतप्रधानांचा व नानांचा निरोप घेऊन सुदामत सिलसिलेप्रमाणें बहुमान वस्त्रें जवाहीर अलंकार देऊन पंतप्रधानांनी रवाना केलें. तेथून कूच करून देऊरास आले. तों चिमाबाईसाहेब आदि करून सर्वत्र मंडळीच्या भेटी होऊन तेथून कूच करून नागपुरास येऊं लागले. ते समयीं नागपुराहून रघोजी भोंसले सेनासाहेब बापूसाहेब लाखणवाड्याचे घाटापर्यंत आणावयास सामोरे गेले. वरकडही कित्येक सरदार मुत्सद्दी मंडळी उमरावतीपर्यंत जाऊन मुधोजी भोंसले सेनाधुरंधर यांस मंडळीसहित सिताबर्डीवर येऊन राहिले. सुमुहूर्तानी नागपुरात हवेलीत दाखल झाले.

त्यानंतर चार महिने झाले तों तिकडेस कर्नाटक प्रांतीं त्रिवर्गाच्या फौजा गेल्या. त्यांत चिमणाबापू सेनाबहाद्दर यांचा प्रताप दिवसेंदिवस लढाईचे प्रसंगीं जाहामर्दी होऊं लागली. टिपूकडील तीन वेळ छापे लष्करावर आले. ते प्रसंगीं सेनाबहाद्दर यांणी कोणाची वाट न पाहतां आपलेच फौजेनें लढून टिपूचे छापे हटवून द्यावे. तों एके दिवशी दग्यानें छापा आला. त्यांत सेनाबहाद्दराकडील अजबाब बुलगें* लुटले. परंतु सेनाबहाद्दर जाहामर्द यांणी संभाळून छापा मारून चालविला. असें होऊं लागले याजवरून, तहवरजंग नबाबाकडील व हरिपंत फडके पंतप्रधान यांजकडील आश्चर्य करून होते. हें वर्तमान टिपूकडे समजल्यावर तेही बहुत खुष झाले.

ते प्रसंगीं पंतप्रधानाकडील वकील टिपूजवळ होते. त्यांजला टिपूनी पृच्छा केली कीं, "नागपुरकर भोंसले हमराहित‡ आहेत त्यांचा वकील आला नाहीं. त्याजवरून त्यांणीं हरिपंतास लिहिलें. म्हणून हरिपंतांनी सहज बोलण्यांत भाव दाखविला. याजवरून वल्लभदास लाला याचे वडील दुल्लभदास मुनशीगिरीवर भवानीपंत मुनशी यांणी सेनाबहाद्दराजवळ ठेविले होते. ते दुल्लभदास याजला टिपूकडेस हरिपंत यांचे म्हणण्यावरून पाठविले.

---

१. परसोजी भोंसले लहान वयाचे बरोबर होते. यांजला छत्रपतीनीं शिपाईगिरीचा पोषाख दिला, असें ( ई ) बखरींत आहे.

* बुनगें. ‡ समागमें

तेव्हां टिपूनीं बहुत सन्मान करून सेनासाहेबांकरतां चांगला दक्षिणी हत्ती व शिवाय जवाहीर घोडे देऊन दुल्लभदास याजबरोबर पाठविलें.

ते आल्यानंतर हरिपंताचे विद्यमानें टिपूनें तह[१] केला. त्यांणीं कांहीं द्रव्य वगैरे देऊन माघारे पुण्याचे सुमारें आले. तों मागाहून सेनाबहाद्दर यांजला हरिपंतांनी निरोप दिला. ते नागपुरास येऊन सर्वत्रांच्या भेटी सन ११९७ चे साली झाल्या.

**बिंबाजीचा मृत्यु,** इ. स. १७८७:--नंतर मुधोजी भोंसले सेनाधुरंधर आपले जागीं स्वस्थ होते, तों एकाएकीं सेनाधुरंधर यांचे कनिष्ठ बंधु बिंबाजी भोंसले छत्तिसगडांत रतनपुरीं होते. ते कांहीं फौजेसुद्धां मोहिमेस्तव नऱ्या प्रगण्यांत जाऊन सन ११९७ ज्येष्ठ[२] मासीं मृत्यु पावले. हे मोठे रामभक्त होते. याणी रतनपुरीं रामाचें देऊळ बांधलें. यानीं राज्य सन ११६६ फसली या सनापासून ते सन ११९७ फसलीचे सालापावेतों केलें. त्याची एक कनिष्ठ स्त्री उमाबाई[३] नामें तेथें सती गेली.

**मुधोजीचा मृत्यु,** ता. ९–५–१७८८:--हें वर्तमान नागपुरास मुधोजी भोंसले यांस कळून बहुत शोक झाला. हें वर्तमान सन ११९७ पौषमासी होऊन नंतर पांचचार महिन्यांनीं मुधोजी भोंसले सेनाधुरंधर यांसही वैशाख मासी शुद्ध पौर्णिमेस देवाज्ञा झाली. यांजला थोरले रघोजीचे, देवळाचे ईशान्येकडे अग्नि दिला.

याउपर रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा वडील बंधु, त्याजपेक्षां धाकटे खंडोजी भोंसले सेनाबहाद्दर. व कनिष्ठ व्यंकोजी भोंसले नानासाहेब. त्यांत सेनासाहेब सर्वज्ञ, सारा बंदोबस्त, मुत्सद्दी व सरदार लोक वडिलांचे हातचे, यांचे मनोदयें ठहरून बंदोबस्त केला.

पुढें सन ११९८ चे सालीं पुण्यास जाण्याचा निश्चय झाला. समागमें

---

१ सन १७८७ त एप्रिल महिन्यामध्यें तह झाला. टिपूनें बदामी, नरगुंद व कित्तुर आणि ४५ लाख रुपये खंडणी देण्याचें कबूल केलें.

२. ( उ ) बखरींत कार्तिक वद्य त्रयोदशीस निवर्तले असें आहे. ( आ ) बखरींत पौषमासी काळ झाला असें आहे.

३. "उमाबाई साहेब यांनीं शय्यागमन केलें" (आ) बखर. ही त्रिंबकजी अहिररावाची कन्या.

भवानीपंत मुनशी व कृष्णराव माधव चिटणवीस राज्यकारणी कारभारांत वरकड मुखत्यारी महादाजी लष्करी असे बरोबर घेऊन पुढें पुण्यास चालले.

तों इकडे छत्तीसगडांत बयदा[१] आनंदीबाई[२] साहेब बिंबाजी बाबाची स्त्री इनें केला. सबब तिजकडेस कोणी पाठवून बंदोबस्त करावा ही योजना होती. तशांत तेथें महिपतराव काशी छत्तीसगडांत आनंदीबाईसाहेब यांजपाशी दोन हजार फौजेनी पेशजी आबासाहेबांपासून होते व महंमदखा तरीन दोन हजार जमावानी धोंडो महादेव दिवाण, हरबाजीपंत फडणवीस व रामाजी भाऊ बक्षी यांचे चिरंजीव बाळाजी रामचंद्र बक्षी, मुजुमदार माधवराव रामचंद्र व महादाजी भोंसले व सुरनीस भगवंतराव व कृष्णंभट उपाध्ये व जयरामपंत आनंदीबाईचे दिवाण, व निळोपंत गोंडवानचे सुभे हे सर्वत्र आपसांत एकमेकांस असाह्य होऊन आनंदीबाई यांजला धोंडोपंत व महंमदखा तरीन याणी मसलत ठरविली की, कोणी दत्त पुत्र घ्यावा. याजवरून महिपतराव काशी व महादाजी भोसले व कृष्णंभट उपाध्ये याणी सल्ला योजिली की, "मालक आनंदीबाई आहेतच. परंतु नागपुरांत रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा आहेत. त्यांचे विचारें जें होणें तें व्हावे." हें वर्तमान सेनासाहेब यांजला समजलें. याजवरून महिपतराव काशी याजला सेनासाहेबांनीं खास दस्तुर पत्र लिहिले जे :--

राजश्री महिपतराव काशी गोसावी यांस, रामराम. उपरी तीर्थस्वरूप कैलासवासी आबासाहेब यांस देवाज्ञा झाली. यापासून अलिकडेस तुम्ही उद्विग्न होऊन आहांत. त्यास ईश्वर सत्तेस उपाय नाहीं. पहिलेपासून जसा फौजेचा बंदोबस्त तुमचे जिमेस आहे, तसाच आळा फौजेचा ठेवून सरकारांत लक्ष ठेवणें. तुमचे विषयींची खातरजमा सरकारांत नवी करावी लागत नाही. पहिलेच तीर्थरूप आबासाहेबांची सेवा तुम्हीं केली. त्याजवरून अभयपत्र करून दिले आहे. व या दौलतीचे जाग्याचे विभागी तुम्ही आहांत. तेव्हां आहे हाच बंदोबस्त, तुमचा चालण्यांत कमती होणार नाही. मागाहून राजश्री यशवंतराव भवानी शंकर व नथु भोंसला याजला रवाना करितों. हे व तुम्ही एक विचारें त्या प्रांताचा बंदोबस्त ठेवणें. जाणिजे. चंद्र १ माहे जिल्काद बहुत काय लिहिणें.

---

१ तंटा

२. हिच्या मनांत दत्तक घेणें होतें.

**छत्तीसगडाचा बंदोबस्त** :—याप्रमाणें खातरतसलीचें लिहून पाठविलें व मागाहून नथु भोंसले पाठविले. त्याचे मागून यशवंतराव भवानी शंकर फौज देऊन रवाना केले. ते तेथें छत्तीसगडास पोंहोचून आनंदीबाईसाहेबाचा व यशवंतराव भाऊ यांचा मजीना उभा राहून लढाई होईपर्यंत ठरलें. ते प्रसंगीं महिपतराव काशी व कृष्णंभट उपाध्ये यांणीं आनंदीबाईचे व भाऊ मशारनिल्हेची सफाई करून दिली. तमाम तिकडील जमीदार लोक वगैरेंचें सर्वत्रांचें लक्ष महिपतराव काशी यांजकडेस होतें आणि यशवंतराव भवानी शंकर याजला खर्चाची ओढ, फौजेंत अडचण भारी, यास्तव महिपतराव काशी याणी सर्व प्रकारें त्यांची सरभराई करून लक्ष सेनासाहेबांकडेस ठेविलें, व यशवंतराव भाऊ यांजला सेनासाहेबासमागमें पुण्यास नेण्याचा विचार करून बोलावूं पाठविलें. ते इकडेस आले. आणि महिपतराव काशी याजला लिहून पाठविलें जे, "तुम्ही आपले फौजेचा बंदोबस्त ठेवून असावें. मागाहून महिपतराव दिनकर यांची रवानगी फौजेसुद्धां करण्यांत येत आहे. तरी तुम्ही त्यांचे हामराहीत राहून तिकडील त्या प्रांताचा बंदोबस्त करणें." असें होऊन महिपतराव दिनकर छत्तीसगडास रवाना झाले. तेव्हां यशवंत भाऊ याजकडील हामराईची फौज व जरीलगी* महिपतराव याचे स्वाधीन करून यशवंतराव भाऊ सडे नागपुरास आले.

नागपुरचा बंदोबस्त चिमाबाईसाहेब व चिमणाबापू सेनाधुरंधर व व्यंकोजी भोंसले ऊर्फ नानासाहेब व भवानी काळू व बाळाजी काळीकर मुलकी बंदोबस्ताकरितां ठेवून आपण सेनासाहेब पुण्यास गेले. तेथें सर्वत्रांच्या भेटी पंतप्रधान माधवराव नारायण पेशवे, कारभारी नाना फडणवीस आदिकरून यांच्या भेटी होऊन, प्रेम संपादून येऊं लागले. ते वेळेस सेनाधुरंधरीचें पद व्यंकोजी भोंसले ऊर्फ नानासाहेब धाकटे बंधु यांचीं नांवें नाना फडणवीस यांच्या विचारें मुकरर होऊन पदाचीं वस्त्रें बहुमान जवाहीरसुद्धां घेऊन, पंतप्रधान याशीं सख्यत्व राखून निरोप दिला.

ते वेळेस खर्चाची अडचण याजकरितां हरिपंतांचे विद्यमानें आनंदराव धोंडीराज कोठेकर यांचा संदर्प आला कीं, गंगाथडीचा सुभा सांगावा. याज-

---

* जरीचें निशाण.

वरून माहदाजी[१] बल्लाळ लष्करी यांचे हातें रसद कोठेकर यांणीं सेनासाहेबांस लाख रुपये देऊन सुभा सांगावा, असा निश्चय ठरविला. नंतर सेनासाहेब रसदीचे सुमारें नागपुरास आले. व मागाहून आनंदराव धुंडीराज कोठेकर याजला वस्त्रें देऊन गंगथडीचे सुभ्याचें काम सांगून बंदोबस्तास पाठविलें.

**चिमणाबापूचा मृत्यू** १६–८–१७८९:—नंतर नागपुरास पोंहचल्यावर चिमाबाईसाहेब वगैरेंच्या भेटी झाल्या. नंतर सेनाधुरंधरीचे पदाची वस्त्रें पुण्याहून आणली होती तीं मजलस करून व्यंकोजी भोंसले यांजला दिलीं. नंतर पेशजी माघ वैशाखमासीं झिंगाबाई वहिण सेनासाहेबांची यांचा काळ जाहला होता सबब मातोश्री चिमाबाईसाहेब फार दुःखित होत्या. यास्तव पुण्याहून मातोश्रीचें समाधान केलें. पुढें सन ११९९ चे सालीं श्रावण मासीं खंडोजी भोंसले ऊर्फ चिमणाबापू सेनाबहाद्दर यांजला अकस्मात् देवाज्ञा झाली. हें मोठें दुःख झालें. मातोश्री साहेबांस शोक फार जाहला. त्यांचें समाधान कांही केल्यानें होईना. त्या दुःखांत वर्ष गुजरलें. तशांत सिंहस्ताचें साल, मातोश्रीसाहेबांस घेऊन सेनासाहेब गंगेस गेले. व छत्तीसगडाहून महिपतराव दिनकर यांजला मातोश्रीचें समाधान करण्याकरितां बोलाविलें. तेही गंगेवरच आले. व राजाराम मुकुंद कटकचे सुभे हेही सेनासाहेबांचे भेटीस कटकाहून आले. नंतर गंगेहून चैत्रमासीं सेनासाहेबांची स्त्री नागपुरास येऊं लागली. तशांत प्राचीन कारभारी भवानीपंत मुनसी यांचा काळ नागपुरीं जाहला, हें वर्तमान मार्गांत समजलें. त्यांचे भाऊ श्रीधर लक्ष्मण समागमें होते त्यांचें समाधान करून कृष्णराव माधव चिटणवीस व यांणीं मिळून कारभार करावा, दिवाण उभयतांनी हा निश्चय ठरविला. नागपुरांत येऊन दाखल झाले. तों सेनासाहेब यांची स्त्री वडील गजराबाई निवर्तली. त्यांचा विधि झाल्यावर पुढें राजाराम मुकुंद याची रवानगी कटक प्रांतीं केली. तसेंच महिपतराव दिनकर यांची रवानगी छत्तीसगडासि ठरली असतां शिपाई लोकांनीं दंगा करून, महिपतराव याजवर देवडी पुढें तलवार चालविली. सुभेदार जखमी झाले. सरकार वाड्यांत जाऊन जखमा शेकल्या. नंतर त्यांचे घरीं पोंहचविलें.

---

१. ऋग्वेदी ब्राह्मण. वणीचे राहणार. यांजविषयीं उल्लेख मागें वारंवार आला आहे.

इतक्यांत छत्तीसगडांत जमेदार फंद होऊन बयदा[1] जाहला. याजकरितां सेनासाहेबांनीं महिपतराव काशी याजला लिहून पाठविलें कीं, महिपतराव दिनकर यांची रवानगी करावी. ते मशारनिल्हे जखमी झाले यास्तव तुम्हीच आपले जमावानिशी संबलपूर प्रांती जाऊन जमेदाराचें पारिपत्य करावें व ठाणें बसवून लिहून पाठवावें. याजवरून त्यांनीं आपले जमावानिशीं संबलपुरास जाऊन शकटभेद करून त्या प्रांती जरब बसवून संबलपूरचें ठाणें घेतलें. आणि अंमल बसवून रतनपुरास आले. पाठीमागें पुनः संबलपूरचा किल्ला बदलून बयिदा जाहला. इतक्यांत महिपतराव सुभेदारास आराम जाहला. तेव्हां सेनासाहेबांनीं यांची रवानगी छत्तीसगडास केली. हे रायपुरास पोहोंचले. तों रतनपुराहून महिपतराव काशी यांनी आपली जमीयत सारंगगडाचे मार्गे संबलपुराकडेस रवाना करून आपण सडे रायपुरास महिपतराव दिनकर यांचे भेटीस आले. उभयतां एकत्र होऊन पुढें संबलपुरास जाऊन मोर्चे बसविले. चार महिने मोर्चे राहून शेवटी हल्ला करण्याचा निश्चय झाला. ते दिवशी महिपतराव सुभेदार व महिपतराव काशी असे मिळोन महिपतराव काशी यांचे मोर्च्यावर येऊन तोफा किल्ल्यास लाविल्या. कील पाडून हल्ला करावा, तों इतक्यांत महिपतराव काशी याजला किल्यावरील गोळी लागली. जखमी होऊन काळ जाहला. हें वर्तमान सेनासाहेब यांनीं ऐकून फार हळहळ केली आणि त्यांचे चिरंजीव सखाराम महिपत यांचे नांवें खात्रीचें पत्र व पहिलेपासून तीन गांव तीन हजारांचे घरबेगमीस मोकासा चालत होते ते कायम करून दिल्हे. नंतर सुभेदारांनी विचार ठरविला कीं, पुढें बरसातीचें मोसम, महानदी पार छावणी करून राहण्यास सल्ला नाही. बरसातींत रसद पोंहचणें कठिण पडेल. यास्तव फौजेसहित कूच करून बिलक्याचे मुक्कामास येऊन पोंहोचले. तों गोसावी लोक माल मोती वगैरे नरमिना[2] घेऊन बिलक्याचे गढींत राहिले होते. ते दिवशीं फौजेचा मुक्काम बिलक्याचे नजीक आला. तों ठाणेवाले जमीदार यांनीं गोसावी लोक यांचे हाती गोळ्या फौजेवर टाकविल्या आणि सांगून पाठविलें कीं, किल्ल्याचे पलीकडे तफावतीनें मुक्काम करावा. यावरून सुभेदारास राग

---

१. बखेडा. २. रेशमी माल.

येऊन हल्ला करविला. ते वेळेस बहुतेक भले माणसें निंबाजी सिवदेव वगैरे जायां जखमी ठार कामास आले. तेव्हां गढींतील चार भली माणसें येऊन यांची समजूत काढली, आणि दुसरे दिवशीं फौजेचें कूच करून रायपूरचे मुक्कामास आले.

नंतर सेनासाहेब यांचे मनांत महिपतराव दिनकर याजविषयीं विकृति आली. कारण कीं, नागपुराहून छत्तीसगडास रवाना करते वेळेस, शहरचे बाहेर मुक्कामास राहिले होते. तेथें महिपतराव दिनकर व सेनाधुरंधर व्यंकाजी भोंसले नानासाहेब यांचा एकांत दोन तीन दिवस घरकृत्य प्रकरणाचा जाहला होता. याजवरून सेनासाहेब यांनीं कुन्हा पोटांत आणून महिपतराव याजला रायपुराहून नागपुरास बोलाविलें व विठ्ठल* दिनकर याजकडे सुभा सांगून रवाना केलें.

**फॉर्स्टरची वकिली** इ. स. १७८८ व इ. स. १७९०:—तों इकडे कर्नाटक प्रांती टिपू याजवर लाटसाहेब व मेडोसाहेब यांनीं स्वारी करून मोहीम केली, त्यांनी आपले मदतीस पंतप्रधान यांची व नबाब बंदेगान अल्ली यांची फौज बोलाविली. तशांत कलकत्त्याहून लाटसाहेब बाहदुराकडून मिस्तर फारेस्तरसाहेब* बहादूर सेनासाहेबांकडे आले आणि बोलण्यांत आणिलें कीं पंतप्रधानाच्या व नबाब बंदेगान अल्लीच्या फौजा आमचे पलटणीचे मदतीस येतात, त्यांजबरोबर तुम्हांकडील फौज येईलच. त्यास आम्हांकडील मदत कटकचे मार्गानीं कर्नाटक प्रांती कलकत्त्याहून जात आहे त्यास राजाराम मुकुंद आपलेकडील कटकचे सुभेदार हरएक गोष्टीविषयीं खिसेबखेडे करून मार्गास खलेल करितात; त्यांजकरितां यांजला निखालसपणें ताकीद व्हावी." याजवरून सेनासाहेब यांणी स्नेहावर लक्ष देऊन राजाराम मुकुंद याजला सदर ताकीद करून दिली. व मिस्तर फारेस्टरसाहेब बहादूर तेथेंच कांहीं एक

---

१. विठ्ठल दिवाकर असें इंग्रजी ग्रंथांत आहे. बिबाजीची बायको आनंदीबाई हिच्याकडे रायपूरची व्यवस्था पतिमरणोत्तर सुमारें एक वर्ष होती. नंतर विठ्ठलपंत सुभेदार गेला. 'परगणा हिशोब' ठेवण्याची चाल यानें सुरू केली असें म्हणतात.

* Forster

दिवस होते तों त्यांचा काल[१] जाहला. त्यांजबरोबर जे साहेब लोक होते त्यांची रवानगी सेनासाहेबांनीं करून दिली.

सेनासाहेब भोंसले यांजकडेस पंतप्रधान यांजकडील कारभारी यांणीं लिहून सेनासाहेब सुभा यांची फौज बोलावली. याजवरून बळवंतराव* भवानी शंकर यांची रवानगी कर्नाटक प्रांतीं केली. हरिपंत फडके पंत-प्रधानाकडील व नबाबाकडील फौज अशी आघाडी जाऊन पोंचली. मागाहून बळवंतराव भवानी पांच हजार फौजेनिशीं पुण्याचे मुक्कामी जाऊन तेथें पंतप्रधानाकडील खजीना घेऊन गेले. तों तिकडेस कलबाग पटणेपर्यंत फौजा पोहचून कलबाग घेण्यांत आला. इंग्रज बहादुराची जहामर्दी भारी, टिपू जेर केला, ते वेळेस मेडोसाहेब बहादुर कामास आले. तेव्हां हरिपंत यांचे विद्यमानें तह ठरला. तीन कोट रुपये व कांही मुलूख घेण्यांत आला. नंतर कूच होऊन माघारे फिरले. तों इकडून बळवंतराव भवानी शंकर सरकारी खजिन्यासहित तुंगभद्रेचे पलीकडे पोंहचले. तसेंच माघारे फिरून पंत-प्रधानाकडील फौजा हरिपंत आदिकरून बळवंतराव भवानी नागपुरास आले.

नंतर सन १२०१ चे साली[२] श्रीकाशीस सेनासाहेब यांनीं आपली मातोश्री चिमाबाईसाहेब व व्यंकोजी मन्याबापू ऊर्फ नानासाहेब व परसोजी भोंसले बाळराजा ऊर्फ बाबासाहेब व गुज्याबा दादा गुजर यांजला त्र्यस्थळी[३] यात्रा करावयासाठीं पाठविले. ते काशीस[४] पोंहचले. इंग्रज बहादुरांची व सेनासाहेबांची हरदो तर्फेची दोस्ती भारी, तेव्हां कोणतेही गोष्टीचा उपसर्ग न लागतां, मेजवानी भाऊपणें ( झाली. ) भोंसल्याकडील वकील विश्वंभर पंत व वेणीरामपंत यांजवर इंग्रज बहादुराचा लोभ अत्यंत असतां श्री काशी शहरांत ठग भारी. तेथील दलाल यांनी काळ्यांचे[५] येथून मोहरा आणिल्या

१. फार्स्टर वकील हा सन १७९१ चे जानेवारी महिन्यांत नागपुरास निवर्तला. (ना. इ पा. २८३)

* काळू २. 'सन १२०० फसली'. ( उ ) बखर.

३. काशी, प्रयाग आणि गया या तीन स्थळांस त्रिस्थळी म्हणतात. मुधोजीच्या गयावर्जनासाठीं ही मंडळी गेली.

४. काशीस जातांना मार्गात रेवाचे राजानें मेजवानी दिली. काशी-यात्रा करून सन १२०१ फसलींत परत आले. ( ई ) बखर.

५. माधोजी नाईक काळे. यांचें काशीस मुख्य दुकान होतें. ( सं. )

असतां, दलालांनीं मध्यंतरीं दगाबाजी करून तांब्याच्या मोहरा आंत घातल्या व त्याच्या बदला चांगल्या मोहरा काढून घेतल्या. नानासाहेबांनीं व बाईसाहेबांनी पाहून त्या दलालावर रागरोष केला. परंतु स्थळ थोर म्हणून मर्यादा केली. त्यांत इंग्रज बहादुरांची दोस्ती, तेव्हां यांचे रयतेवर सक्ती करणें दुरुस्त नाही. हें समजून क्षमा केली.

**व्यंकोजींची काशीयात्रा**:—परंतु सेनाधुरंधर नानासाहेब यांजपाशी मुसाहेब[१] व्यंकोजी नाईक पिदडी ते समयीं होते. त्यांनी विचार न पाहतां, दलाल मजकूर याजला नाना प्रकारें विपत्ति करून मारिलें. व त्याजला उंटाचे पायी बांधून शहरांत फिरवावें हा विचार केला. तेव्हां त्यांचे ज्ञातीनें एकच हाहाकार केला. तेव्हां इंग्रज बहादूर यांची व सेनासाहेब यांची दोस्ती गालीफ[२], तेव्हां इंग्रज बहादूर यांनी वेणीराम[३] व विश्वंभरपंत[३] वकील यांजला बोलावून सांगितले की, " दलाल मजकूर यांस मारिलें. असो. त्यांनीं कर्म केलें त्याची शिक्षा होऊन चुकली. परंतु उंटाचे पायी न बांधावें." इकडे पिदडीचा आक्षेप भारी पाहून वकील मजकूर यांनी पिदडीस निषेध करून मुर्दा दलालाचे जातीचे स्वाधीन करून दिल्हा. अशी दोस्ती[४] अवीट मर्जी राखून यात्रा करून मातोश्रीसाहेब व नानासाहेबसुद्धा मेजवानी करून, दोन कोशपर्यंत इंग्रज[५] बहादूर पोंचविण्यास येऊन सर्व प्रकारें प्रेमच केला. याप्रमाणें यात्रा त्रयस्थळीची व अयोध्या आदिकरून आले. नागपुरास बरसातीत श्रावण भाद्रपद मासी सन १२०२ चे साली[६] दाखल झाले. येतांना नर्मदातीरास तीन वार घाटीं मुक्काम केला. तों नर्मदेस पूर अति उत्कट आला. यात्रा नदीचे थडीवर पाण्याच्या पुराची हद्द चुकवून उतरली असतां,

१. मुसाहिब—सोबती, जोडीदार.

२. फार.

३. विश्वंभर शिवभद्र आणि वेणीराम शिवभद्र हे बंधु.

४. काशीचे इंग्रज अधिकाऱ्यानें या प्रकरणाबद्दल रघोजीस खरमरीत पत्र लिहिलें होतें. (सं.)

५. हा त्या वेळचा वागणुकीचा प्रकार ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. चिमाबाईचा मानमरातब ठेवून योग्य बंदोबस्त असावा या अर्थाचा खलिता रघोजीनें इंग्रजास पाठविला होता.

६. ( उ ) व ( ई ) बखरींत १२०१ सन दिला आहे.

पाणी तेथपर्यंत येऊन यात्रेस उपसर्ग केला. हें वर्तमान श्रीमंतास समजल्यावरून तेच स्वार होऊन सामोरे गेले. तों लाखणादौणाचे मुक्कामी भेटी होऊन नागपुरास आले. संतोष सेनासाहेबांस जाहला. राजाराम मुकुंद ओडिसा प्रांतीं कटक संस्थानीं त्या प्रांतांचा बंदोबस्त ठेवून होते. त्यांचा काळ त्याच संधीस तिकडे झाला.

याच सालांत महादाजी शिंदे हिंदुस्थानांतून पुणें प्रांतीं येण्याचा विचार जाहला; कारण सवाई माधवराव पंतप्रधान यांचे दौलतीचा बंदोबस्त झाल्यावर हिंदुस्थानांत गेले. हिंदुस्थानचा बंदोबस्त करीत दिल्लीस चालले. तिकडील बंदोबस्त केला आणि जयनगरावर गेले. तेथें हिंदुस्थानी लोकांनी फंद करून दगाबाजी केली. तेव्हां पुन: शिंदे यांनी जमियत करून अवघ्र बंदोबस्त केला. हिंदुस्थान काबीज करून शाहा[१] आलम बादशाहा कायम केले. व दिल्लीस मुतालकी बादशहाची आपण केली, खिलत घेऊन प्रताप भारी जाहला.

ते समयी बाबूराव वकील नबाब बंदेगान अल्ली यांजकडील तेथें होते. त्यांनी महादाजी शिंदे यांचा प्रेम संपादिला. नबाबाचे जनाने वगैरे दिल्लीत होते ते जनानखाने हैदराबादेस आणिले पाहिजेत याजकरितां शिंदे यांजपाशीं बाबूराव यानें प्रेमयुक्त भाषणें करून, खर्चास घेऊन जनानखान्याची रवानगी हैदराबादेस दक्षिणेंत केली. व बाबूराव महादाजी शिंदे त्यांजपाशीं वकीलीस राहिले. याजवरून नबाबाचे दोस्तीचा प्रकार शिंदे याजपाशीं दिवसेंदिवस वृद्धिगत होऊं लागला. हें सर्वांस समजलें. व शिंदे यांनी हिंदुस्थानांत लौकिक मिळवून पातशाई मुतालकची खिलत व नालखी पातशाहापासून घेऊन दक्षिणेंत येण्याची तयारी केली.

तों नबाब बंदेगान अल्ली यांचे कारभारी मशीरउल्मुल्क[२] अझीमउल उमराव यांणींही संधान अंतरंगीं बाबूराव यांचे विद्यमानें शिंदे यांजकडे केलें

१. शाहाआलम यास कायम कसें केलें हें पेशव्यांच्या बखरीत दिले आहे. पेशवे-बखर पृ. १५२–५३ पाहा. सनदा पेशव्याचे नांवानें घेतल्या होत्या.

२. हा सन १८०४ मध्यें निवर्तला. हा १७८३ मध्यें निजामाच्या प्रधान मंडळांत शिरला. शिकंदरशहाबरोबर १७९१ त टिपूवर स्वारी झाली तेव्हां हा गेला होता.

कीं, "तुम्ही हिंदुस्थान प्रांतीं लौकिक मिळवून पातशाई वजीरात मिळविली आहे, तेव्हां तुमचा व आमचा शिलशिला एक जाहला. आतां दक्षिणेंत तुम्हीं यावें; नाना फडणवीस यांनीं सर्व आपले अंगीं वैभव आणिलें, सर्व दौलतीचा कारभार आटोपून आहेत. त्यांचें पारपत्य करणें जरूर आहे. यांतून तुम्हांसही फायदा आहे. हेंही राज्यकारण शिंदे यांणीं अंतस्थ लाऊन ठेविलें, आणि पुणें प्रांतीं फौजेसहित येण्याचा मनसुबा करून दर कूच निघाले.

ते माळवे प्रांतांतून नागपूरचे सरहद्दींतून जावें हा विचार दिल्लीहून निघते समयीं केला. हें वर्तमान सेनासाहेबांस समजल्यावरून आपले ठिकाणीं विचार पाहिला कीं, शिंदे याजपाशीं फौजेचा जमाव भारी व दिल्लीहून मोठा पराक्रम करून आले आहेत. त्यापेक्षां आपले मुलखांतून त्यांची फौज गेली असतां, प्रांताचा खराबा होईल हें चांगलें नाहीं व पुढें पुण्यास जातात. यांचा भावगर्भ काय आहे तोही समजला पाहिजे. याजकरितां कोणी गृहस्थ संभावित त्यांचे मिळणींतील व त्यांचे पेशजीचे माहितगार असा योजून, पाठवावा कीं, त्या फौजेचें येणें आपले प्रांतांतून न होय. व शिंदेबहादूर यांजला वैगुण्य न वाटे. यास्तव व्यंकटराव काशी यांस नेमस्तें करून पाठविलें. हे जाऊन शिंदे यांजपाशीं पोंहचले. भेटी होऊन बोलणीं बहुत प्रकारें जाहलीं. त्यांत महादजी शिंदे यांचे बोलणें पडलें कीं, "मुधोजी भोंसले यांचा व आमचा स्नेह घरोबा पहिलेपासून आहे हें तुम्हांस माहितच आहे, व सेनासाहेबांचा तसाच चालावा, यापेक्षां आमचे चित्तांत आहे कीं, नागपुरास येऊन मातोश्री चिमाबाईसाहेबांची भेट घ्यावी व सेनासाहेबांचीही भेट घेऊं." तेव्हां व्यंकट-राव काशी यांनीं बोलण्यांत आणिलें कीं, "सेनासाहेबांचा व आपला घरोबा व ऋणानुबंध पहिलेपासून चालत आलेला आहे तेव्हां भेट घेणें अवश्य आहेच; परंतु सांप्रत आपलें दिल्लींतून व हिंदुस्थानांतून पराक्रम करून येणें झालें आहे, त्यापेक्षां बऱ्हाणपुराहून पुढें चालून पुण्यास जाऊन पंतप्रधान यांची भेट घ्यावी. आपले मनोदयानुरूप सेनासाहेबही अनुकूल होतील व कित्येक राज्यकारणी विचार कर्तव्यतेचे आहेत तेही ध्यानांत येतील व जमियत त्वरित करणें आहे तिजला लांबणीवर टाकणें बरोबर नाहीं." याजवरून शिंदे बहादूर यांचे मर्जीचा खुलासा होऊन बोलले कीं, "आम्ही तुळजापूर व पंढरपूरचे मार्गें जाण्याचा बेत केला आहे. तुम्हीही सेनासाहेबांकडे जाऊन उभयपक्षीं स्नेहाचा

विचार परस्परें एकमेकांकडे लक्ष ठेवून, बळकटी असावी, येविषयींचे पर्याय निश्चयांत आणावे." याजवरून व्यंकटराव काशीस बहुमान वस्त्रें देऊन निरोप दिला. ते नागपुरास येऊन सेनासाहेब यांची भेट घेऊन, सविस्तर शिंदे यांचे बोलण्यांतील भाव समजला. व बाबूराव, बंदेगान अल्ली नबाबांकडील वकील शिंदे यांजपाशीं होते त्यांचे व शिंदे यांचे बोलण्यांतील विचार अंतरंगीं झाले ते बातमीचे द्वारें समजले होते म्हणून तेही अवग्र निवेदन केले. हें सर्व ऐकून सेनासाहेब बहुत संतोष पावले. या प्रसंगीं ही मसलत बहुत चांगली झाली. शिंद्यांचें प्रस्थ मोठेंच वाढलें. त्यांचे विचाराखेरीज पंतप्रधान यांचें राज्यकारण होण्यास दिकत पडेल तेव्हां त्याजपाशीं नेहमीं वकिलीस चांगला शहाणा माणूस असावा हें समजोन व्यंकटराव काशी यांची रवानगी मागाहून केली. ते शिंदे बहादूर तुळजापूरचे आलीकडेस मुक्कामीं होते तेथें मशारनिल्हे जाऊन पोंहचावे.

इकडेस नबाब बंदेगान अल्ली हैदराबादेस आहेत. यांजकडेस कोणी पाठवून तेथीलही भावगर्भ मनास आणावा याजकरितां शहाणा मनुष्य पोक्त पाठवावा. याजवरून रामचंद्र[1] दादो हे भाई सलाबतखान अलजपूरवाले यांजकडून वकिलीस सेनासाहेबांजवळ होते. त्यांजला हैदराबादेस आपले तर्फेनें पाठविलें. हे तेथें जाऊन तिकडील भावगर्भ अवग्र मनास आणन माघारे नागपुरास आले. तेव्हां नबाबाजवळ कोणी आपले तर्फेनें असावा हें सेनासाहेबांनीं मनांत आणून केशवराव[2] रामचंद्र यांजला नेमस्तें करून, वकिलीचे कामीं पाठविलें.

तशांत महादजी शिंदे पुण्यास जाऊन पंतप्रधान यांच्या व नाना फडणवीस आदिकरून सर्वत्रांच्या भेटी शिरस्त्याप्रमाणें होऊन रहस्याची[3] बोलणीं जहालीं. पादशाही खिलत आणि नालकी शिंदे यांणीं आणिली होती त्याचा समारंभ करून माधवराव नारायण पंतप्रधान यांस सन्मानांनीं आपले लष्करांतून नालकींत बसवून सरकार वाड्यांत पावतें केलें व त्याप्रमाणें दुसरे दिवशीं

---

१. हे पुढें प्रसिद्धीस आलेले यशवंतराव रामचंद्र यांचे वडील.

२. रामचंद्र दादोचे पुत्र यांस तीन पुत्र होते. यशवंतराव, केशवराव आणि माधवराव.

३. पेशव्यांची बखर पृ. १६६–६७ पाहा.

पंतप्रधान यांनीं दुसरे नालकींत[१] महादजी शिंदे यांजला बसवून त्यांचे लष्करांत रवाना केलें. पुढें अखेरसालीं छावणी पुणें मुक्कामी शिंदे यांनीं केली.

कांहीं एक दिवसांनी माधवरावसाहेब पंतप्रधान यांस व महादजी शिंदे या उभयतांचें खलबत निराळें होत असावें असें होऊं लागलें. याजवरून नाना फडणवीस यांजला असह्य झालें व सचिवांचे[२] वरून शिंदे यांचे मनांत वैषम्य नानाविषयीं येऊन एके दिवशी भर मजलशींत नाना फडणवीस यांची शिंदे मशारनिल्हेनी निर्भत्सना करून बोलूं लागले. याजवरून नानाला विषाद येऊन दुसरे दिवशी शिंद्यापाशीं बोलण्याचा मुद्दा टाकिला की, "आम्हांस महायात्रेस जाण्याकरितां निरोप द्यावा काशीस जाण्याची तयारी केली." याजवरून हरिपंत यांणी शिंदे यांचे घरी जाऊन बोलण्यांत आणिलें की, "नानांचा व आमचा विचार किती आहे, आजवर आम्ही दौलतीत वागलो. व दौलत रक्षिली. आतां तुमचे मनांत असें आले आहे. तेव्हां सुखरूप दौलती करावी आम्हांस त्याचा संतोष आहे. परंतु नबाब बंदेगान अल्ली यांचा कारभारी मशरीन मुलुक यांणी दौलताबाद वगैरे पासष्ट लक्षांचा मुलूख आटोपिला आहे आणि फौजेची तयारी करून आपले जागीं हुषारीत आहे की, हिंदु लोकांनीं वजिरी केली व खिलता वगैरे नालक्या घेऊन आले तेव्हां त्यांचे पारपत्य करून यावनी करावी. हें मनांत आणून एकोपा उभा केला आहे. बादबरसात पाहून घेऊं अशी योजना करून आहेत. त्यांस हेंही आम्हांस चांगलें झालें कीं, आमचे देखत कोणते एक उणें दिसू नये." असे नाना प्रकारच्या मसलतीच्या अडचणीचे शिंद्यापाशी डौल बोलून महायात्रेस जाण्याचा प्रकार बोलण्यावरून महादजी शिंदे दूरदर्शी सल्ला पाहून स्तब्ध जाहले आणि समेटीचे डौलाखालीं बोलूं लागले. त्याच बैठकींत नानांची व शिंद्यांची सफाई हरिपंतानीं केली. त्यांतील खुलासा मशरील मुलूख यांस न समजतां तो तिकडे तयारींतच होता कीं भोंसले सेनासाहेब सुभा यांजला तरी आपल्यांत मिळवून घेतां येईल. पंतप्रधान पाहतां लेंकरू नानांचा मगदूर किती ? व शिंद्यांशीं आपलें संधान पहिलें पक्केंच आहे. तेव्हां ह्या दौलती आटोपणें अवघड काय आहे?

**महादजी शिंद्यांचा मृत्यु**:—असा प्रकार नबाबाचे येथें असतां,

१. या समारंभाचें वर्णन पेशव्यांच्या बखरींत आहे. पृ. १६०–५.
२. धाकटे शाहू राजे यांचें चरित्र पृ. ५८–९ पाहा.

नानांची व शिंद्यांची हरिपंतांनी निखालसता करविली. इतक्यांत महादजी शिंदे यांशीं देवाज्ञा सन १२०२ चे पुणें मुक्कामी वानवडीस[१] जाहली. त्यांचे ठायीं नानाफडनवीस यांनीं दौलतराव[२] शिंदे यांजला स्थापित केलें.

मशरीन मुलुक यांनीं पुण्यावर जाण्याची तयारी सन १२०३ चे सालीं केली. तेव्हां नाना फडनवीस यांनी पंतप्रधानाचे स्वराज्यांतील बंदोबस्त राखून तमाम सरदार मनसबदार यांजला एकत्र करण्याविषयीं पत्रें पाठविलीं ते समयीं रघूजी भोंसले सेनासाहेब सुभा यांजकडेसही याच प्रकरणी लिहिलें आहे. याजवरून श्रीधर लक्ष्मण मुनशी व कृष्णराव माधव चिटणीस यांजला सेनासाहेबांनीं पुण्यास रवाना केलें. त्यापूर्वी रामचंद्र दादो हैदराबादेहून जाऊन आले होते. यांजलाही उभयतांचे बरोबर दूरंदेश* काबील पाहून योजिले. यांसहित उभयतां कारभारी दिवाण पुणें मुक्कामीं जाऊन पोंहचले. पंतप्रधान यांची व नानाफडनवीस यांच्या भेटी होऊन राजकारणी उद्घाटणें जालीं. ते समयीं उभयतां कारभारी यांनी उत्तर केलें कीं, स्वराज्यांतील पासष्ट लक्षांचा मुलूख नबाबापासून सोडविणें आपल्यास प्राप्त आहे. त्यांत आमचेही गंगथडी वगैरे येथील पूर्ववत प्रमाणें खंडणी मिळोन निर्मळ, एदलाबाद, या जिल्ह्यांतून अंमल कलबुर्ग्यापर्यंत पूर्ववत् चालावा ही निखालसता ऐकून, नानाफडनवीस बहुत संतोष पावून, सेनासाहेबांस फौजेसुद्धां बोलवावें, हा निश्चय ठरवून, कृष्णराव माधव चिटणीस यांजला नानांनी आपले जवळ ठेविलें, आणि नंतर श्रीधर लक्ष्मण मुनशी व बाबूराव वैद्य हे नागपुरास सेनासाहेब यांजकडेस रवाना केले. ते नागपुरांत येऊन अवग्र मजकुराची विनंति सेनासाहेबांस केली. त्यांत मुनशी यांणीं

---

१. शके १७१५ प्रमादीनाम संवस्सर माघ वद्य त्रयोदशीस वारले. धाकटे शाहूराजे यांचें चरित्र पृ. ५९ पहा. पेशव्यांच्या शकावलींत 'माघ शुद्ध १३ बुधवार' आणि पेशव्यांचे बखरींत भाद्रपद मास असा मरणमितीचा उल्लेख आहे. माधवरावास फार दुःख झालें.

२. दौलतराव हा महादजीचा भाऊ तुकोजी याचा पौत्र. हा तुळजापुरास गेला होता तो आल्यानंतर त्यास वस्त्रें मिळालीं. पेशव्यांची बखर पृ. १७५ पहा.

* दूरदर्शी.

आपल्या कर्तव्यतेच्या उत्कर्षाचा भाव सुचविला. परंतु सेनासाहेब कृष्णराव माधव चिटणीस यांचे लगामीं राजकारणी वाकफगारी पेशजीची याजला; यास्तव त्यांचे बंधू गंगाधरराव माधव चिटनवीस व मुतालिक आपाजी सखाराम व त्यांचे हस्तक नारायण यशवंत असे, सेनासाहेबांजवळ वागणुकींत. यांखेरीज पाऊल पडावें असें नव्हतें. ते प्रसंगीं उत्कर्षाचा विचार ऐकून आपाजी सखाराम यांनीं सेनासाहेबांस विनंति केली कीं, राजकारणी विषय तो मुनशी व वैद्य मशारनिल्हे बोलत आहेत, परंतु आपले मतलब प्रकरणीं नानाफडनवीस यांचा दस्तऐवज असावा. यांजविषयीं कृष्णराव माधव चिटनवीस यांचें उत्तर आल्यावर फौजेसुद्धां जाण्याची सल्हा करावी. तेव्हां मुनशीजी व बाबूराव वैद्य यांजला आज बसून पुन: पत्रें कृष्णराव माधव यांजकडे जाऊन उत्तर आलें. तेव्हां सेनासाहेब फौजेसुद्धां कूच करून निघाले. ते समयीं नानाफडनवीस यांस पुरतें समजलें कीं, सेनासाहेब चिटनवीस यांचे स्वाधीन आहेत. याजवरून कृष्णराव माधव यांजवर नानांचा लोभ विशेष जाहला.

तसेंच फौजेसहित सेनासाहेब व व्यंकोजी भोंसले सेनाधुरंधर व चिरंजीव परसोजी भोंसले ऊर्फ बाबासाहेब व मातोश्री चिमाबाई साहेब सुद्धां वऱ्हाडांत पोंहचले. गाविलगडाचा आदिकरून बंदोबस्त राखून मातोश्री चिमाबाईसाहेब व सेनाधुरंधर व बाबासाहेब यांजपाशीं भवानी काळू यांजला ठेवून नागपुरास रवाना केलें. आपण सेनासाहेब पुढें पुण्यास चालले. समागमें सरदार मंडळी विठल बल्लाळ सुभेदार यांजला जरीपटका देऊन, मानकरी मंडळी तमाम त्यांचे तैनातीस केलें. व कंपूसहित वेणीराम सुखराम सुभेदार व सखाराम अवधूत एकांडे मंडळी रिसाला त्यांचे जिमेस, महमद अमीरखां छपारवाले व साबतखान यांचा जमाव वगैरे, रघुनाथराव बाजी घाटगे हेही आपले पतकासहित, याशिवाय पाटणकर, निंबाळकर, राणे, यादव वगैरे जमावासुद्धां पांडुरंग गणेश बक्षी व गंगाधरराव माधव चिटणवीस व अपाजी सखाराम व नारायण यशवंत व बाळाजी नारायण जामदार व सिलेखानेवाले याप्रमाणें समागमें घेऊन सेनासाहेब गंगेपर्यंत गेले.

तेथून आपण सडे होऊन आघाडीस जाते समयीं लक्ष्मणराव काशी याजला भोपाळास रवाना करून नंतर दर कूच सडे जाऊन पंतप्रधानाजवळ

दाखल झाले. फौजही मागाहून पांडुरंग गणेश बक्षी व विठ्ठलपंत सुभेदार आदिकरून पोंहोचले.

पंतप्रधानांच्या व सेनासाहेबांच्या भेटी होऊन प्रेमयुक्त भाषणें झालीं. नंतर नाना फडनवीस यांनीं पंतप्रधानाच्या फौजेसहित कूच करण्याचा विचार केला. मुख्य माधवराव नारायण पंतप्रधान, समागमें सरदार मंडळी तुकोजी होळकर, दौलतराव शिंदे, व बाबा फडके हुजुरातीसहित व परशराम भाऊ मिरजकर व आपा बळवंत व विठ्ठल शिवदेव, रास्ते वगैरे सरदार, व सेनासाहेब फौजेसहित; याशिवाय पेंढारी शिंद्याकडील यांजला हुकूम दिले जे नबाबाचे फौजेचे आसपास कही काबाड लुटून घालमेल करावी. नवाबाचे फौजेंत उपद्रव करावा. याप्रमाणें ताकीद करून फौजेसहित पंतप्रधान कूच करून चालले.

**खडर्याची लढाई**, इ. स. १७९५:—तों तिकडील नबाब बंदेगान अल्ली व त्याचे कारभारी मशरील मुलुख अजमल उमराव आरस्तुज्या बाहदर तमाम फौजेनिशीं दरमजल कूच करून मोहोरीचा घाट उतरून आलीकडे आले. तशांत पंतप्रधानांनीं सीनानदी नजिक जाऊन मुक्काम केला. व सडचा फौजा नबाबाच्या मुकाबल्यास पुढें पाठविण्याचा बेत करून बाबा फडके कुल हुजुरातीसहित व परशराम भाऊ यांजला आघाडीस फौजेंत अधिकारी करून रवाना केलें. व सेनासाहेबांकडील विठलपंत सुभेदार व शिंद्याकडील जिवबादादा पलटणी तोफखान्यासहित व पिराजीपंत सुभेदार होळकरांकडील, असे फडक्यांचे हमराहींत देऊन पुढें रवाना केले. ते पंतप्रधानाच्या फौजा नवाबाच्या फौजेचा मुकाबला पहाण्याकरितां परशरामपंत भाऊ पुढें पुढें सडे होऊन गेले. तेथें गोळागोळी नवाबाचे हरवलीसी[१] जहाली. ते दिवशीं तसेंच राहून नंतर दोन चार रोजांनीं पंतप्रधानाच्या फौजा अघाडीच्या जाग्यावर तयार असतां नवाब खासी स्वारीसहित तयार होऊन निघाले. तों पंतप्रधान जातींनीं व सेनासाहेब व शिंदे व होळकर आदि करून दहा कोसांचे तफावतींनीं असतां अघाडीचे फौजेशीं लढाई सुरू जहाली. त्या प्रसंगीं लढाईचे वेळेस विठ्ठलपंत[२] सुभेदार उजवे बाजूस व जिवबादादा तोफ-

१. बिनी (समोरची टोळी).
२. हे भोंसल्यांकडचे.

खान्यासहित डावे बाजूस, मध्यंतरीं बाबा फडके व परशुरामपंत भाऊ खास हुजुरात, व पिराजीपंत यानी कमरग्यांत[१] राहून ज्याचें कमी पडेल त्याची मदत करावी, असें होऊन लढाई जहाली. प्रथम परशरामभाऊ पंतप्रधानाकडील व नबाबाकडील हरवलीची फौज लढत असतां अल्लीखान बराबर व रोषनखान व सुभानखान यांसि लढाई होऊन, परशराम भाऊ जखमी होऊन त्यांचा पुतण्या[२] खेतांत राहिला. असें झाल्यावर फौज मागें हटली. हे पाहून विठ्ठलपंत सुभेदार व हुजुरात व बाबा फडके व विठ्ठल शिवदेव यांनी अघाडीस होऊन, नबाबाचे फौजेवर मारगिरी केली. तशांत परशरामभाऊ यांणीही सावर धरून फौजेचा जमाव एकंदर करून लढाई मातबर जाहली. नबाबाकडील हरवलीची फौज शिकस्त केली. तशांत डावे बाजूकडून जिवबादादा यांनी तोफेचा मार नबाबाचे खासे स्वारीवर व हरवलीवर सुरू करून, नबाबास जेर केलें. असे सायंकाळपर्यंत लढाई होऊन नबाब शिकस्त झाले. रात्रौ मुक्कामाचा बेत बाबांनीं दाखवून दोन प्रहर रात्रीस खडर्याचे सुमारें चालले. हे पाहून पेंढारी यांनी घालमेल केली. फौजेंत सरमिसळ होऊन नबाब बहादुरांची फौज लुटली, तेव्हां नबाब निघोन खडर्याचे किल्ल्यांत गेले. माघोमाघ दरोबस्त फौजा पंतप्रधान व सेनासाहेब व शिंदे होळकर आदिकरून, या फौजा जाऊन घेरा घातला. नबाब जेर झाले. त्यांचे फौजेंत लढाईची उमेद राहिली नाही. नबाबांनीं तहाचा विचार करून नाना फडनवीस यांजकडेस दर्द गोंविदराव भगवंत यांच्या हाती केला. ऐते वेळेस नाना फडनवीस यांनीं मुद्दा घातला कीं, पांचशें लक्षांचा मुलुक व तीन किल्ले दौलताबाद, धारुर, परांडा वगैरे हे द्यावे. याजवरून नबाबांनीं लढाई रहाविण्याचा बेत करून सांगून पाठविलें. तेव्हां नानांनीं विचार केला. ते वेळेस सेनासाहेबांनीं म्हटलें कीं, "नबाब इतके कायल झाले असतां, आपण केवळच अंत पहाणें हें सल्ला नाहीं." हें समजोन साडेबत्तीस लक्षांचा मुलूख घ्यावा, असें मशरील मुलुख अजमुल उमराव याजला उत्तर केलें. याजवरून नबाबांनीं ऐकून आपले जागीं खिन्न झाले, म्हणून मशरील मुलुक यांनीं हा

१. मध्यभागीं.
२. विठ्ठलराव धोंडदेव.

मजकूर ऐकून बंदेगान अल्ली हजरत याचे उरूबुरू* जाऊन त्यांनीं अर्ज केला जे, " माझे दौलतीस ज्यापेक्षां धक्का बसतो त्यापेक्षां मजला रवाना करावें मी आपले संतोषानें जातों. " अशी विनंति करून निरोप घेऊन मशरील मुलुक निघोन पंतप्रधानाचे लष्करांत आले. नेमाप्रमाणें नानांचे मनोदयानुरूप सिद्धीस जाऊन साडे बत्तीस लक्षांचा तह जाहला. व मशीरास पंतप्रधानाकडे कैदेंत पाठविलें. ते दिवशीं प्रातःकाळीं मशीर आले. ते इस्तिबालास दोन कोस नाना सामोरे गेले. व पंतप्रधान कोसभर सामोरे जाऊन भेटी गाशावर झाल्या. नंतर नाना आपले डेऱ्यास गेले व मशीरास पंतप्रधानांनीं खास डेऱ्यापर्यंत आणोन वेगळे डेरे वगैरे सरंजाम वेगळा दिला. तो तेथें त्या मशीरास पोंहोचविला. मशीरास नानाफडणवीस यांनीं कैदेंत ठेविलें. लढाईचे प्रसंगी सेनासाहेब सुभा यांजकडील फौजेनी कामकाज चांगलें केलें. हें समजोन नानाफडणवीस यांनी हुशंगाबाद वगैरे पांच महाल व दक्षिणतीरच्या सनदा पंतप्रधानाकडून सीनानदीचे मुक्कामी सेनासाहेबांस करून दिल्या. यानंतर तेथून कूच होऊन पंतप्रधान माघारे पुण्यास चालले. मागाहून सेनासाहेबांनीं आपले फौजेची रवानगी अलेगांवचे सुमारें करून, आपण सडे पंतप्रधान यांस पोंचवावयाकरितां पुण्यास गेले. तेथें कांहीं एक दिवस राहून उभयतां कारभारी यांस पुण्याचे मुक्कामी ठेवून, आपण पंतप्रधान यांचा निरोप शिरस्त्याप्रमाणें बहुमान वस्त्रें जवाहीर घेऊन आले.

तेथून फौजेची रवानगी सन १२०५ चे सालीं हुशंगाबादेस केली. विठलपंत सुभेदार व सखाराम अवधूत व रघुनाथराव बाजी घाटगे व वेणीसिंग सुभेदार पलटणी सुद्धां आदिकरून रवाना केले. इतक्यांत पुण्याहून वर्तमान आलें की, आश्विन मासी माधवराव नारायण पंतप्रधान यासि देवाज्ञा जाहली. याजमुळें आपण सेनासाहेब अलेगांवचे मुक्कामींच राहिले. पेशजी फौजा हुशंगाबादेस रवाना झाल्या होत्या. त्यांणीं तेथें जाऊन लढून हुशंगाबादेस ठाणें बसविलें.

**आप्पासाहेबांचा जन्म,** इ. स. १७९६:—तशांत सेनासाहेबांचे चिरंजीव परसोजी भोंसले बाबासाहेब यांचें लग्न अलेगांवचे मुक्कामीं झालें. नंतर नागपुरांत व्यंकाजी भोंसले सेनाधुरंधर ऊर्फ मन्याबापू यांजला पुत्र चैत्रमासीं जाहला. हें वर्तमान ऐकून सेनासाहेब सडे नागपुरास आले. त्या मुलाचें नांव

* रूबरू-समक्ष.

मुधोजी भोंसले ऊर्फ आपासाहेब नामाभिधान ठेविलें. ते वेळेस छत्तिसगड व चंद्रपूर हे दोन्ही प्रांत व्यंकाजी भोंसले सेनाधुरंधर याजला सेनासाहेबांनी दिले.

तशांत दत्तविधानाचा प्रकार नानाफडनवीस यांनीं पुण्यास येऊन सर्व लहान मोठे सरदार पंतप्रधानांच्या इलाख्यांतील शिंदे, होळकर व रशियातदार स्वराज्यांतील सेनासाहेब व नबाब बंदेगान अल्ली यांजकडेस पैगम करून पत्रें पाठविलीं. याजमुळें पुण्यांत फंद माजला[१] ते काळीं श्रीधर लक्ष्मण मुनसी व कृष्णराव माधव चिटणवीस यांचे समागमें रामचंद्र दादो उभयतां कारभारी यांजकडून सवाल जबाबास जाणें येण्यास्तव पुण्यास होते. त्या समयी दत्तविधानाची संमत्तीही कोणा कोणाची आली. याजवर शिंदे यांनींही संमत्ति दिली असतां, बाळोबा पागे कारभारी शिंदे यांचे म्हणण्यावर फाट घेऊन दरकूच टोंक्यावर गेला. नजीक पास दौलतराव शिंदे आले. तेथून बाजीराव हे जुन्नरास होते. त्यांजला संधान करून शिंदे त्यांनी आपले लष्करांत आणावें, हा बेत जाहला. हें वर्तमान नाना फडनवीस यांजला पुण्यास समजतांच, बाजीराव यांजकडेस फडनवीस मशारनिले यांनीं आपलेजवळ जलदी करून निघाले. इतक्यांत शिंदेही पुन: दरकूच जाऊन पुण्यास पोंहोचले. तेव्हां नाना फडनवीस शिंदे यांचे दाबांनीं निघोन महाडास गेले. बाजीराव व शिंदे एकत्र जाहले. कांहीं एक दिवस गुजरल्यावर शिंदे यांजकडून कारभारी बाळोबा पागे व परशराम भाऊ मिरजकर बाजीराव यांस जेजुरचे मुक्कामी कैद केले, आणि एकत्र होऊन, चिमणाजी माधवराव यांस पुण्यास आणून दत्तविधान[१] करून पंतप्रधानाचे गादीवर स्थापित केलें असतां चिमापाची अज्ञात दशा यामुळें संस्थापनेचा संतोष राहिला नाहीं. बाजीराव यांचें स्मरण वारंवार करावें. नाना माहडासच होते. त्यानंतर परशरामभाऊ व बाळोबा पागे शिंद्याकडील, यांनीं नानांचे पारिपत्याचा विचार मनांत आणून नवाब बंदेगान अल्लीशीं स्नेह मशरील मुलुक पुण्यांत कैद होते त्यांचे विद्यमानें परशुराम भाऊंनीं संधान करून, फौजा त्याजकडील मदतीस बलाविल्या. मशरील मुलुकास कैदेंतून सोडवावें व सेनासाहेबांचे उभयतां यांचीही फौज बोलवावी असा विचार करून मसरील मुलुक यांजकडेस गोविंदराव भगवंत यांचे हातून संधान लाविलें. परंतु गोविंदराव सर्वस्वीं नानांचे

---

१. शके १७१८ नलनामसंवत्सरीं वैशाख शुद्ध १० स दत्तविधान झालें.

प्रेमांतील त्यांनीं यांचा लोभ ठेवून अंतर्गत नानांचा ठेविला, व मशीराकडे जाऊन त्यासही दाबाचीं बोलणीं केलीं कीं, "बाळोबा[1] पागे व परशुराम भाऊ सर्वस्वी तुमचें पारपत्य करावें हा बेत करून आहेत." असें गोविंदराव यांनीं बोलण्यांत आणिलें. तेव्हां मशरील मुलुक यांनीं उत्तर केलें कीं, यांची सल्ला काय? तेव्हां यांनीं उत्तर केलें कीं, तुम्ही नानांचे सल्लेंत अनुकूळ असल्यास तुमचा खुलासा करून येथून तुमची मुक्तता करवितों. त्यांनीं हें ऐकून हें मानपत्र प्रमाण केलें कीं, "आमचे तहापैकीं मुलुक साडे-बत्तीस लक्षांचा खडर्याचे सालीं घेतला आहे, तो माघारे मिळाल्यास अनुकूळ राहूं. यांत अंतर पडणार नाहीं." हीं बोलणी जाहली तीं नाना माहडास होते त्यांजकडेस गोविंदराव* यांनीं अंतस्थ लिहून पाठविलें. तेव्हां नानांनीं मुलुक घेतला तो माघारा देण्याचा करार करून मशरीलाचे स्वस्थतेचा विचार लिहून उत्तर गोविंदराव यांजकडेस पाठविलें. येविशींचा सल्ला सेनासाहेबा-कडील उभयतां कारभारी[2] यांचाही पक्ष नानाकडील तेव्हां नानांचे विचारा-खेरीज हेही नाहींत. परंतु याजलाही सल्लेंत घेऊन बाजीराव यांजला स्थापित करण्याचा विचार अंतरंगीं ठेविला. परंतु या मसलतीस शिंदे अनुकूल झाले पाहिजेत. याजकरितां व्यंकटराव काशी याजला नानांनीं सांगून पाठविलें कीं, "शिंदे यांस या मसलतीस अनुकुळ करावें. परंतु शिंदे बाळोबा पागे यांचे लगामीं, याजमुळें बाळोबा फाट घेऊन आहेत हें चांगलें नाहीं. या प्रसंगीं तुम्ही शिंद्यांशीं सल्ला करून बाळोबास टाकून या राज्यकारणास अनुकुलता केलियास तुमचा अगत्यवाद चालविणें सर्वस्वी आम्हांस आहेत." याजवरून व्यंकटराव काशी यांनीं कृष्णाजीशेट याचे हातून शिंदे याशीं शकट-भेद करून नानांचे पल्ल्यावर बाळोबास व कुल दौलतराव शिंदे यांजला निश्चयांत आणिलें. ते काळीं नानांस अडचण मोठी होती. सेनासाहेब फौजेसुद्धां पुणें मुक्कामीं आल्याशिवाय इतकी ही मसलत सिद्धीस जावयाची नाहीं. याजकरितां श्रीधर लक्ष्मण व कृष्णराव माधव चिटनवीस व व्यंकट-राव काशी यांजला निश्चयासाठीं तुलशी पाठविल्या व करार केला कीं, ही

---

१. बाळोबा तात्या पागनीस हे शेणवी सरदार. यांजविषयीं बरीच हकीकत 'विविधज्ञानविस्तार' पु. ११ पृ. ७६–७ मध्यें पहा.

२. श्रीधर लक्ष्मण आणि कृष्णराव माधव. * काळे हैद्राबाद येथें वकील.

मसलत सिद्धीस नेल्यास जाहगीर तुमचे जातीस त्रिवर्गांस देण्यांत येईल. याप्रमाणें करून बाबूराव वैद्य व गोविंदराव भगवंत यांचे हातें बोलविलें, आणि हेंही लिहून पाठविलें की, सेनासाहेब या प्रसंगीं फौजेसुद्धां आल्यास सर्व गोष्टी त्यांचे हातून सिद्धीस जातील. याजवरून उभयतां कारभारी यांनीं सेनासाहेबांस लिहून पाठविलें.

याप्रमाणें आंतील बेत पक्के होऊन बाळोबा व परशुराम भाऊ यांजला गोविदराव[१] भगवंत यांनी बाह्यात्कारें समजाविलें कीं, मशरील–मुलुक सोडीत असतां तुमचे मसलतीस अनुकूळ आहे. याप्रमाणें त्याशीं बोलणें होऊन नवाबा कडील फौजा हैदराबाहेहून बोलाविल्या. मशीरांनीं पुणें मुक्कामीं कलमज्यारी करून लोकांचा जमाव केला. त्या काळीं नवाबा कडील फौज थोडीशी जमा जाहली. नवीन फौज मशीरांनीं ठेविली. असें मिळोन पंधरा वीस हजारांचा जमाव जाहला. जमाव झाल्यावर मशरील मुलुक आपले फौजेंत कैदेंतून सुटून दाखल झाले. तसेंच सेनासाहेबांकडील उभयतां कारभारी यांनी अंतस्थ बोलणें नानांचें व बाह्यात्कारी बाळोबा व परशुराम भाऊ याचें बोलणें ठरवून सेनासाहेबांस फौजा सुद्धां पुण्यास बोलाविलें.

ते काळीं सेनासाहेबाची फौज हुशंगाबादेस घेऊन वऱ्हाडांत आले. फौजेसहित सेनासाहेबसुभा पुण्यास जावयास निघाले. ते गंगथडीस येऊन गंगथडीचा बंदोबस्त त्रिबकराव धुंडिराज व भालचंद्रराव दाजी कोठेकर यांजकडेस नेमून, आनंदराव धुंडिराज गंगथडी प्रांतीं जमावा सहित होते. यांजला चार पांच हजार फौजे सहित समागमें घेऊन सेनासाहेब पुण्यास[२] दाखल झाले. नंतर मागाहून व्यंकाजी भोंसले सेनाधुरंधर वीस हजार फौजेनिशी हेही पुणें मुक्कामी जाऊन पोंहोचले. तेव्हां नाना माहडाहून पुण्यास आले.

**बाजीरावाची स्थापना**:—त्या काळीं बाळोबा पागे व परशुराम भाऊ यांजला पुरतें समजलें कीं, फंद होऊन सेनासाहेब व मशरील मुलुक व

१. गोविंदराव भगवंत पिंगळे–यांचें स्थान इंदापूर जि. पुणें येथें आहे.

२. पुण्यास येण्यापूर्वी पुण्यानजीक वाघोली येथें सेनासाहेब व नाना फडनवीस यांची भेट श्रीधर लक्ष्मण व कृष्णराव माधव यांनीं करविली. सेनासाहेबांचे लष्कराची छावणी गारपिरावर होती.

शिंदे हे नानांनीं एकत्र केले. असें कळतांच परशुराम भाऊ चिमापास घेऊन पुण्याहून[१] पळाले. व बाळोबास[२] शिंदे यांनीं कैद केलें. तेव्हां कृष्णाजी नाईक शेट शिंद्याचे येथें कारभारी झाले. तेसमयीं बाजीराव यांजला शिंद्यांनी कैदेंतून काढून सेनासाहेबांची व नानांची व मशरील मुलुक यांची होळकरांच्या[3] भेटी करविल्या. शिंदे, होळकर, भोंसले, मशीर उल्मुलुक एकवटले. नंतर साताऱ्याहून वस्त्रें आणून पंतप्रधानांच्या पदाचा अधिकारी बाजीराव याजला स्थापित[४] केलें.

ते काळी नानांचे आक्षेपानें मुद्दा पडूं लागला कीं, "कारभार पूर्ववत् चालावा. बाजीराव यानी मालकी करून स्वस्थ असावें, व शिंदे यानीं हिंदुस्थानचे बंदोबस्तास जावें, व सेनासाहेबांनीं आपले प्रांतांत जावें, व मशरील मुलुख यानीं हैदराबादेस जावें; येथील वहिवाट पेशजीप्रमाणें चालावी" हें बाजीराव ह्यानें ऐकून येविषयींचें वैषम्य मनांत आणिलें की, "आम्ही कैददाखलच राहिलों." याजवरून नानाकडील पक्ष सोडून शिंदे यांजकडेस अनुकूल झाले. याजवरून शिंदे यांनीं म्हटलें कीं, "बाजीराव याजविषयीं आम्ही प्रश्न केले असतां वृथा जाऊन, नानाच एकटे यशस्वी होऊन कारभाराचे अधिकारी होतात." हें मनांत आणोन नानांस कैद करण्याची मसलत आरंभिली. या सल्ल्यांत सेनासाहेब साह्य केल्याखेरीज होत नाही म्हणोन विचारांत होते. तशांत पुणें मुक्कामीं सेनासाहेब फौजे सुद्धां सहा महिने राहणें झालें. यांची अडचण फौजेंत महागाई भारी, व मसलतीमुळें नानाप्रकारचें शिकवणें व फंद उभे राहूं लागले; आणि आपला तो अर्थ साध्य कोणताही दिसेना. तेव्हां सेनासाहेबांनीं व्यंकटराव काशी यांस आज्ञा केली

---

१. परशराम भाऊस धरण्याकरितां शिंद्यानें कांहीं लोक नारोपंत चक्रदेव यांसह पाठविले. हें कळतांच भाऊ चिमापास आपल्या घोड्यावर घेऊन दोघां चिरंजीवांसह पळाले. यांस शिवनेरी किल्ल्यावर नारोपंत चक्रदेव यांच्या सैन्यानें पकडिलें. 'परशुराम भाऊ पटवर्धन यांचें चरित्र.' पृ. १०९–१० पहा.

२. सन १७९६ त ऑक्टोबर महिन्याचे २७ व्या तारखेस शिंद्यानें बाळोबास कैद केलें.

३. मल्हारराव.

४. सन १७९६ डिसेंबरचे चौथे तारखेस बाजीरावास गादीवर बसविलें.

जे, "येथें तो फंद मचून आहे, आणि आपल्यास अडचण अतिशय, याजकरितां आपला अर्थ मंडळे प्रांत साध्य होऊन सनदा [१] मिळाव्या, व शिवाय एका फौजेचे पक्षास मिळोन त्वरित निघणें झाल्यास उत्तम आहे व बाजीराव पंतप्रधान याचा भावगर्भ पाहून शिंद्याचे विचारांतील एकादा बेत ठरवून आल्यास चांगलें आहे; येविषयीं उद्योग तुम्हीं करावा." याजवरून मशारनिल्हे शिंदे यांजकडेस गेले. तों त्यांनीं मशारनिल्हेशीं बोलण्यांत आणिले जे, "आमचे मसलतीस सेनासाहेब अनुकूल झाले, यांस पंचवीस लक्ष नगदी तूर्त खास देववितो, व मंडळयाच्या सनदा, याप्रमाणें बाजीराव पंतप्रधान यांजकडून देववितों. सदर्हूप्रमाणें निश्चयांत आणावें." याजवरून सेनासाहेबांस या मजकुराची विनंति मशारनिल्हे यांनीं केली. हें सेनासाहेबांनीं ऐकून रुकार दिला व निश्चय ठरवून शिंदे यांजला सांगून पाठविलें. याजमुळें पंधरा दिवस मसलत नानांची व मशीराची थिजोन राहिली. व ही बातमी नानांस परस्परें समजली. यावरून सेनासाहेबांकडील उभयतां कारभारी यांस बोलावून विचार केला कीं, "तुमचा आमचा पक्केपणा चालत असतां शिंदे यांनी असें करविलें आहे. त्यास मंडळयाच्या सनदा व दहा लक्ष रुपये नगदी तूर्त खर्चावयास, लोहगडाकडून आणून देववितों. तुम्ही आम्हास अनुकूल आहांत असेंच असावें." हें बोलणें उभयतां कारभारी यांशी, ठरवून सेनासाहेबांकडेस पाठविलें व सदर्हू मान बोलावणें पक्कें व सनदा व खास दस्तूर दहा लक्षांची चिठी करून दिली. हें घेऊन उभयतां कारभारी सेनासाहेबांकडेस आले. आणि बोलण्यांत आणिलें कीं नाना म्हणतात जे, "व्यंकटराव काशी तुम्हांकडून शिंद्याकडे वकिलीस असतां तेथें कारभारांत शिरले. त्याजवरून आम्हांस भास जाहला कीं, सेनासाहेब व आम्ही एक असतां शिंद्यांची मसलत सिद्ध होण्याकरितां बुद्धीस भ्रंश सेनासाहेबाचे, व्यंकटराव काशी करितात. ते वकिलीचे कामांत आहेत तोंवर तुमचें व आमचें सख्य राहात नाहीं." असें नाना प्रकारें बोलून व्यंकटराव काशी

---

१. "नागपूरकर रघोजी भोंसल्यालाही नानांनीं वश केला. फौजेच्या खर्चाकरितां पंधरा लक्ष रुपये रोख देऊन त्याची तुंबडी भरली. आणि मंडले प्रांत, सूर्यगडचा किल्ला व त्याच्या खालचा मुलूख हें कार्य सिद्धीस गेल्यावर देण्याचें वचन दिलें." प० भा० चरित्र पृ० १०६.

यांजला कैद[1] करविलें आणि कराराप्रमाणें सनदा मंडळयाच्या व नगदी दहा लक्ष हे ठेवून नानास अनुकूल झाले.

ते काळीं उभयतां कारभारी यांचे जातीस पेशजी जहागीर देण्याचें ठरलें होतें त्याप्रमाणें करून दिलें. व्यंकटराव काशी यांचे जातीस जहागीर देणें ठरलें होतें तें रामचंद्र दादो उभयतां कारभारी यांचे लोभांतील म्हणोन त्यांचे नांवें करार करून घेतले, व बाजीराव स्थापित होऊन मशरील मुलुक रुकसत होऊन हैदराबादेस रवाना झाले. व सेनासाहेबांनीं निरोप घेऊन नागपुरास सन १२०७ चे सालीं बरसातींत आले.

शिंदे पुणें मुक्कामीं राहिले. कांही दिवस दौलतराव शिंदे यांनीं मनांत आणिलें, कीं नाना फडणवीस यांनीं आमचा मनसुबा सिद्धीस जाऊं दिला नाहीं. व व्यंकटराव काशी यांस आम्हांकरितां सेनासाहेबांकडून कैद करविलें. हें वैषम्य मनांत आणिलें. परंतु होळकर चौघे बंधु मल्हारजी[2] व काशीराव हे दोघे खासे व यशवंतराव आणि विठूजी हे राखीचे असे फौजसुद्धां, हेही पुणें मुक्कामीं राहिले होते. त्यांचें व नानांचें सूत संदर्प लागून असतो, याजकरितां शिंदे आपले ठिकाणीं विचारांत होते.तशांत यांचे येथें कारभारी सरजेराव[3] शिंदे घाटगे होऊन होळकराकडे शकटभेद करविला. तेव्हां काशीराव व मल्हारजी होळकर दोघे सखे भाऊ असतां, आपसांत कलह करूं लागले. तेव्हां काशीराव होळकर यांनी दौलतराव शिंदे यांजकडेस सरजेराव होते , यांचे विद्यमानें बोलणें लाविलें की, " माझा हिस्सा मजला मिळोन या सरदारीची मालकी माझी असावी. " हें बोलणें शिंदे यांनीं ऐकतांच अनायासें संधान आलें म्हणोन, तेच वेळेस एक सरदार वीस हजार फौज देऊन मल्हारजी होळकर यांचे पारिपत्यास पाठविले. ते समयीं मल्हारजीस लढाई होऊन वार लागले.

---

१. नानांनीं कृष्णराव माधव व सेनासाहेब यांच्या अनुमतानें, व्यंकटराव काशीस कैद करविलें. व्यंकटराव व त्याचा भाचा दवलतराव नरसिंह यांस कुटुंबासह कैद करून गाविलगडावर पाठविलें. लक्ष्मणराव काशीसही नागपूर येथें कैद केलें.

२. पेशव्यांची बखर होळकर वंशवृक्ष पृष्ठ ५२ पाहा.

३. सखाराम घाटगे हा कागलकर संस्थानिकांचा नातलग होता. याची मुलगी बायजाबाई ही दौलतरावास दिली होती. यामुळें यांचें, महात्म्य फार वाढलें.

त्या गर्दींत मल्हारजी होळकर व विठोजी व यशवंतराव होळकर पळाले. ते यशवंतराव[१] नागपुरास आले. त्यांजला सेनासाहेबांनीं आपले जवळ ठेवून[२] घेतलें. व विठोजी होळकर पंढरपूरचे सुमारें निघोन विजापुरास गेले.

नंतर नाना फडणवीस याचे अंत्र चहूंकडील उठोन निकालस राहिले. तशांत नानांस मेजवानीचें निमित्य करून दौलतराव शिंदे यांनी आपले येथें छावणींत आणोन कैद[३] केलें. याजवर एकवीस दिवस कैदेंत ठेवून नंतर नगरचे किल्ल्यांत पाठविलें. पुढें शिंद्याचे येथें खर्चाची अडचण जाहली. ते वेळेस बाजीराव यांनी कांहीं ऐवज देणें कबूल केला होता, तो ऐवज न मिळे तेव्हां हेही देण्यास दिकत जाहली. याजवरून नानांस[४] कैदेंतून सोडिलें. त्या काळी नानांनीं कांहीं ऐवज शिंदे यांस देवविला. तशांत शिंद्याचे येथें बायकांत[५] फंद उभा राहून आपसांत कलह करूं लागले, यास्तव शिंदे यांनीं कूच करून उज्जनीकडेस गेले. मार्गात होळकराचा प्रांत इंदूर लुटून, खंडणी घेतली.

**यशवंतराव होळकर याची नागपुरास कैद व पलायनः**—तशांत यशवंतराव होळकर नागपुरास होते व विठोजी होळकर पंढरपूर प्रांतीं जमियत करून त्या प्रांतीं उपद्रव करूं लागले. तेव्हां बाजीराव पंतप्रधान यांनीं गोखले वगैरे सरदार वीस हजार फौज पाठवून विठोजीचे फौजेचें पारिपत्य करून त्याजला धरून पुण्यास आणिलें. तेथें हत्तीचे पायीं देऊन

---

१. यशवंतराव पळून नागपुरास आला असतां रघोजीनें त्यास कैद केलें. सन १७९९ चे मार्च महिन्याच्या आरंभीं त्याची सुटका झाली. यशवंतराव कैदेंत ६ महिने होता.

२. यशवंतराव होळकरास रघूजीनें सीताबर्डीचे टेकडीवर कैददाखल ठेवलें होतें. ( सं. )

३. बाजीरावास नाना नको होते तेव्हां त्यानें सर्जेराव घाटग्यास शिंद्याची दिवाणगिरी देण्याचें कबूल करून शके १७१९ पौष शुद्ध १३ स कैद केलें. पेशव्यांची बखर पृ. २११–१२ पाहा.

४. शके १७२० ज्येष्ठ मासीं नानांस नगराहून वानवडीस आणिलें. असें करण्याचें कारण शिंदे यांस नानांची सल्लामसलत पाहिजे होती.

५. महादाजी शिंदे यांच्या कुटुंबाचें व दौलतरावाचें नीट नव्हतें. पेशव्यांची बखर पृष्ठ २१२ पहा.

जिवें[1] मारिलें. हा कुन्हा यशवंतराव होळकर याचे पोटांत होता. व बाजीराव पंतप्रधान यांनी सेनासाहेबांस लिहून पाठविलें की, यशवंतराव होळकर यांची हुषारी ठेवून बंदोबस्त करणें. हें वर्तमान यशवंतराव यांजला बातमीचें समजतांच नागपुराहून निघाले ते व्याहाडास गेले. मार्गाहून सेनासाहेबांनीं फौजा पाठवून धरून आणिलें. तेव्हां किमजीचे कंपूंत कैद ठेवून बंदोबस्त केला. ते पुन: मार्गानें गुप्तवेषें पळून निघाले ते महेश्वरास जाऊन जमियत करून फौजा ठेवून शिंद्याशीं व त्यांशी लढाया झाल्या.

इकडे सेनासाहेबाजवळ श्रीधर लक्ष्मण मुनसी व कृष्णराव माधव चिटणवीस हे कारभारी उभयतां असतां सन १२०८ चे अवल सालीं कटकाकडील कामदार हरबा नसरा एकला व भवानी दादा चौधरी वगैरे नागपुरास आले. त्याचे अगोदर पुण्याकडेस फौजेसुद्धां सेनासाहेब गेले होते, त्याचा खिस्सा होऊन खर्चाची अडचण सेनासाहेबांस जहाली होती. सबब त्या कामदारांपासोन द्रव्य घ्यावें याजवरून त्या कामदारांवर कोसिस धरून उभयतांचे विद्यमानें जाबसाल लाविला, ते वेळेस चिटणवीस यांनीं सेनासाहेबांशीं बोलण्यांत आणिलें कीं, हीं माणसें दौलतीचे उपयोगी यांजला राखून घेण्याचें तें घ्यावें. या दौलतीचा परिणाम चांगला असतो. माणसास बेदिल होऊं देऊं नये." असें दूरंदेशी सांगत असतां सेनासाहेबांच्या मनांत विकृति अंतर्यामीं आली. तेव्हां श्रीधर लक्ष्मण मुनसी यानें सेनासाहेबाचे मर्जीनुरूप वागून अधिक लोभ दाखवून त्या कामगारांपासून द्रव्य सरकारांत देवविलें. व सरकारमर्जी प्रसन्न करून घेऊन सरकारांत पेश झाले.

बाह्यरंगी इत्तल्ला चिटणीस मशारनिल्हेस सेनासाहेबांनीं करीत असावें असा ओघ चालला. मुनसीचे सल्यानें सेनासाहेबांनीं वागत असावें. याजवरून मुनसीनीं मनांत आणिलें कीं, "विश्वंभरपंत इंग्रज बहादूर यांचे येथें वकिलीवर कलकत्त्यास आहेत ते आपल्यास अनुसरून नाहींत. सबब कोणी आपले पक्षांतील त्या वकिलीच्या कामावर पाठवावा." याजविषयीं सेनासाहेबांस विश्वंभरपंतांविषयीं विपर्यास सुचवून बगाजी रघुनाथ याजला त्या कामावर पाठवावें असें नेमांत आणलें.

---

१. १८०१ माहे एप्रिल ता. १ रोजीं मारिलें. पे० ब० पृ० २१६.

तशांत व्यंकाजी भोंसले सेनाधुरंधर व मातोश्री चिमाबाईसाहेब कार्तिक मासीं श्रीजगन्नाथ स्वामीचे यात्रेस[१] गेले. एक वर्ष तिकडेस त्यांजला यात्रेकरितां लागलें. मातोश्री चिमाबाईसाहेब कटकास पोहोंचले. तों तेथें रघुनाथ शेषाद्री व भूपसिंग व बिऱ्हानखान व शाहाबाजखान हे चौघे सरदार फौजबंद पदरचे राजाराम मुकुंद कटकचे सुभे यांच्या वेळेपासून, बाराभाटीचा किल्ला त्यांचे स्वाधीन होता तो बदलून किल्ला बळकाविला. तेव्हां मातोश्री चिमाबाईसाहेबांनीं तलबेऐवजीं लाख रुपये देऊन किल्ल्यांतून चौघे सरदार बाहेर काढिले. नंतर सेनाबहादूर यांनीं आपलेकडेस त्यांना चाकर ठेवून सोलापूरची मोहीम सांगितली, व बाराभाटीचा किल्ला बाळाजीपंत[२] कोन्हेर यांचे विद्यमानें किल्लेदार अमृतराव ढगे याजकडे सांगितलें व प्रांताचे बंदोबस्तास व्यंकाजी सकदेव याजला नेमिलें व फौजेप्रकरणीं बाळाजी कोन्हेर यांस नेमून चिमाबाईसाहेब सेनाधुरंधर पुरीस[३] गेले.

**कोलब्रुकची वकिली**, इ. स. १७९९ : १८०१:—तशांत मातोश्रीसाहेब जगन्नाथास गेल्यावर मिस्तर कोलब्रूकसाहेब[४] कलकत्त्याहून रतनपूरचे मार्गें नागपुरास सेनासाहेबांकडे अखेर सालीं आले. भेटी होऊन त्यांनीं बोलण्यांत आणिलें कीं, "आमचेकडून पटणाची[५] मोहीम कर्नाटक प्रांतीं होऊन फौजा पटणास पोहोंचून मोर्चे बसले आहेत. लढाई सुरू असे, त्याजकडेस हवा गैर, मदत कटकमार्गें चीलखानदी उतरून तैलंगणांतून चिनापटणास जात आहेत, त्यांजला मार्ग कटकांतून मिळावा. बंदोबस्ती यथास्थित चालावी." तेव्हां सेनासाहेब बोलले कीं, दोस्तीचा प्रकार नबाब इमामुद्दवला इष्टीनसाहेब बहादूर यांचे वेळेपासून चालत आला तो बाहाल असावा व पुढें दिवसेंदिवस दोस्तीची बळकटी ठेवणें तुम्हांकडेस आहे. कटकचे मार्गें तुमचा सरमजाम जाईल, तो त्यास मनाई नाहीं. हरदो तर्फेची दोस्ती सदैव

१. या यात्रेस मुधोजीची दुसरी बायको कमळजाबाई गेली होती व रघोजी कवडू पाटलाचे बांधापर्यंत पोंचविण्यास गेला होता.

२. लेखांक २ पृष्ठ ११–१२ पाहा.

३. जगन्नाथ.

४. ना. इ. पृ. ३१० पाहा.

५. श्रीरंगपट्टण (टिपूवर)

चालावी." हें बोलणें होतच आहे. तों पटणास फौजा इंग्रज बहादुराच्या पोहोंचून लढाई होऊन सन १२०९ चे सालीं टिपू शिकस्त झाला. पटणांत साहेबबहादुराचें ठाणें बसलें. हें वर्तमान साहेब महसूफ याजकडेस आलें. म्हणून त्यांनीं सेनासाहेबांकडेस येऊन सविस्तर वर्तमान निवेदन केलें. आणि सेनासाहेबांचा निरोप घेऊन ते माघारे जाते वेळेस सेनासाहेबांनीं कोलब्रूक साहेबाशीं बोलण्यांत आणिलें कीं, "तुमची आमची दोस्ती दिवसेंदिवस अधिक वाढावी, याजकरितां बगाजी रघुनाथ याजला कलकत्त्यास पाठवीत आहें, येविषयीं तुम्ही तेथें शाबीत करून दोस्तीचा रोक अधिक होईल तें करालच." असें झाल्यावर ते कूच करून गेले. मागाहून बगाजी रघुनाथ यांची रवानगी करण्याचें ठरलें. त्या वेळेस कृष्णराव माधव चिटणीस यांनीं सेनासाहेबांस विनंति केली कीं, "विश्वंभरपंत बहुत लायक, शाहणा त्यांनीं इंग्रज बहादुराची दोस्तीची मजबुती चांगली ठेविली आहे, तेव्हां त्याचें काम दूर करून याजला पाठविणें सल्ला नाहीं." तें न ऐकतां मुनसीचें सांगणें व करणें मंजूर होऊन बगाजी रघुनाथ याजला वकिलीचे कामावर कलकत्त्यास रवाना केलें.

यापूर्वीं सेनासाहेबांनीं पांडुरंग गणेश बक्षी व महादाजी विश्वनाथ मखलसी यांजला समागमें फौज देऊन रेवा दक्षणतीरास पाठविलें, ते लखनाघन* धुमेपर्यंत जाऊन श्रीनगर व भावरगड येथें ठाणें बसवून पांडुरंग गणेश कांहीं गुंत्यामुळें माघारे आले. नंतर विठल बल्लाळ सुभेदार व सखाराम अवधूत व बेणींसिग पलटणीसुद्धां व रघुनाथराव बाजी घाटगे व महमूद अमीनखान छपारेवाले असे दक्षणतीरास उत्तर तीरचे बंदोबस्तास पाठविले. ते दरमजल जाऊन छपारेचे सुमारें मुकाम करून पुढील शोध मनास आणून तेथून कूच करून दरमजल चालले. फौजेसुद्धां नर्मदा नदी उतरून जबलपूरचे पलीकडे मुक्कामास होते. तशांत काटंगीस जमाव मोरोजीचे चिरंजीवाकडील होता त्यांसी लढून ठाणें घेतलें. ते समयीं दक्षिणतीरचा सुभा बगाजी भातवणे व वासुदेव जनार्दन याजला सांगून येसाजी विश्वनाथ पानतावणे, याजकडेस फौजेचा जमाव गोविंदराव त्रिंबक असे फौजेसुद्धां त्याबरोबर देऊन, सेनासाहेबही रवाना केले. तेच चौरागडचे जिल्ह्यांत जाऊन पोहोंचले. हे तेथें गेल्यावर चौरागडचे जमेदार लक्ष्मणसिंग व गर्धपसिंग यांनीं फंद करून

* लखनादौन.

भातवणे व गोविंदराव त्रिंबक यांजला दगा करून धरून कैद केलें. व चौरागडचे किल्ल्यांत ठेविलें; हें वर्तमान नागपुरास सेनासाहेब यांजला समजल्यावर, उत्तरतीरास फौजा होत्या त्यांतून कांहीं जमाव दक्षिण तीरास आला पाहिजे म्हणोन विठल बल्लाळ सुभेदार यांजला पत्र लिहिलें. त्याजवरून रघुनाथराव बाजी घाटगे जमावासुद्धां चवरागडचे सुमारास आले. तशांत येसाजी विश्वनाथ त्या जिल्ह्यांत होते. तेही सादणेहून आले; उभयतां मिळून भावरगडचें ठाणें बदललें होतें तें घेऊन साकरगडाकडे वगैरे येथें ठाणें बसविलें आणि चवरागडास आले. तेव्हां गोविंदराव त्रिंबक कैदेंत होते. त्यांनीं फौजेचा दाब सोमनाथपंत फडणवीस चवरगडास होता, त्याजला समजावून त्यासी संधान करून, चवरागडचा किल्ला सोमनाथपंताचे विद्यमानें साध्य करून दिले. भातवणे व गोविंदराव त्रिंबक यांजला घाटगे व पानतावणे यांचे जिमेस किल्लेवाले यांणीं केलें. तेव्हां घाटगे व पानतावणे यांची छावणी दिल्हेरीचे सुमारें झाली आणि भातवणे व गोविंदराव नागपुरास आले. सेनासाहेबांशीं भेट होऊन कृष्णराव माधव चिटणवीस यांनीं गोविंदराव यांची शिफारस सेनासाहेबांपाशीं केली. त्यावरून उत्तरतीरची फौज घाटगे मशारनिल्हे यांजकडील बक्षीगिरी गोविंदराव त्रिंबक यांजकडे सांगितली आणि मशारनिल्हे रवाना होऊन तिकडेस गेले, तों विठलपंत सुभेदार व बेणीसिंग कंपूसुद्धां व सखाराम अवधूत फौजेसहित उत्तर तीरास छावणी करून होते. तेथें गोविंदराव त्रिंबक जाऊन पोहोंचले. सन १२०९ चे साली मीरखान[1] होळकराकडील यांणीं फौजेचा जमाव करून सागरावर चालून आला, ते समयीं दक्षण तीरांतून घाटगेही कूच करून, जबलपुरास गेले. बाळाजी बुंदेले त्यांचें पारिपत्य करून खंडणी घ्यावी या बेतावर मिरखान आला म्हणोन सागरवाले बाळाजी बुंदेले यांणीं विठलपंत सुभेदार यांजकडेस आबा पुसलेकर यांजला पाठविलें; त्यांणीं सुभेदाराकडे येऊन बोलण्यांत आणिलें कीं, "आमचे मदतीस फौज देऊन आपण चलावें. मदत खर्च देण्यांत येईल." त्याजवरून सुभेदारांनीं उत्तर केलें कीं. "आम्हांस उत्तरतीरचा बंदोबस्त करणें जरूर आहे. आमचें येणें तिकडेस होत नाहीं."

१. अमीरखान हा मुरादाबाद परगण्यांत संबळ म्हणून गांव आहे, तेथचा राहणारा. इंग्रजांनीं त्यास टोंकचें संस्थानिक केलें.

त्याजवरून तो गृहस्थ घाटगे यांजकडे आला. हाच मजकूर त्याणीं बोलण्यांत आणिला. त्याजवरून घाटगे याणी उत्तर केलें की, "मंडले व तेजगड वगैरे उत्तरतीर येथील सनदा आमचे सरकारांत पंतप्रधानाकडून मिळाल्या असतां आंतून तुमचे फंदांनी हस्तगत होत नाही याचा बंदोबस्त झाल्यास तुमची मदत करण्यांत येईल, व मदत खर्चही मिळाला पाहिजे." याजवरून त्यांनी कबूल करून मंडल्याविषयी उत्तर केलें की, "तुमचें ठाणें जाऊं द्यावें, आतां दिक्कत पडणार नाहीं." हें ऐकून बाजी घाटगे सुभेदाराकडे जाऊन बोलले कीं, "आपणांस सरकार कामाची जरूर आहे, त्यांत अनायासें संधान आलें आहे त्यास अनमान न करतां मंडल्यास ठाणें पाठवावें आपण सागरास चलावे."

**मीरखानाची स्वारी**:—याजवरून सुभेदाराचे मर्जीस येऊन फौजेसुद्धां सागरास जाण्याकरितां कूच केलें. ते समयी मार्गांतून बाजी घाटगे, नारायणराव व कृष्णाजी शामराज यांची रवानगी मडल्यांत ठाणें बसविण्याकरितां केली. त्यांनी तेथें मंडल्यास पोंहोचून कारवाईचे पोटी लढाई न होतां, ठाणें बसविलें. आंतील शिबंदीची तलब सागरवाले यांजकडून ठेविली व फौजा दरकूच सागरास सेनासाहेबांकडील दाखल झाल्या. तेव्हां मीरखानाची लढाई घ्यावी, हा बेत सागरवाल्याचा. फौजेची तयारी जाहली, तशांत सागरवाल्यांकडून वकील आला, त्यानी म्हटलें की, "त्वरेनें चलावें." त्यांना घाटगे यांनी उत्तर केलें की, "तेजगडचें ठाणें, हस्तगत झालें नाही, तें हस्तगत झाल्यावर मीरखानाशी लढाई देणें काय अवघड आहे ?" त्यावरून तेजगडची सोडचिठी दिली. तें त्याचें पत्र घेऊन कांही जमाव देऊन तेजगडास पाठविलें व आपण फौजेसहित विठ्ठलपंत सुभेदार व बेणीसिंग व सखाराम अवधूत व बाजी घाटगे आदिकरून मीरखानाशी लढाई जाहली. ते वेळेस मीरखानाकडील पायदळ, तोफेवर चालून आलें; आणि स्वारांनिशीं जातीनें मीरखान सुभेदारावर चालून आला. ते वेळेस मीरखान याजकडील पायदळांनीं इकडील तोफा आटोपिल्या, तशांत रघुनाथराव बाजी घाटगे यांनीं घोडे चालून मीरखानाकडील पायदळ शिकस्त केलें. तेव्हां त्याचा मोहरा मागें हटून उभा राहिला. तशीच याणीं उठावणी करून मीरखान याजला सेनासाहेबांचे फौजेनीं लुटून फस्त केला. मीरखान यांचें पारपत्य

झाल्यावर फौजा माघाऱ्या जबलपुरास आल्या. तेजगडचें ठाणें बसल्याचें वर्तमानही आलें. छावणी तेथें जहाली. तेथून सुभेदार विठ्ठलपंत नागपुरास आले.

तेव्हां सेनासाहेबांनीं त्यांची रवानगी वऱ्हाडांत केली, त्याच सालीं चिमाबाई साहेब व सेनाधुरंधर कटकांतून जगन्नाथची यात्रा करून नागपुरास आले.

तों बाजीराव पंतप्रधान यांचें संधान पूर्वी सिलसिल्याप्रमाणें, सख्य असावें अशा बेतांनीं सेनासाहेबांकडे पत्रोपत्री सिलसिला सुरू झाला कीं, शिंदे व होळकर यांनीं आपसांत लढाई करून पुण्याकडेस होळकराचा येण्याचा रोख दिसतो. यांजकरितां त्यांनीं संधान लावलें.

तशांत रघुनाथराव बाजी घाटगे यांनीं उत्तर तीरास लढाईत कामकाज चांगलें केलें हें सेनासाहेबांनीं ध्यानांत आणून उत्तर दक्षिण तीर या दोनही ठिकाणचे सुभ्याचे यांजकडे वस्त्रें सेनासाहेबांनी पाठविलीं. व त्याचे मदतीस बेणीराम पलटणीचा सुभा त्या प्रांतीं होताच, त्या काळीं फौजा सिकरिया जोतपुराकडे भवानराव बाजी व नारायणराव बाजी व भगवंतराव बाजी घाटगे यांसमागमें गोविंदराव बक्षी यांजला देऊन रवाना केलें. तेथें बदलसिंग नामें पुंड होता, यासीं लढाई करून ठाणें घेतलें. त्याजला जिवें मारिलें. त्याजवरून त्या प्रांतांत घाटगे याचा बंदोबस्त बसून त्या प्रांतीं लोकांत तो पुंड मारला गेला सबब आनंद जाहला.

नंतर मीरखान त्या प्रांतीं पुनः फौजेचा जमाव करून मदनपुरावर आला. तेव्हां भवानी बाजी व नारायणराव बाजी व भगवंतराव बाजी घाटगे पलटणीसुद्धां व गोविंदराव त्रिंबक बक्षी हे फौजेसुद्धां सिकरिया जोतपुराकडेस होते. ते परभारें मीरखानाचे मोकबल्यास आले; खान मजकुराशीं लढाई झाली. ते समयीं लोकांनीं कालेश्वर नौबत घाटगे याजकडील आघाडीस होती. यासि लढाई होऊन सरनौबत मशारनिल्हे कामास आले आणि गोविंदराव त्रिंबक बक्षी याजला भाल्याची जखम लागली. ते काळीं फौजेनीं कामकाज चांगलें केलें. अवांतरही कित्येक लोक जायां जखमी होऊन मीरखान शिकस्त होऊन माघारा गेला. त्याच सालीं गुलाबसिंग याचा कंपू सेनासाहेबांचे चाकर तें काम भवानजी भोंसले याचे जिमेस होतें, त्या कंपूनीं वऱ्हाडांत,

उपद्रव जागजागीं केला. व रामसोट* उभा करून नागपुरावर चालून आले. यास्तव पांडुरंग गणेश बक्षी याजला वऱ्हाडचे मुक्कामीं पाठवून तेथील फंदी माणसें यांस शकटभेद[1] करून तीं माणसें फंदी धरून मोहरमचे हंगामांत[2] कैद केलें. नंतर त्यांतील कित्येक लोकांस मारलें व कित्येकांस शिक्षा जसा ज्याचा अपराध तशी त्यास करून बंदोबस्त केला.

नंतर तिकडेस होळकराशीं, व शिंद्याशीं परस्परें लढाई होऊन पुण्यावर होळकर चालून जाऊं लागले. त्यावरून बाजीराव रघुनाथ पंतप्रधान याचा संदर्प सेनासाहेबांकडे आला कीं, "होळकराची चाल पुण्याकडे येण्याची दिसते. येविषयीं तुमचें लक्ष आम्हांकडेस अनकूल राहून याचें निराकरण झालें पाहिजे." याजवरून सेनासाहेबांनी श्रीधर लक्ष्मण मुनसी व कृष्णराव माधव चिटणवीस यांची रवानगी पुण्यास सन १२११ चे साली केली.

**सिद्दिक अलिखानः**—ते सालीं सिंहस्थ यास्तव सेनासाहेबांची स्वारी गोदेचे स्नानास चिनुरावरून धर्मपुरीचे वेळयावर गेले. समागमें मातोश्री चिमाबाईसाहेब व सेनाधुरंधर व परसोजी भोंसले कुटुंबासहित व भवानी काळू व गंगाधर माधव चिटणवीस आदिकरून मंडळीसहित जाऊन यात्रा केली. त्या मुक्कामीं, मीरमहंमद टिपूचे भाचे व नबाब महमद सिदक अल्लीखान हे टिपूकडील सरदार मातबर कर्नाटक प्रांतींहून आले. थोर माणसें जाणून सेनासाहेबांनीं जवळ ठेवून, तशी स्वारी माघारी माघमासीं नागपुरास आली.

तशांत गाजीखान यांणी वऱ्हाडांत उपद्रव केला याजमुळें यशवंतराव भवानी शंकर याज समागमें पांच हजार फौज देऊन त्याचे पारिपत्यास रवाना केलें. त्याज समागमें मालजी अहेरराव व नबाब महमद[3] सिदक अल्लीखान हेही नेमिले आणि जाऊन फौजेसहित जामोद किल्ल्यास मोर्चे बसविले. सहा

---

* रामसोट—वऱ्हाडचा इ. पान १९६ पाहा. रामसोट नांवाचें निशाण उभारून गुलाबसिंग हा त्याचे नांवानें खंडण्या घेत असे. ( सं. )

१. फंद फितूर करणें.

२. हागामा—हंगामा—गर्दी, धामधूम.

३. हा पुढें आपासाहेबांच्या कारभारी मंडळांत होता.

महिने लढाई होऊन शेवटी गाजीखान पळून जात राहिला. जामोदचे किल्ल्यांत यांनी ठाणें बसविलें.

अशांत पुण्यावर यशवंतराव होळकर फौजेनिशी चालून गेले. याचें कारण हेंच की, पुण्यावर अमृतराव साहेब व बाजीराव साहेब यांचें वांकडें येऊन फंद जाहला. या प्रकरणांत अमृतरावसाहेबाकडे मोरोबादादा फडणवीस, बाबा फडके असे एक विचार होऊन, यशवंतराव होळकराकडेस संदर्प केला की, "तुम्ही पुण्यास येऊन आमचे मसलतीस अनुकूल होऊन, अमृतराव-साहेबाचे चिरंजीव[1] याजला दत्तविधान करून पंतप्रधानी द्यावी, तुम्हांस ऐवज देऊं आणि शिंदे यांणी तुम्हांकडील मुलूख दाबिला आहे तो तुमचे तुम्हास देण्यांत येऊन, बंदोबस्त करण्यांत येईल. या संधानावरून होळकर पुण्याकडेस आले. त्याचे पिछावर शिंदे याजकडील सरदार सदाशिवराव, यादवराव भास्कररावाचे भाचे, पंचवीस[2] तीस हजार फौजेनिशी व तोफखाना पलटणी घेऊन पुण्यास बाजीराव साहेबांकडेस येऊन पोंहोचले.

**होळकराकडून बाजीरावाचा पराभव**:—होळकराविषयी बाजीराव साहेबांचे पोटांत स्पर्धा येऊन फौजेचा जमाव हुजुरात वगैरे मातबर जमाव केला. लढाईस मुस्तद झाले. त्या प्रसंगी सेनासाहेबांकडील उभयतां कारभारी श्रीधर लक्ष्मण व कृष्णराव माधव चिटणवीस हे पुण्यास होते. यांनीं बाजीराव साहेबांशी सल्लेचे मार्ग बोलण्यांत आणिले की, "आपसांत किसा करून कलह वाढवावा, यांतून नुकसान स्वराज्यांतील, सबब लढाई न करितां सलूख व्हावा." असें बहुत प्रकारें दूरंदेशीचे मार्ग सुचविले असतां, ते बाजीराव साहेबांचे विचारास न येतां लढाई द्यावी हा बेत करून फौजेची तयारी करविली. आणि बाहेर जातीनें निघाले. लढाई घेतली. होळकरांनीं त्या लढाईंत कर्जादी करून शिंद्याकडील पलटणींत तोफखान्यावर चालून जाऊन, पलटणी गारद करून, सदाशिवराव याची शिकस्ती केली व बाजीराव पंतप्रधान यांचेही फौजेचा मोड जाहला. लोक बहुत यांजकडील जायां जखमी

---

१. विनायकराव.

२. दौलतरावाकडून १५ हजार फौज व १० हजार गारद पलटणी सामान तोफा घेऊन पुण्यास आला असें धाकटे शाहूराजे यांच्या चरित्रांत आहे. पृष्ठ ७४ पाहा.

जहाले. मालोजीराजे घोरपडे बाजीराव साहेबांकडील मातबर जखमी जाहाले. ते पाडाव होऊन होळकरांनीं आपलेकडेस नेले. याप्रमाणें होळकरास यश मिळोन, पंतप्रधानाकडील व शिंद्याकडील फौजेची तसनस करून लुटून टाकिली. त्या गर्दीत सदाशिवराव उधळोन शिंद्याकडेस गेले. व बाजीराव साहेब इकडे गेल्यानंतर अमृतरावसाहेब व मोरोबादादा व बाबा फडके एकत्र होऊन होळकरासहित विचार करून बजाबा दादा चिटणविसास साताऱ्यास पाठवून पंतप्रधानीची वस्त्रें विनायकराव यांचे नांवें आणविलीं. त्यावर पेशजी बेत ठरल्यावर होळकरांनी अमृतराव साहेबांस कराराप्रमाणें ऐवज मागितला. आणि खर्चाची अडचण होळकराकडेस फार, तेव्हां सरभराई याजकडून होऊन आली नाही, सबब होळकरांनीं पुणें मुक्कामीं राहून शहरांत गर्दी करून लुटून तसनस बहुत केली.

तशांत वऱ्हाडांत फौज नाही, म्हणून जबलपुराहून वेणीसिंग पलटणासुद्धां यांजला सेनासाहेबांनीं नागपुरास बोलावून वऱ्हाड प्रांतीं सेनासाहेबांनीं त्याची रवानगी केली.

**बाजीरावाचें वसईस प्रयाण**:—उभयतां कारभारी सेनासाहेबांकडील पुण्यांत होते. त्यांस होळकरांनीं संदर्प लावून भेटी झाल्या आणि होळकर यांणी बोलण्यांत आणिलें कीं, " शिंद्याशी व आमच्याशी बेवनाव; त्यांचा गह आमचे मागें आहेच; व पंतप्रधानांशी सांप्रत लढाई होऊन ते वसईस गेले. सांवर धरून येतील, व सेनासाहेबही मदतीस येऊन त्रिवर्ग एक झाले असतां अवघड, हा एक प्रकार; दुसरे, खंडेराव होळकर शिंद्याचे कैदेंत ब्राह्मणपुरी[1] आहेत ते सुटोन यावेत, याजकरितां झाले तें समर्थ, परंतु आतां तुम्ही मध्यंतरी येऊन घरची आपसांतील खलप न वाढतां परस्परें सफाई होऊन एकवाक्यता व्हावी, आणि खंडेराव होळकर कैदेंतून सुटेल, असा विचार घडवाल." अशा कित्येक विचारांचीं बोलणी बोलत असतां, त्या समयीं उभयतां कारभारी यांणी प्रसंगोपात प्रेमाची भाषणें करून, स्नेहाचा विचार होऊन, होळकराचा मनोदय लक्षून, नागपुरास येण्याची त्वरा उभयतांस होतीच, याजवरून होळकराचा निरोप घेऊन सन १२१२ चे सालीं चैत्रमासीं नागपुरास आले.

---

१. बऱ्हाणपूर.

याचे अगोदर सन मजकुरी, अवलसाली उत्तरतीर प्रांती, धामोनीचे[1] किल्ल्याचे संधान आलें याजवरून घाटगे व गोविंदराव त्रिंबक यांणीं जाऊन प्रमोदसिंगाचे विचारें किल्ला हस्तगत केला आणि माघारें जबलपुरास आले.

**रघूजीस शिंद्यांचें पाचारण**:—इकडेस यादवराव भास्कर शिंदे यांजकडून सेनासाहेबांकडेस नागपुरास आले; व बोलण्यांत आणिलें की, " बाजीराव पंतप्रधान होळकराशी लढाई होऊन शिकस्त पावून इंग्रज बहादूर याचीं पटलणे आणावीं याकरितां वसईस गेले. तिकडून पलटणी घेऊन कल्याणास आले. त्यास हे होणें चांगले नाहीं. त्यापेक्षां होळकराचें पारपत्य पंतप्रधान याजला करणे आहे तरी या गोष्टीस आम्ही उद्युक्त आहों, आपण फौजेसुद्धां चलावे, हे न झाल्यास शिंदे बहादूर यांजला ही गोष्ट करणें जरूर आहे. यास्तव ते नागपुरास येऊन आपली भेट घेणें त्याजला अवश्य आहे. " याजवरून सेनासाहेबांनीं आपले ठिकाणीं विचार केला कीं, शिंदे आले असतां आपले मुलुखाची खराबी होईल. हे समजून यादवराव यास उत्तर केले की, " शिंदे याचे येण्याचे कारण नाही, होळकराचे पारपत्य अथवा समेट आपसात करावा हें चांगले आहे. याजकरिता हाच विचार करून बाजीराव पंतप्रधान यांजला बोलावून इंग्रेजांतून अलग करून घेण्याचा बेत करावा, म्हणजे त्यांची पलटणें येणार नाहीत. आपसांतील खलप न राहिल्यास ते कशास येतील ? तत्रापि आले असता त्याचा खर्च बाजीराव पंतप्रधान देऊन माघारे रवाना करितील. आपणास अडचण पडणार नाही. हे करण्याकरितां शिंदे यांणी तिकडून निघावे, व आम्हीही इकडून येतो. पुण्याचे सुमारें चलावें, म्हणजे या जाण्यांत होळकराचा विचार पाहून बाजीराव याजला बोलावितां येईल, म्हणजे पलटणें येण्याचें बंद पडेल, व आपसांतील ही किसा[2] राहणार नाही. " ही बोलणीं होऊन यादवराव भास्कर याजला निरोप द्यावा असें ठरलें. तेव्हां श्रीधर लक्ष्मण मुनसी यांणी मसलत योजिली कीं, " लांबणीवर टाकणेस सल्ला नाही. या प्रसंगी फौजेची तयारी करून चलावें. " ( असें ) म्हणोन निघाले. त्या प्रसंगी कृष्णराव माधव चिटणवीस

---

* नर्मदा उत्तरप्रांत.

१. हा किल्ला सागरापासून सुमारें १५ कोसांवर आहे.

२. लढा, बखेडा.

याचें म्हणणें पडलें कीं, " आपण हरगीज पुढें धावूं नये. आपले सरहद्दींत फौजेचा जमाव ठेऊन आपले जागी मजबुदीनें असावें. या बखेड्यांत पडलें असतां इंग्रज बहादुराशीं विरुद्ध निघेल. "

**शिंदे व भोंसले यांची भेट**:—असें म्हणत असतां न ऐकून सेनासाहेब कूच करून फौजेसहित सेनाधुरंधरासुद्धां उभयतां कारभारी यांसहित निघाले. वराडांतून पुढें चालले. तिकडून शिंदेही फौजेसुद्धां आले. त्यांच्या व यांच्या भेटी मलकापुरानजीक होऊन पुढें जावें तों, होळकराकडेस संधान केले जे, " घरांतील कलह याजमुळें बाजीराव पेशवे तिकडेस जाऊन पलटणें घेऊन येतात, त्यास अव्वलपासून ज्या गोष्टीस जपत होतों तीच गोष्ट परिणामास आली. आतां तरि आपसांतील खलष तुटावी हें चांगलें आहे. " याजवरून होळकराकडील व्यंकटराव कृष्ण बोलावयास आला की, " खंडेराव[१] होळकर बऱ्हाणपुरास शिंद्याचे येथें कैदेंत आहेत तो आमचे स्वाधीन केल्यास तुमचे सल्यानें चालूं. " हा कृत्रिम भाव पोटांत येऊन बोलले. याजवरून शिंदे यांजला सेनासाहेबांनी सूचना करून, खंडेराव होळकर कैदेंतून आणून होळकराकडेस पाठवून दिले. त्याजवळ पोहोचतांच त्यांणी माघारे कूच केले. इतक्यांत पलटणासुद्धां बाजीराव पेशवे पुण्यास आले. आपण पुण्यास राहून वसली[२] साहेब जनरल बहादूर पलटणीसुद्धां व त्यांजबरोबर अमृतराव व गोखले यांस फौजेसुद्धां देऊन यांस होळकर, शिंदे व भोंसले यांजवर चालून आले. आणि मि० कल्याण* साहेब वकील बोलायास सेनासाहेबांकडे आले की, " होळकर याणें बाजीराव पंतप्रधान यांस बेकैदी केलें याजवरून बाजीराव पंतप्रधान यांणी आम्हांस आणिलें आहे; तेव्हां होळकराचें पारिपत्य बाजीराव यांचें सांगण्यावरून करूं. तुम्हीं व शिंदे आपलाले स्थळीं असावें व कूच करून यावें." याजवरून सेनासाहेबांनीं विचार केला की, " कटक मुलूख आमचा, तिकडेस पलटणें येऊन नमुद जहाली. हे इकडेस येऊन आम्हांस जा म्हणतात, यांत काय समजावें ? आमचा विचार की, आपसांत समेट करावा, हें न झाल्यास ज्या तऱ्हेनीं

१. खंडेराव हा मल्हारराव होळकराचा पुत्र.

२. अर्थर वेल्स्ली. हाच पुढें ड्यूक ऑफ् वेलिंग्टन या नांवानें प्रसिद्धि पावला.

* Collins

बंदोबस्त स्वराज्याचा घडेल तसा करावा असें असतां हे आम्हांस मोघमाचे पोटीं 'जा' म्हणतात तेव्हां आपणही यांजला दाबाचें उत्तर द्यावें." हें समजून सक्त जबाब दिला.

**आसईची लढाई**, इ. स. १८०३:—त्याजवरून वकील बंद यांणीं विक्षेप मानून गेले होते त्यांणीं जनरल वेलजली साहेब बहादूर राक्षसभुवनावर होते त्याजला येथील बोलणें निवेदन केल्यावरून त्यांनीं कूच करून चाळीस कोस येवून मोकबला हरदोहों फौजेशीं घालून लढाईस सिद्ध झाले. व नबाबाची फौज बरोबर घेऊन कर्नल ष्टेविनसन* साहेबही चालून आले. ते समयीं अकस्मात् शिदे यांणी आपलें पलटण व तोफखाना वगैरे फौजेसुद्धां पुढें होऊन नालनी मुक्कामी लढाई सुरूं झाली. हें सेनासाहेबांस समजतांच पस्तावा केला की, "हें नीट झालें नाही. जेथवर बनेल तेथवर समेट करून पहावी." परंतु शिंदे यांणीं लढाई सुरू केली तेव्हां लाचार होऊन शेवटी कजाई दिल्ही.

**गाविलगडची लढाई**, इ. स. १८०३:—लढाई समस्त झाल्यावर सेनासाहेबांनी खानदेशांतून व्यंकोजी भोसले सेनाधुरंधर यांजला गायेलचा[१] बंदोबस्त करण्याकरितां पाठविलें. समागमें सरदार बेनीसिग, विठ्ठल बल्लाळ मुभेदार, व गोविंदराव त्र्यंबक, व आनंदराव* कोठेकर वगैरे मानकरी जमावासुद्धां, त्यांत बक्षी पांडुरंग गणेश, अशा जमावांनी रवाना केले. ते समयीं सेनासाहेबाचा इरादा टाळा देण्याचा. इतक्यांत एकाएकी बंगाल्यांत कटक प्रांती ठाणें बसलें. तेव्हां श्रीधर लक्ष्मण मुनसी व कृष्णराव माधव चिटणवीस हे उभयतां कारभारी, यांजपैकीं चिटणवीस मशार निल्हेचा सल्ला की, "लढाई कामाची नाही ;" व मुनशीचे मनांत "एक वेळ लढावें." असें उभयतां कारभारी यांचे फाट घेण्यामुळें मसलतीस धक्का बसला. त्याजवर सेनासाहेबांनी चिटणवीस मशार निल्हेस सल्ला विचारली कीं, "आतां कसें करावें ?" त्या प्रसंगी उत्तर विनंतिपूर्वक करून सल्ला दिली , "चिंता नाहीं. अव्वल मसलत चुकून नाशास पावली, साधन कांही एक झालें नाहीं. बंगाला तो गेला. तेव्हां आतां लाचार, घाबरूं नये. आपण गनीम आहेत

---

१. गाविलगड. * Stevenson

२. यांच्याकडे गंगथडीचा सुभा ११९९ ते १२१३ फसलीपावेतों होता.

दिवस घ्यावेत. समेट करूनही फल नाहीं. तत्रापि बनल्यास करावें." तेव्हां मुनसीनीं पुनरपि सल्लेचा डौल करून सेनाधुरंधर यांजला, सेनासाहेबीं गायलगडचे बंदोबस्तास बिदा केलें होतें, त्यांणी लक्ष सेनासाहेबांचे सांगण्यावर ठेविलें. परंतु पुनः लढाईच होऊन सेनाधुरंधरांचा मोड झाला. गायलगडास[१] ठाणें इंग्रजाचें बसलें.

**देवगांवचा तह**, इ. स. १८०३:—तशांत सेनासाहेब मातोश्री चिमाबाईसाहेबांनीं लिहून पाठविलें कीं, "जें झालें तें समर्थ. आतां सल्ला करणें चांगलें आहे." ते काळी यशवंतराव रामचंद्र यांजसमागमें अनंतराव माधव व कृष्णराव माधव चिटणवीस यांजकडून पाठविले. वशिष्टेपारचा मुलूख, बंगाला, व कटक देऊन तह* सन १२१३ चे साली मार्गशीर्ष मासीं झाला.

---

# भाग ५ वा

# दुसरा रघूजी

(पुढें चालू)

तशांत एकाएकी पांडुरंग गणेश बक्षी याचा काल झाला व स्वारी माघारी फिरली. ते भारंगीचे मुक्कामी कृष्णराव माधव चिटणवीस याजला नवज्वर होऊन देवाज्ञा झाली. मग श्रीधर लक्ष्मण मुनशीजीचे विद्यमानें करारमदार होऊन सेनासाहेब नागपुरास आले. नंतर गंगाधर माधव चिटणवीस आतां हजर आहेत. त्याचा कारभारी चिटणविसाचा वाकफगार म्हणून नारायण यशवंत, कृष्णराव माधव चिटणवीस यांचे पदरचे मुतालकीचे

---

१. "गाविलगड हल्ला करून तोफा लावून इंग्रज याणी घेतला. भोंसले यांची सर्व दौलत तेथें होती ती इंग्रज बहादर यांस सांपडली. भोंसले याणीं तह केला. वराड घेऊन मोंगलास दिला व बागलाण प्रांत इंग्रज याणीं घेतला. नागपुरी पलटणें वकील राहावें ऐसें केलें." धा० शाहूचें च० पृष्ठ ८२ पाहा.

२. देवगांवचा तह.

कामीं होते, याजवर लोभ होऊन, वहिवाट चालली. मुनसी सर्वाध्यक्ष परंतु सेनासाहेबांचे मनांत मुनसीविषयी वैमनस्य आलें. कारण यादवराव भास्कर आले ते वेळेस यांचे सल्लेनी निघणें होऊन त्यांतून हा प्रकार घडला. यांजमुळें अंतःकरणांतून खुलासा नाही. परंतु सेनासाहेबांची खबर कीं, "जे वाढविले माणसास एकाएकी कसें मोडावें" याजमुळें उघडें दिसूं दिलें नाहीं. फौजा इंग्रज बहादूरांशीं लढाया होऊन माघाऱ्या फिरल्या.

ते वेळेस मागाहूनच रवाना केल्या, त्या जाऊन वजीर महमदखानाशी[1] लढाई हुसंगाबादेचे मैदानांत झाली. तिकडोन घाडगे भवानराव बाजी, व भगवंतराव बाजी आले. त्यांशी सोहागपूरचे मुक्कामी वजीर महमदखान याशी लढाई झाली. भगवंतराव बाजी घाडगे याजला जखमा लागून, नंतर तसेच सर्वत्र मिळोन हुसंगाबादेस जाऊन पुनः लढाई झाली. याजवर वजीर महमदखान सिकस्त होऊन भोपाळास गेला. नंतर सखाराम अवधूत व मालजी अहिरराव हे हुसंगाबादेचे समोर राहिले. घाडगे[2] व गोविंदराव त्रिंबक बक्षी हे एकीकडेस[3] गेले तेथें याजवर पेंढारी यांचा दंगा झाला. तेथून निघोन आपला जमाव समेटून पेंढाऱ्यांशी लढाई घेतली. माघारे फत्तेपुरास आले. तो सखाराम अवधूत व मालजी अहिरराव यांजवर गर्दी पेंढारी यांची होऊन हेही अफरातफरा झाले. तेथें सखाराम अवधूत यांची छावणी शहापुरानजिक हातनापुरावर झाली, व गोविदराव त्रिंबक बक्षी नागपुरास आले.

व घाडगे जबलपुरास गेले तों तेथें भवानराव बाजी घाडगे यांचा काल चैत्रमासीं झाला. त्या दुःखांत रघुनाथराव बाजी घाडगे यांचा देहअवसान जेष्ठ शुध्द पंचमीस झाला. याजवर जबलपूरचे सुभ्याचें काम त्यांचे चिरंजीव नारायण बाजी घाडगे यांजकडेस सन १२१४ चे साली सांगितलें. तीर्थरूपाप्रमाणें सुभ्याची बहाली करून खिलत दिली. बक्षीगिरीचे कामीं राजाराम राघव यांस नेमून बिदा केलें.

त्या सालीं नागोजी बाजी होळकराकडील सुभा जब्बलपुरावर चालून

१. हा भोपाळवाला नबाब.
२. रघुनाथ बाजीराव घाडगे याचा मुलगा भवानराव घाडगे.
३. चैनपूरवाडीकडे गेले.

आला त्याशीं लढाई होऊन त्याचा पराभव होऊन फौज लुटली गेली. त्याच्या तोफा व कारखाना नौबद वगैरे पाडाव करून आणल्या. त्या घाडगे मशारनिल्हे यांनीं सेनासाहेबांचे सरकारांत पाठविल्या. नंतर माघमासी लढाई पेंढारी यांशीं जब्बलपुरीं झाली. त्यांत यशवंतराव नाईक यांचे चिरंजीव पराजी नाईक निम्बाळकर व यशवंतराव शिंदे व जयरामराव घाडगे कामास[१] आले.

**पेंढाऱ्यांचा उपद्रव**:—तशांत दक्षिण तीर इकडेस पेंढारी यांणीं उपद्रव करून सिवणी हुसंगाबादेस फौजा मालजी अहिरराव वगैरे होतेच, तेथून अहिरराव मशारनिल्हेची फौज लुटली गेली होती, त्याची पुनः सेना साहेबांनी उस्तवारी करून अहिरराव याजला वस्त्रें देऊन याची रवानगी सिवणीछपारे इकडे करावी याजकरितां भानेगांवावर सेनासाहेब राहून, फौजेचा कबजा घेणे, व पुढचे हिशेबाचे रुजू करणें जरूर होतें. याची मागील माहितगारी पांडुरंग गणेश बक्षी हे मृत्यु पावले होते. या कामास माणूस मातबर हुषार पाहिजे, या प्रयत्नांत सेनासाहेब असतां लोकांचे दंगे बखेडे होऊं लागले. यास्तव नबाब महमद सिदक अल्लीखान मातबर सरदार याजला योग्यतेनें सेनासाहेबांनी पेशजी बंदोबस्त करून ठेविलें असतां सल्ला विचारली की, "वऱ्हाड व बंगाला दरोबस्त मुलूख गेला. राहिला तो तुम्हांस माहित आहे. कंपनी बहादरांशी कोण्या डौलानी चालावें आणि फौजेचें देणें कसें तोडावें व बदोबस्त कसा करावा, याचा सल्ला काय ?" तेव्हां यांणीं उत्तर केलें की, "फौजेचा मजकूर अवघड नाहीं. कोणापासून कबजे मिळतील ते देववितों. यास तूर्त ऐवज देणें याची तजवीज वराता चिटचा करून देऊं. ज्याचे जिमेस जी फौज त्याला त्या प्रांतीं, त्या जिल्हयांत ऐवज लावून देऊं त्या फौजेची चाकरीही तिकडेसच, व ऐवज घेणेंही त्या सरदाराकडेसच, त्यांनी सांभाळून राहावे, याचें अवघड नाही. इंग्रज बहादुराशीं तह व करारमदार झाले आहेत. यांतून त्याजशीं फाट घेऊन एखादी गोष्ट केली असतां बिलकुल चांगलें नाहीं. चहूंकडे याचा पसार भारी, दुय्यम आपले सरकारचा व कंपनी सरकारचा सिलसिला राहतांना दोस्ती अवलपासून चालत आली. होळकराचे प्रकरणा-

१. या लढाईत राजाराम राघव कामास आले. ( अ ) बखर.

वरून बिघाड होऊन असा प्रकार झाला. असो. आतां त्यांचे पोटांत आपले सल्लोखी पडे अशा रीतीनें दिवस घेऊन एकादे प्रसंगी त्याजला खुष करून, बंगाले अथवा वराड दोहींतून एखादा प्रांत सोडवून तेच तेतील. त्याचे मर्जीचा संतोष झाला नाही तोवर हें घडणार नाहीं. याजवर खावंद, सांगतील तसें करावयास येईल." ही सल्ला सेनासाहेबांनी नारायण यशवंत चिटणवीस पेशजीपासून वाकफगार याजला एकांतीं घेऊन सल्ला पसंत केली आणि नबाब सिदक अल्लीखान यांचे हाती अवग्र फौजेचे कबजे घेऊन हिशेबाची रुजूफैसल्ला शिवराम काका बक्षीचे दफ्तरावर करून चिटऱ्या वराती[१] करून ऐवज जिकडील तिकडे फौजेस देवविला आणि मालजी अहिरराव यांची रवानगी सिवनीछपारेकडेस केली.

सेनासाहेब भानेगांवावरून नागपुरास आले. नंतर पेंढारी यांनीं रामटेंक व भानेर[२] वगैरे लुटून उपद्रव केला आहे, व राव मशारनिल्हे यांची फौज तोंडावर असतां कांहीं झालें नाहीं तेव्हां सेनासाहेबांनी मालजी अहिरराव यांजला नागपुरास बोलाविलें. नबाब महमद सिदक अल्लीखान याजला अवग्र फौजेची मालकी सांगितली. नबाब सिवनीपर्यंत गेले. तों दुसरा धाडा[3] पेंढारी यांचा आला. तेव्हां नबाब मशारनिल्हे यांजला बातमी समजतांच, दोन तोफा व दोन हजार फौज सारे सरंजामांनी घेऊन सिवनीछपारे येथें ठेविली, आणि आपण त्या पेंढारी याचे पिच्छावर चालून आले. ते पेंढारी यांस उसंत पडू न देतां मुक्काम असा देऊं दिला नाही; त्यांचा पिच्छा न सोडितां नागपुराभोंवताले फिरून पेंढारी निघोन नर्मदेवर गेले. तों नबाब पिच्छावरच होते. पेंढारी याची जागजागीं गाळण झाली, तेव्हां छावणीचे दिवस आले. हें जाणोन सेनासाहेबांनीं आज्ञा दिली, "दक्षण तीरांत चांगली जागा पाहून छावणी करावी." तेव्हा हातनापुरावर शाहपुरानजिक छावणी करून नबाब राहिले.

ते काळीं दौलतराव शिंदे ब्राह्मणपुरावर थोडकेसे जमावानिशीं होते, त्याजकडून बाळाजी यशवंत वकिलीस आले, त्यांची दौलत खराबींत आली

१. पैसे देण्याबद्दल प्रांतांतील अधिकाऱ्यावर हुकूम.
२. भंडारा. ३. टोळी.

कर्ज मागूं लागले व बोलणें पडलें कीः—" पंचवीस लक्ष कर्ज द्यावें यांत कांहीं प्रांत तुम्हांस लावून देतों. जोंपर्यंत ऐवज फिटे तोंपर्यंत मुलूख तुमचेकडे राहील." याजवरून सेनासाहेबांनी उत्तर केलें कीं:— " भोपाळकरांनीं हुसंगाबादेस आमचा अम्मल असतां पुनः त्यांनी आपला अम्मल बसविला, त्याकडेस दाया[1] आमचा तीन पुस्त्यांचा आहे, याचा सल्ला काय ? " तेव्हां त्यांणी उत्तर केलें जे:—" पंतप्रधानांनी हिंदुस्थानाचे पोटी माळवेप्रांत आमचे ताब्यांत केला आहे. मुबसफाचें पारिपत्य करून अंमल बसवावा. त्यास हें करणें आम्हांसही जरूर आहे. भोपाळकराचें बोलणें आमचे येथें हमेशा पडत आहे की, हिस्सेरसी ठरावून अंमल करावा, याजवरून शिंदेसाहेब तुमचे कामास कसूर करणार नाहीत. जर, तुमची फौज मदतीस द्याल तर तुम्हास निम्मे वाटणी मिळेल." असा करारमदार सेनासाहेबांचा व शिंदेसाहेबांचा ठरून सोळा लक्ष रुपये कर्ज सेनासाहेबांनी दिलें. यांत शिंदे यांणी महाल लावून दिले. आसोद, धरणगांव, चोपडें खानदेशांतील. याप्रमाणें होऊन बाळाजी यशवंत शिदे यांजकडून व बापूजी यांस सेनासाहेबांनीं आपले-कडून वकिलीस येथें याची रवानगी शिदे यांजकडे केली. याणें जाऊन निश्चय ठरवून उत्तर हें आलें की, " फौज मदतीस माळवेप्रांती रवाना करावी. यावरून सन १२१५ सालीं नबाब महमद सिदक अल्लीखान यास सेनासाहेबांनीं लिहून पाठविलें की, फौजेसहित नर्मदा उतरून चेनपूरबारीस जावें आणि गणपतराव[2] विठ्ठल सुभेदार यांजला जरीपटका देऊन फौज ताब्यांत करून हुशंगाबादेस रवाना केले. ते छावणी करून हुशंगाबाद अलिकडे कोसल्याचे मुक्कामीं राहिले होते. बादबरसात[3] हुशंगाबादेस मोर्चे बसवून लढाई न होतां टाणें घेतलें.

**हुसंगाबादेस वेढा**:—ते सालीं गोविंदराव बक्षी यांजला जबलपुरास रवाना केलें. तेथून धामोनीस जाण्याची आज्ञा झाली. याजवरून तिकडेस

---

१. दावा, हक्क.

२. हे कोंकणस्थ ब्राह्मण. यांचें उपनांव परांजपे. यांचा बाप बिठ्ठल बल्लाळ हा खडर्याचे लढाईत भोंसल्यांचा सेनापति होता. वंशज पातूर-नंदापूर ( वऱ्हाड ) येथें आहेत. (सं.)

३. पावसाळा गेल्यावर

जाऊन शिंद्याचीं पत्रें आलीं कीं, त्या प्रांतीं आमचाही ऐवज घेणें आहे तो वसूल करून दिला पाहिजे. याजवरून सेनासाहेबांचे आज्ञेची उरता केली. तेव्हां त्यांणीं नागपुराहून पत्रें आणविलीं. त्या हुकुमावरून सागर कटर येथें उपद्रव देऊन शिंदे यांजकडून ऐवज वसूल करून दिला. पुढें नबाबाचे जंबूस नर्मदा उतरून गेले होते. जनार्दनजी बाजी शिंदे याजकडून फौजे-निशी त्या प्रांतीं आले, आणि बाडीस ठाणें बसवून चौकीगडास नबाबाचे मोर्चे बसविले. तों सेनासाहेबांनीं नबाबास लिहिलें जे, "उभाउभीं हुशंगाबादेस जाऊन ठाणें दाखल झालें हें पाहून मग चौकीगडास जावें." याजवरून नबाबानी सडी फौज तिकडेस ठेवून जुजबी सरंजाम घेऊन हुसंगाबादेवर आले. तेव्हां हुसंगाबाद घेतली. ती नबाबांनी किल्ला पाहून तसेच चौकीगडास जाऊन मोर्चे बसविले. हल्ला करून चौकीगड घेतला. नबाबाकडील माणसें चांगलीं कामास आलीं. नंतर नबाब नागपुरास येऊन सेनासाहेबांची भेट घेतली. सेनासाहेब बहुत संतोष पावले.

त्या सालांत मि० जेंकिनसाहेब बहादूर शिंद्याचे येथें होते. ते तेथून छत्तीसगडचे मार्गे नागपुरास आले. मि० आल्फिन्स्टन[१] साहेब यांशीं, वकिलीचे कामीं ठेविलें होतें. त्यांचा व सेनासाहेबांचा स्नेह व घरोबा चांगला चालला. ते नागपुरास[२] होते ते पुण्यास गेले.

याप्रमाणें झाल्यावर नबाब महमद सिदक अल्लीखान याजला सेना-साहेबांनीं वस्त्रें देऊन दक्षिण तीरास पाठविलें. यांणीं जाऊन छावणी नर्मदेचे कांठीं केली. इतक्यांत इकडे उत्तर तीर जब्बलपूरचा बंदोबस्त करण्याकरितां हरबाजीपंत कतरनी याजला सन १२१७ सालीं पाठविलें. याशीं व नारायणराव बाजी घाडगे यांशीं 'अनबनांव[३]' होऊन शेवटीं सेना-

---

१. Elphinstone.

२. "जेकिन्ससाहेब येथें आल्यावर मि० आल्फिन्स्टन साहेबांनीं सेनासाहेबांची भेट करून देऊन आपण चार दिवस जातीनें राहून, त्यांचा व सेनासाहेबांचा घरोबा चांगला लावून देऊन आपण निरोप घेऊन जबल पुराचे मार्गे गेले. राजासाहेबांनीं त्यांच्या दोस्तीची आठवण फारच केली. (आ) बखर.

३. बेबनाव.

साहेबांनीं घाडगे मजकूर यांस नागपुरास बोलाविलें. त्यांचें येणें होऊन बोलणें निखालसपणेंच झालें. पुनः मागती उत्तर तीरचें काम नारायणराव बाजी घाडगे याजला सांगून ऐवजाचा भरणा जबलपुरांतून आणावा याकरितां सरकार पागासहित रंगो रघुनाथ बेहोष समजून बाजीराव मोहसल करून पाठविलें. नबाब सिदक अल्लीखान याजला पेशजी रवाना केलें होतें, ते फौजेसुद्धां नर्मदा उतरून 'बाडीस' गेले होते. तेथें यशवंतराव दत्ताजीस नबाबाकडील फौजेचे बक्षिगिरीचें काम सेनासाहेबांनीं दिलें. त्याजला तेथें ठेवून आपण फौजेनिशीं भोपाळास जावें, त्याची ऐक्यता झाली.

**शिंदे-भोंसल्यांनीं भोपाळ घेतलें,** इ. स. १८०७:–इतक्यांत रोज महमद भोपाळवाले यांचा संदर्प आला कीं, जलद यावें आम्हांस जाचणी वजीर महमदखान यांणीं बहुत केली आहे. याजवरून सेनासाहेबांची व शिंदे बहादुरांची फौज हर्दो सरदार भोपाळास जाऊन लढाई न होतां ठाणें दाखल झालें तेव्हां वजीर महमदखान यांणीं टाळा देऊन रायसेनास गेले.

भोपाळाचे अम्मलाची वांटणी पुढें ठरावी इतक्यांत शिंदेवाल्यांनीं कांहीं बखेडा उभा केला. ह्यास्तव नागपूरचें बोलावणें सेनासाहेबांचें आलें. सबब नबाब महमद सिदक अल्लीखान नागपुरास येऊन पोहोंचल्यावर मागें वजीर महमदखान यांणीं जमावासुद्धां येऊन ठाणें सेनासाहेबांकडील व शिंद्याकडील जमीयत भोपाळचे ठाण्यांत दाखल होती याजवर गर्दी करून ठाणें उठवून देऊन आपला अम्मल बसविला.

नंतर नबाब सिदक अल्लीखान याचे भाऊ रोज महमदखान याची रवानगी बादबरसात सेनासाहेबांनीं फौजेसुद्धां केली. ते नर्मदा किनाऱ्यास जाऊन मुक्काम करून होते. तशांत नबाब सिदक अल्लीखान याजला दक्षिण तीर व भोपाळ सुभा नेमस्त करून वस्त्रें व मोत्यांची कंठी, शिरपेंच, शिक्के, कटार दिली. दरकदार यशवंतराव दत्ताजी बक्षीगिरीवर पहिले होते ते नेमिले. व व्यंकट नरसू फडणविशीचे कामीं व राघोबा सदाशिव चिटणविसचे कामावर हल्लीं नेमले. असें होऊन रवानगी झाली. त्या संधींत पेंढाऱ्यांची दौड नागपुरावर आली. सबब नारायण आप्पाजी रिसालदारसहित सडे पांच हजार फौजेनिशीं पेंढारी यांचा पाठलाग करून नर्मदेपर्यंत जाऊन पारिपत्य

केलें. तेथून नबाब फिरले ते दक्षिण तीरास आले. याजवर नारो आप्पाजी सेनासाहेबांजवळ नागपुरास आले.

इकडेस व्यंकोजी भोंसले सेनाधुरंधर यांणी मातोश्री चिमाबाईसाहेब अमरकंटकास जाण्यास उद्युक्त झाले याची सल्ला घरकृत्याची पुसावयाकरितां सेनासाहेबांनीं खान मजकुरास बोलाविलें व त्यांसहित भोपाळ प्रकर्णी आदि-करून मजकूर बोलायाकरितां सखाराम महिपत याजला नबाबाकडेस सेनासाहेबांनी रवाना केलें. ते जाऊन पोहोंचावे तों तिकडून नबाबही आले. मार्गांत श्रीनगराजवळ यांची व त्यांची गांठ पडून नागपुरास आले. नबाबा-कडील जबाब सखाराम महिपत यांचे हाती होऊं लागले. तेव्हा सेनासाहेब नबाबास बोलले की, " नर्मदेचे स्नानास मातोश्रीसाहेब व नानासाहेब जातात, याची सल्ला काय ? " त्याजवरून नबाबांनी उत्तर केलें जे, " मर्जीस असल्यास द्क्षिण तीरी स्नान करून येणें हेही चांगलेच आहे. " ह्यावर नानासाहेब सेनाधुरंधर यांचें म्हणणें पडलें की, " अमरकंटक छत्तीसगडास आहे, आनायासें तिकडील बंदोबस्त करणें जरूर आहे व नर्मदास्नानही घडेल. " याजवरून नारायण यशवंत चिटणवीस याजवर सेनासाहेबांचा लोभ विशेष यांणी व नबाबांनीं सल्ला दिली कीं, जे " चिंता नाही. " अमरकंटकाहून स्वारी मातोश्रीसाहेबांची रवानगी केली तिकडून माघारे माघमासीं आले.

**पेंढारी**:—तशांत मीरखान यांणीं सेनासाहेबांचे मुलखांत येण्याची चाल धरली आणि त्याजला सामील अवघ्र पेंढारी होणार असें ऐकिले आणि सेनासाहेबांनी आपले ठिकाणीं विचार केला कीं, पेंढारी यांचा उपद्रव, दरसाल आपले येथें होतच आहे. हल्ली मीरखान यास सामील झाल्यास मसलत जड पडेल. तेव्हां याचा बंदोबस्त करावा याजकरितां उदाजी नाईक नवघरे व जयराम रामचंद्र हे उभयतां पेंढारी यांजकडे रवाना केले. हे गंगेश्वरीस जाऊन महंताचे विद्यमानें राजमहमदखान व मिरजाखान व कमालखान ऊर्फ सिद्धु याजकडील खानमहमद याशीं संधान केलें. याजवरून त्याचें बोलणें पडलें कीं, " मीरखानासमागमें येणें होईल, परंतु त्याजवळ राहून लढाईचे प्रसंगी मीरखानास दगा होऊन सेनासाहेबांचे सरकारची चाकरी करून दाखवूं. हें झाल्यास सरकारांतून सरफराज करावें व जाहगीर

देववावी म्हणजे राजन[१] व सिद्दु या दोही धड्यांपैकीं पेंढारी याचा उपसर्ग लागूं देणार नाही व होळकरशाईपैकीं जमीयत करीमवाले व दोषमहमद इकडे चाल धरूं लागल्यास त्याचे पारिपत्याचे उपयोगी पडूं." असें सेनासाहेबांशीं बोलणें पडलें. याजवरून सेनासाहेबाकडील उत्तर पडलें की, "फार चांगलें आहे, चाकरीचे उपयोगी पडावें. चाकरी करून दाखववावी, म्हणजे सरफराज करण्यांत येईल." असें टरल्यावरून पुढें सन १२१९ सालीं ज्येष्ठमासीं वजीर महमदखान व मीरखान मिळून बाडीवर आले तेव्हां फौजेचा जमाव भारी. नरहरराव दत्ताजी नबाबाकडून बहुत फौजेनिशीं होते तेथें मीरखानाशीं लढाई होऊन खान मजकुराचा मोड झाला. वजीरमहमदखान माघारे गेले. व मीरखान देशीं प्रांतांतून होऊन सागरचे सुमारे चालविलें. वजीरमहमद-खान बाडीहून निघाले ते पलब्याचे सुमारे झेंकोलीचे घाटांनीं नर्मदाकिनाऱ्यास येऊन गोषमहमदखान नबाबाचे भाऊ, सेनासाहेबांकडील फौज होती, त्याशीं वजीरमहमदखान यासी लढाई झाली. गोषमहमदखान यश संपादून माघारे येताना कांही शीक वजीरमहमदखानाकडील अदकोसावर नर्मदेकिनाऱ्यास होते. त्यांनीं दगा करून गोषमहमदखान मारिले. फौज उधळली.

ते काळी इकडेस मीरखानाचें वर्तमान ऐकून सेनासाहेबांनीं नबाब महमद[२] सिदक अल्लीखान यांजला फौज देऊन रवानगी मीरखानाचे पारिपत्यास्तव केली. ते पाटणसांवगीचे मुक्कामीं होते. तेथें सेनासाहेबसुभा यांची स्वारी नारायण येशवंत चिटणवीस यांजला घेऊन जाऊन नबाबाचे रवानगीचा सिद्धांत ठरविला. तेथून कूच होऊन नबाब आधाशासेस[३] गेले. समागमें गोविंदराव त्रिंबक याजला घेऊन जाऊन नबाबाचे तैनातीस नेमिले व सेनासाहेब नागपुरास आले.

इतक्यांत वर्तमान गोषमहमदखान याचे अखेरीचे आलें. त्याजवर पुन्हां आधाशास जाऊन नबाबाची ताजीयत[४] खात्री करून गोषमहमदखान

१. राजमहमद याचें टोपण नांव रंजन असेंही आढळतें.

२. मागें पृष्ठ २०४ पहा.

३. आधाशें–हें खेडें नागपुरापासून ८ कोसांवर आहे. येथें गणपतीचें स्थान आहे.

४. पुरी; बालंबाल.

याचे चिरंजीवाचे नांवें तीन हजारांचे गांव दोन, ज्यान-परवर्दी सदैव चाले असे करून दिल्हे. आणि नबाबास मागें फिरवावें असा बेत सेनासाहेबांचे चित्तांत असतां, मीरखानाचे शहास, जाणें रवानगी करून सेनासाहेब नारायण यशवंत समवेत नागपुरास आले.

पुन्हां बातमी आली कीं, मीरखान नर्मदेच्या किनाऱ्यास येऊन घाट उतरावयाचे बेतांत आहे. चाल जबलपुरावर दिसते. यास्तव मसलतीचे कित्येक पर्याय सुचविणें व आपले मुलखाचा बचाव होऊन मीरखानाचें पारिपत्य झालें पाहिजे, याजवरून नारायण यशवंत चिटणवीस याजला शहापुरास नबाबाकडेस रवाना केलें. व सखाराम महिपत याजलाही समागमें दिले आणि सांगितलें कीं, "यांनीं नबाबाजवळ राहून मजकूर ध्यानांत ठेवीत जावा." व बराबर जरूर बारदारीस सरंजाम शंभर स्वार दिले. ते नबाबापाशीं पोंचून भेटी झाल्या. अवग्र मसलतीचे पर्याय सुचविले. नबाब तुमच्याकडून हुशंगाबादेकडे गेले. नारायण यशवंत नागपुरास आले.

नबाबानी बाडीस नरहरपंतानी तीन हजार फौजेनी ठेविले. यशवंतराव दत्ताजी याजला फौजेसुद्धां तीन हजार लोक येऊन पलटणाचे मुक्कामीं ठेविले. हुशंगाबादेस मिरजारजोबांग किल्लेदार यास ताकीद मजबुदीनें राहण्याविषयीं करून मजलदरमजल, नबाब श्रीनगरास आले. मार्गात गोविंदराव त्रिंबक बक्षी याजला तीनवारे[1] घाटावर फौजेनिशीं रवाना केले. ते नर्मदेस उतार नाहीं याजमुळें त्याचें उतरणें पैलवार झालें नाहीं. मीरखान येऊन जबलपुरास दाखल झाले. त्याचे समागमें पेंढारी सेनासाहेबांचे संधानावरून लागूच होते. जबलपुरी नारायण बाजी घाडगे होते. जमाव फौजेचा त्याजपाशी थोडा; मीरखानाकडून फौज भारी, हें जाणून नारायण काशी काळीकर यानीं घाडगे याजला सल्ला दिली जे, या प्रसंगीं लढाई करणें नीट नाहीं. याजवरून मशारनिल्हे जमावासुद्धां तोफा वगैरे अजबाव घेऊन, मंडल्याचे मार्गानें निघाले. ते प्रथम कुसमघाटावर मुक्काम केला. तेथें खानमजकूर याजकडील वकील बोलावण्यास घाडगे याजकडे आला व सरंजाम कितीक आहे हेंही बातमी द्वारें पाहावयास आला. त्यामार्गे फौजही त्याची आली. ते दिवशीं मुकाबला गोळागोळी होऊन रात्रीं कूच करून घाडगे

१. तिलवाडा.

निघाले, तों घाटावर ताफे उतरण्यास दिरींग लागला. तशांत मीरखानाकडील दाराशाखान मोहवाले यानीं आपले जमावानिशीं जाऊन गांठ घातली. जमाव घाडगे मशारनिल्हे यांजपाशी जुजबी, समागमें रंगो रघुनाथ सुभ्याचे कामें पेशजी पाठविले होते तेही तेथें समागमें होते. व मुरादखान पागे हेही होते. त्याच प्रसंगीं मीरखानाचे फौजेशीं लढाई होऊन घाडगे नारायणराव बाजी व नाईकजी बाजी हे उभयतां बंधु यांजला जखमा लागल्या आणि शिकस्त होऊन मंडल्यास गेले.

**मीरखानाशीं लढाई** :—मीरखान जबलपुरास होते. यानीं श्रीनगरहून येण्याची चाल धरिली. नर्मदा उतरून श्रीनगराजवळ येऊन मुक्काम केला. तेथें नबाब सिदक अल्लीखान याचा मुक्काम होता. ते वेळेस मीरखानाचें बोलणें नबाबाशीं जमसेरखानाकडून पडलें कीं, "आम्हांस जसे होळकरसाहेब तसेच सेनासाहेब मानले आहेत. आमचे फौजेचे खर्चाचा बलवा आहे, याजकरितां आमचे खर्चाची मदत करावी." त्याचें नबाबानी उत्तर केलें की, "तुम्ही खर्च काय म्हणोन मागतां? सेनासाहेब यानीं काय समजून द्यावें. हें समजल्यावर उत्तर करण्यांत येईल." याजवरून त्याचें बोलणें पडलें कीं, "होळकर सरकारची दौलत तुमचे सरकारांत राहिली आहे त्याऐवजीं मजुरा देऊं." तेव्हां नबाब यानीं आपले जागी विचार केला कीं, आपली फौज पंधरा हजार आणि खर्चाची अडचण व मीरखानापाशीं फौज तीस हजार आहे, व सेनासाहेबांचा मुक्काम रामक्षेत्रावर[1] आहे त्याचे व आपलें दरम्यान फौज बिलकुल नाहीं, याजकरितां चार दिवस खानमजकुरास नादीं लावून आपले फौजेचा बंदोबस्त, खर्चास देऊन करावा व त्याजला युक्तीचे वाटेनें नर्मदेचे पलीकडे घालवून मग लढाई घ्यावी." हें मनांत आणून होळकर नर्मदेपलीकडेस जाऊन लढाई नमूद करण्याकरितां जबलपुराची लूट मीरखानानें केली होती ती मिळण्याविषयीं लिहिलें करून घ्यावें असें मीरखानास धाडी पोसाणी बोलून अवग्र मसलतीचे भाव बेताप्रमाणें, सेनासाहेबांस विनंति करून समजावून घ्यावें याजकरितां, सखाराम महिपत याची रवानगी सेनासाहेबांकडे केली; याजवरून मशारनिल्हे रामक्षेत्रास येऊन सेनासाहेबांस सविस्तर अर्ज केला. तेव्हां नारायण यशवंत

---

१. रामटेक.

याचे सल्ल्यानें अमृतराव पांडुरंग याची रवानगी फौजेंसहित नबाबाकडेस केली. आणि ताकीद लिहिली कीं, "नबाब सांगतील तशी वर्तणूक ताबेदारींत राहून करावी," व सखाराम महिपत याजसमागमें फौजेचे खर्चास नबाबाकडेस नगदी लाख रुपये देऊन व बारीक मोठे मसलतीचे मार्ग सुचवून नंतर रवाना केले. तों तिकडे मीरखानाचें बोलणें नबाबाकडेस आलें कीं, "सेनासाहेबांचे पत्राचें उत्तर येईपर्यंत कांहीं थोडें बहूत खर्चास द्यावें." यांणी उत्तर केलें की, "तुम्ही कूच करून नर्मदेपलीकडे जावें. सेनासाहेबांचा लेख येईल त्याप्रमाणें करण्यांत येईल." तेव्हां मीरखान यांनीं सांगून पाठविलें कीं, "तुम्हींच ठराव करावा." तेव्हां नबाबांनीं मनांत आणलें कीं "कोणते तऱ्हेनें लढाई नर्मदेपार घालावी, याजकरितां कांहीं द्रव्यही द्यावें, व पुढें त्याजपासून जबलपूरचे लुटीचें नुकसान भरून घ्यावें," असें ठरविलें. हें वर्तमान सेनासाहेबांस बातमीचे द्वारें समजलें.

**मीरखानाविरुद्ध इंग्रजांची मदत**:—तशांत इकडे रामक्षेत्रास सेनासाहेब असतां इंग्रज बहादूर यांनीं मनांत आणिलें कीं, सेनासाहेबांची व आमची दोस्ती आहे, तेव्हां असे अडचणीचे वेळेस आपण सेनासाहेबांची मदत करावी. इहसान करून दाखवावें. म्हणोन मिस्तर जेकिन् साहेब बहादूर याचा शुका यशवंत रामचंद्र याच्या नांवें आला कीं, "आम्हांस लाट[१] साहेब बहादुरांचा हुकूम आला आहे, तो मजकूर सेनासाहेबांसीं बोलणें जरूर आहे. फुरसत असेल ते वेळेस येऊं." तेव्हां तो शुक्का मशारनिल्हेनीं सेनासाहेबांस दाखवावयास आणिला. तें पाहून मशारनिल्हेस आज्ञा केली कीं, "उदयीक स्नानसंध्या झाल्यावर त्याजला बोलवावें." त्याजवरून दुसरे दिवशीं साहेब बहादुरास बोलावून आणिलें. त्या प्रसंगीं श्रीधर लक्ष्मण मुनसी आणि साहेब बहादुर निराळे बसून बोलले कीं, "लाट[१] साहेबांचा हुकूम आम्हांस आला आहे. सेनासाहेबांची व आपली हल्लीं दोस्ती आहे, त्याचे मुलखांत मीरखान यांनीं गैरचाल करून चालून आला आहे, तेव्हां अशा प्रसंगास पलटणी पाठवून त्याची मदत करावी, हें आपले दोस्तीस उचित आहे." येविषयीं हा मजकूर बोलले. त्याजवरून मुनसीनें सेनासाहेबांकडेस

१. गव्हर्नर जनरल.

येऊन बोलण्यापूर्वी धर्माजी[1] भोंसले यांचे देखत नारायण यशवंत यांजला सेनासाहेबांनीं पृच्छा केली कीं, "हा काय मजकूर असेल ?" तेव्हां यांनीं विनंति केली कीं, "या अडचणीचे वेळेस आपल्यावर उपकार करावा असें कांहीं असेल." तश्यांत बापूनीं येऊन जाला मजकूर निवेदन केला तेव्हां आपले जागीं सेनासाहेबांनीं विचार करून "उदयीक जाब देऊं" असें बोलून साहेब बहादुरांस निरोप दिला. नंतर बापू घरास आले, तेव्हां नारायण यशवंत सरकारचे लोभांतील त्यांस या मजकुराची विचारणा सेनासाहेबांनीं केली कीं, "आजवर मी आपले हातें जेवीत आलों. आतां ही गोष्ट येऊन बनली. तेव्हां पुढें तुम्हां लोकांचे हातून मजला जेवणें प्राप्त झालें, हें माझे देहांत प्राण आहे तोंवर करण्याचें नाहीं." तशांत नारायण यशवंत यांनीं विनंति केली कीं, "हें दौलतीचें काम आहे. अशा वेळेस आग्रह करणें सल्हा नाहीं. प्रसंग संपादून पुढें याजला तोडी वहुत आहेत. इंग्रज लोक बोलण्यापलीकडे जबरदस्ती करितील असें होणार नाही. बोलण्यांत मात्र पक्कें करून घ्यावें. मग येविषयीची चिंता नाही. असें होऊन या गोष्टीवर सेनासाहेबांची मरजी बहाल करविली. तेव्हां दुसरे दिवशी बापूशी मनसुबा सेनासाहेबांनीं केला की, "आपलेकडून साहेब बहादुराचा कांही उद्योग या प्रसंगी जाहला नसतां, इतका प्रकार आपण ते करतात याचें कारण काय ?" असें बोलल्यावर बापूनी विनंति केली कीं, आपल्यास ते कांही मदत खर्च वगैरे मागत नाहीत व पुढें कोणताही जाबसाल मसलतीबद्दल बोलणार नाहींत, शरफ[2] आपली मदत करावी हें बोलणें आहे." त्याजवरून सेनासाहेबांनीं नारायण यशवंत याजला निराळे वाटेनें सल्ला विचारली, त्याजवरून यांनीं म्हटलें की "बापूचें बोलणें नीट पडत आहे. यास फाट घेण्याचें कारण नाहीं." याजवरून मातोश्री चिमाबाई साहेब व सेनाधुरंधर साहेब नागपुरी होते यांजकडेस नारायण यशवंत व धर्माजी भोंसले यांजला पाठवून उद्घाटन करविलें, त्याजवरून सेनाधुरंधर साहेबांनीं कल्पना करून नानाप्रकारें साधक बाधक विचार पाहिला. तेव्हां नारायण यशवंत यांनीं त्याची निवृत्ति केली कीं, "स्वराज्यांतील रासेयतदार[3] यांचे पेटचांतील मीरखान सरदार यानें

१. ना. भों. सं. का. लेखांक ३६ पृष्ठ ८० पहा.
२. सिर्फ-फक्त. ३. रियासतदार-संस्थानिक.

गैरचाल केली कीं, याचा मजकूर अवग्र ज्यास सरदारास सुचविला असतां कोणाचे ध्यानास न येतां, इंग्रज बहादूर फक्त दोस्तीचे वाटेनें हामराहा होऊन त्याचें पारपत्य करितात. त्यांत कोणताही बाध नाहीं." याजवरून मातोश्री साहेबांचा व सेनाधुरंधर यांचा रुकार[१] घेऊन सेनासाहेबांस निवेदन केला. याजवरून नबाब महमद सिदक अलीखान याजला पत्रें लिहिलीं कीं, पलटणी येईपर्यंत लढाई न घेतां दिवस घ्यावे. अशीं पत्रें तयार झालीं. यानंतर श्रीमंतांनी जातांना विचार केला कीं, पलटणी येण्यास अवकाश आहे. आपल्यास आश्रा नव्हता, ते वेळेस लढाई घेण्यास सिद्ध झाला. आतां आश्रा जाहाला. तेव्हां लढाई न घ्यावी ही मसलत चांगली नाही. याजवरून जी पत्रें पहिली लिहिलेली होतीं तींही तहकूब करून, कोणास कळू न देतां नारायण यशवंत याजला बोलावून दुसरें पत्र नबाबाचें नांवें लिहिलें की, "इंग्रजांचा व आमचा असा निश्चय ठरला, तेव्हां पलटणी येण्यास अवधि आहे तोंपर्यंत मीरखान तुम्हांस चैन पडू देणार नाहीं. याजकरितां त्यासी लढाई घेऊन त्याचें पारपत्य करावें, येविशीं अंदेशा कराल तर तुमचें दर्शन सरकारांत होणें दुर्लभ होईल, हें चित्तांत आणून शत्रूचें पारपत्य जरूर करणें." याप्रमाणें पत्र लिहून सांडणीस्वारासमागमें रवाना केलें.

तो जाऊन पोंचल्यावर पेशजी सखाराम महीपत खानमजकुरापाशी जाऊन पोंहोचले, व मंडल्याहून नारायण यशवंतही सेनासाहेबांचे आज्ञेवरून जमावासुद्धां नबाबाजवळ येऊन पोहोंचले, व अमृतराव पांडुरंग बक्षी हेही फौजेसहित नबाबाजवळ दाखल झाले. सर्व एकत्र होऊन विचार केला. तों मीरखान याचें कूच होऊन नर्मदा उतरून जबलपूरचे मैदानांत गेला. तेव्हां अवग्र सरदार मंडळीची एकत्रता नबाब यांनी करून मीरखान याचे पिछावर कूच करून निघाले. ते समयीं मीरखानाकडील पेंढारी यांनीं सेनासाहेबांचे इशाऱ्यावरून खानमजकुरास दगा देऊन, एकीकडे झाले. तशांत नबाब सिदक अलीखान याजला सरकारचीं पत्रें सांडणीस्वाराबरोबर आलीं होतीं त्यांचें निराकरण करावयाकरितां सेनासाहेबांस बहुतां प्रकारें विनंती झाल्या मजकुराची करावयास सखाराम महीपत याजला नबाब मशारनिल्हेनीं

---

१. हा मदत देण्याचा प्रकार रघोजीस संशयास्पद वाटला इत्यादि गोष्टी लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत.

सेनासाहेबांकडे बिदा केलें कीं, आम्ही सरकार हुकमाप्रमाणें करतों, मीर-खानास मिळून नाही, सरकार बातमी कोणी कसेंही लिहोत परंतु मजला सरकारशिवाय दुसऱ्याकडे पाहावयाचें नाहीं. याप्रमाणें मशारनिल्हेनीं येऊन सेनासाहेबांस विनंति केली. त्याजवरून सरकारची खात्री विशेष झाली.

**कर्नल क्लोज याची मदत**:—तिकडेस इंग्रजबहादूर याजकडील सरदार कर्णल कलुश साहेब बहादूर पलटणी बावीस घेऊन आले, ते आष्टीचे सुमारास येऊन दाखल झाले.

इनक्यांत नबाब सिदक अलीखान फौजेसहीत कूच करून जाऊन जबलपूरचे मुक्कामीं पोंहोचले. तों मीरखानही फौजेसहीत कूच करून जाऊन तेथें पोहोंचले. तों मीरखान फौजेसहीत कूच करून चालला, तेव्हां यांणी दरकूच त्याचे पिछावर जाऊन जंबोरचे घाटावर आटोपिला. लढाई सुरू झाली. ते समयीं नबाबांनीं उजवे बाजूस अमृतराव पांडुरंग व नारायणराव बाजी घाडगे नेमिले. डावे बाजूस गोविंद-राव त्रिंबक बक्षी व भाई वजीर महंमदखानाचा रिसाला व मालजी अहिरराव व गुणाजी शिरके बमये बावन्नपागेसुद्धां घाडग्याचे आलिकडे उजवे बाजूचे दरम्यान् गुलाम हैदर बक्षी आपले पतकासहीत, व मध्यंतरीं आघाडीचे सुमारें बक्षीराम सुभेदार व तोफ पलटणेसहीत डावे बाजूस झोंकावर मध्यंतरी नबाब सिदक अल्लीखान आपले खासगत फौजेनिशीं मीरखानाचे सामन्यास उभे राहिले. चोहोंकडून गोळागोळी सुरू जाहली. ते वेळेस भोईटे याचें पतक आघाडीस वाढून गेलें. त्याजवरून मीरखानाचे फौजेची मारगीर होऊन माणकोजी भोईटे कामास आले. त्याचें पतक शिकस्त जाहलें. ते वेळेस कमरग्यांत गुलाम हैदर बक्षी होते त्याजवर समसेरखान चालून आले. त्यांसीं लढाई होऊन समसेरखान शिकस्त जाहले. गुलाम हैदर बक्षीकडील लोक जायां जखमी झाले. तशांत मीरखानावर आघाडीच्या तोफा सुरू केल्या. तोफांचा मार सोसवेना तेव्हां तीन चार हजार स्वारांचा जमाव गोल नबाबाचे खास फौजेवर चालून आला. ते वेळेस नबाबानींही तोफांचा मार मीर-खानाचे गोलावर सुरू केला. तेव्हां तो गोल सिकस्त झाला. तशांत नबाबानीं आपले फौजेस खास हुकूम करून जातीनें घोडे चालविले. आघाडीस शेक भीकन अबीरखान व कादरखान व अहंमदखान इतकेही आपले पतका-

सहीत व कृष्णराव महिपत यासही नबाबानीं जातीनें मीरखानाचे गोल्यावर चालून गेले. तेथें तलवार चालली. त्या जागीं जरीचें निशाण, पायदळांतील पांढरे निशाणाचा हत्ती, व अंबारीचे हत्ती, मीरखानाकडील पाडाव करून मीरखानाचा मोहरा मागें हटविला. खानमजकुराचा मोड होऊन सेनासाहेबांचे फौजेची फत्ते जाहली. मीरखान सिकस्त होऊन निघाला. त्या प्रसंगीं त्याजकडून पेंढारी याणीं सेनासाहेबांचे इशाऱ्यावरून त्याची फौज चालून दोन तीन मजला बहुत थकली.

**चिमाबाईचा मृत्यु**:—तें वर्तमान झाडून तपसीलवार फत्तेचे नबाबानी जायां जखमी वगैरे सेनासाहेबांस लिहून पाठविलें. त्या ठिकाणीच मुक्काम करून राहिले. तेथून अनंतराव पांडुरंग याजला शूळाची व्यथा उत्पन्न होऊन मूत्रास अवरोध झाला. त्याजमुळें नबाबानी त्याची रवानगी नागपुरास केली. आणि नारायणराव बाजी घाडगे याचे लोकांचा बलवा फार समजून जमावासहीत त्याची रवानगी नागपुरास केली. तशांत मातोश्री चिमाबाई[1] साहेब यांचा काल झाला.[2]

नंतर पेंढारी मजकूर यांजकडील खानमहंमद व सेनासाहेबांकडून उदाजी नवघरे असे मिळून सेनासाहेबांकडेस बोलण्याकरितां आले. तेसमयीं खानमहंमद याचें बोलणें पडलें की, "सरकारची चाकरी आम्ही केली. आतां आम्हांस बक्षीस जाहागीर मिळावी." तेव्हां सेनासाहेब याणीं बोलण्यांत आणिलें की, "मीरखानाची लढाई जाहली. परंतु आणखी सावर धरून आल्यास सरकार चाकरी करावी, व होळकरशाईवाले पैकीं वगैरे पेंढारी यांचा इकडेस येण्याचा इरादा झाल्यास तुम्हीं सामना करावा, व येऊं देऊं नये." तेव्हां त्यांणी कबूल केलें. परंतु त्यांचें म्हणणें पाहिलें कीं, "आम्हाकडील रमजान खान पेंढारी सिगपुरास राहत होता, तो जगन्नाथ चौधरी याणीं मारला. तो प्रांत चौधरी मजकुराकडे आहे, तो आम्हांकडे पेशजी होता, तो आमचा आम्हांस मिळावा." याजवरून सेनासाहेबांनी आज्ञा केली की, "अगोदर पुरती चाकरी करून मग पोटास मागावें."

**मीरखानाचा पराभव**:—असें बोलणें होऊन रामटेकचे मुक्कामीं

---

१. रघोजीची आई.

२. ता. २५–१२–१८०९ रामटेक मुक्कामीं. (अ. प्र.)

सरकारस्वारी आहे तोंच बातमी आली कीं, मीरखान सावर धरून आला. तेव्हां खानमहंमद याची खात्री तसली करून रवाना केलें. तिकडेस नबावानीं कूच करून देवरीचे सुमारें चालले, त्या संधींत यशवंतराव दत्ताजी हेही वाडीकडून जमावानिशीं येऊन नबाबास भेटले. तों बातमीचे द्वारें समजलें की मीरखान पळून जात होता, त्याजला वजीर महंमदखान भोपाळाजवळ येऊन भेटले. व धीरभरंवशाच्या गोष्टी सांगितल्या जे, "आम्ही तुमची कुमक करतों. व फौजेचा जमाव तुमची फुटाफूट झाली ती एकंदर करून तुम्ही आम्ही मिळून जाऊं." ठरवून दोघेही एकवट होऊन पुन्हां चालून येऊन दुसरे मार्गानें नर्मदा उतरून शहापुरानजीक चौरागडाकडेस आला. तों नवाबही नर्मदा उतरून शहापूरचे मुक्कामास आले. दुसरे दिवशी मीरखान व वजीर महमदखान बाडीचे उत्तरतीरीं येऊन सेनासाहेबांचे फौजेवर चाल केली व लढाई सुरू झाली. तोफांचा मार नबावांनी बहुत दिला. तेथें लढाई मातबर जाहली. दोन तीन हजार माणूस मीरखानाकडील व वजीर महमदखानाकडील कामास आले. तेव्हां खान मजकूर सिकस्त होऊन माघारे निघाले. ते वेळेस बाडी व चौकीगड येथें कांहीं लढाईचा सरंजाम जुजवी होता. जागा खालीं पाहून दोही जागी ठाणें बसविले, आणि आपण निघोन चालले. पेंढाऱ्याचे प्रकर्णीं खानमहंमद याचें बोलणें रामक्षेत्री सेनासाहेबाशीं झालें. तेव्हां त्या संकेतावरून त्याचा पाठलाग करून मीरखान लुटून फस्त केला, आणि फौज फारच हवालदिल करून नंतर नवाब फत्तेनसीन[१] होऊन नागपुरास सेनासाहेबाकडेस आले, आणि सरदार मंडळीस उचित पाहून हत्ती, पालख्या, वस्त्रें वगैरे देणग्या दिल्या. नबाब महंमद सिदक अल्लीखान यावर सरफराज होऊन बहुमान साहेब नौबत, मोत्याची कंठी, सिरपेच, वस्त्रें वगैरे दिलीं.

कर्नल कलुपसाहेब बहादूर अष्टीहून कूच करून पांढुरणें मुक्कामीं आले. तशांत तिकडील मसलत तयार करून खानाचे पारपत्याची आठवण दिली गेली. याजवरून सेनासाहेबांनीं मिस्तर जंकिनसाहेब बाहादूर याजकडेस सर्व मजकूर यशवंनराव रामचंद्र याचे हातीं सांगून पाठविले. तेव्हां साहेबबहादुरानीं सांगून पाठविलें कीं, "मीरखान अद्याप त्या जिल्ह्यांतून

१. विजयशाली.

गला नाहीं. हीं पलटणें जाऊं द्यावीं." त्याजवरून तीं पलटणें पांढुरण्याहून पलीकडे चाललीं. तशांत मीरखान मेढ्याचे पलीकडे चालले, त्या समयीं कर्नल साहेबाबरोबर जमाव कुंभार राजे याजकडील पूरण, पंतप्रधानाकडील अन्याबा, राहतेकराकडील बाबाजी भगवंत, व हैदराबादवाले याजकडील सलाबतखान याप्रमाणें होते. सेनासाहेबांनी नबाब महमद सिदक अल्लीखान याजला रवाना केले, ते वेळेस नबाब याजला सांगितलें कीं, "कर्नल साहेब बाहादूर तुम्हास सांगतील तशी वर्तणूक करणें." अशी ताकीद केली. या प्रमाणें ते कूच करून चालले, तों मध्यंतरी कर्नल चमली साहेब यांची गांठ पडून उभयतां मिळून गंजबसोद्यापर्यंत जाऊन कर्नल कलुषसाहेब भेटले. तेथून सर्वत्र एक होऊन येत्रवती नदीपर्यंत दरकूच गेले. तेव्हां कर्नल साहेबाचें बोलणें नबाबाशी पडलें कीं, "जेथवर मीरखान जाईल तेथवर त्याचा पाठलाग करून पारपत्य करून तुम्हीं आम्हांस घेऊन चलावें. तिकडील मुलूख लुटला, तो तुमचे व आमचे सरकारांत निमे निमे घेऊं." या मजकुराचीं पत्रें सरकारांत नबाब मशारनिल्हेची सेनासाहेबांस आली. याजवरून सेनासाहेबानें विचार करून उत्तर लिहिलें की, "मीरखान आपले मेढ्यापलीकडे गेला, आपल्यांत खुदरत[1] नाही कीं, मेढ्यापलीकडे जावें. त्यास कर्नल साहेब बाहादूर तुम्हांस घेऊन जात असल्यास त्या समागमें जावें." असें लिहिलें गेल्यावरून कर्नल साहेबाचें बोलणें पडलें की, "तुम्ही आम्हांस नेत असल्यास मदतीस येतों." हा मजकूर त्याचे बोलण्यावरून तसाच राहून माघारें फिरणें झालें. तों भोपाळ प्रांतांत आले. तेथें भोपाळवाल्याचा वकील कर्नल साहेबाकडे येऊन बोलला की, "सेनासाहेबांकडील फौजेचा उपद्रव वारंवार आमचे प्रांतांत लागतो, याचा बंदोबस्त घडावा." याप्रमाणें त्यानें बोलण्यांत आणिलें. तेव्हां कर्नल साहेब याणीं नबाब सिदक अल्लीखान याजवर बांकून जबाब दिला कीं, "तुमचा व सेनासाहेबांचा विचार पूर्वीपासून जसा असेल तसा राहूं द्यावा, सेनासाहेब व आमचे कंपनी बहादुराची दोस्ती आहे, त्यापेक्षां तुमचे मुकदम्यांत आम्हांस बोलणें जरूर नाहीं." असें उत्तर करून वकिलास निरोप दिला व कर्नल साहेब कूच करून हुसंगाबादेनजीक मुकामास आले साहेब बहादुरांनीं पलटणी तिकडील मेढ्यावर ठेवण्याविषयी कांहीं करार-

---

१. सामर्थ्य.

मदाराचा मजकूर नबाब मशारनिल्हे यासि बोलण्यांत आणिलें. याजवरून नवाबानीं सेनासाहेबांस लिहिलें त्याजवरून सेनासाहेबांनीं नबाबास उत्तर पाठविलें कीं, याविषयींचा प्रकार पलटणी येण्याचा विचार ठरला ते वेळेस बोलणीं होण्याचीं तीं झालींच आहेत. तें चरित्र मिस्तर जंकीन साहेब याजकडेस पाहावयास पाठविलें व सांगूनही पाठवलें कीं, तुम्ही करनल साहेबास याविषयीं स्पष्ट लिहिणें तें लिहावें. याजवरून पत्र साहेब बहादुरचें कर्नल साहेबांस गेलें, व सेनासाहेबांचें पत्र नबाबास गेलें. नंतर मिस्तर जंकीन साहेब याणीं पस्तावा नारायण[1] गोपाळ पंडितजी याजपाशी केला कीं, आमचीं पलटणें मेढचावर राहावी. नंतर यांत सेनासाहेबांचा उपयोग कांहीं होता, परंतु हा मजकूर काय समजून त्यांनीं पाठविला हें कळत नाहीं. तेव्हां हा मजकूर पंडितजी यानी नारायण येशवंत याजला सुचविला. त्याजवरून मशारनिल्हेनीं आपले मनांत विचार केला कीं, ही वेळ चांगली आली आहे. या प्रसंगी साहेब बहादूर यांसि दोस्ती केली असतां दिवसेंदिवस अधिक बळकटी येईल, व साहेब लोक जातीनें सेनासाहेबांचे दौलतीचे उपयोगावर आहेत तेव्हां सागर व गढेकोट हा उपाय न दाखवून यांतून ही गोष्ट साधन करावी, असें बोलल्यावर, सेना साहेबांची मर्जी, या पल्ल्यावर येणार नाही, ही उपयोगाची मसलत सेनासाहेबांस विनंति करून या पल्ल्यावर सरकारास आणिले. तेव्हां सेनासाहेबांनी पंडितजीस सांगितलें कीं, "तुम्ही जाऊन जंकीन साहेबास हेंच सांगावें कीं, सागर व गढाकोट किल्ले याजकडे आमचे जाबसाल आहेत व त्याणी मीरखानास मार्ग दाखविला, आमची नुकसान झाली, याजकरितां आम्ही या दोहों प्रांतांचा बंदोबस्त करतों, तुम्ही आम्हांस रुकार द्यावा. कोणी पुढें मागें आम्हांसी बोलल्यास या गोष्टीस तुम्ही सहन असावें, असें झाल्यास त्याचे मेढचावर पलटणें ठेविण्याचा बेत करून उपयोगही घडेल." हें बोलणें पंडितजीनीं साहेब लोकांस जाऊन बोलले. हें ऐकून साहेब बहादुरांनीं म्हटलें कीं, "कोण गृहस्थ सेनासाहेबांकडील आहे त्यास घेऊन यावें." याजवरून बाळाजी अनंत याजला पंडितजी समागमें देऊन पाठविले होते, तेव्हां त्यांणीं बोलणें ऐकून घेऊन सांगितलें कीं, "आम्हास सेनासाहेब यांनीं समक्ष बोलावून हा मजकूर या दोघा जणांनीं येऊन सेनासाहेबांस सांगितले."

१. लेखांक २ टीप ४२ पाहा.

यावरून जंकिन साहेब याजकडे सुचविलें कीं, तुम्ही येशवंतराव रामचंद्र याजला बोलवावयास सरकारांत येतो म्हणून शुक्का लिहावा, त्याप्रमाणें त्याजपासून तिकडेस लिहून, त्याजला खूण ठरल्याप्रमाणें त्यांचा शुक्का तिकडे आला. तो शुक्का सरकारांत दाखविला. त्याजवरून, सेनासाहेबांनी साहेब बहादुराशीं बोलावू पाठविलें, म्हणून तेही आले. व श्रीधर लक्ष्मण मुनसी याजला सेनासाहेबांनी सागर व गढेकोट याचा मजकूर साहेब बहादुरास बोलावयास सांगितला, याजवरून आजरीमाजरीचे मुक्कामी बापूजीसाहेब बहादुराशीं निराळे बसून बोलण्याचा आरंभ केला. ते वेळेस साहेब बहादुरांनी नारायण येशवंत याचें नांव घेतलें की, त्याजलाही बोलवावें. याजवरून हेही त्या जाबसालांत गेले. बापूजी साहेबबहादुराशी बोलले. त्याचें उत्तर त्यांनी दिलें की, "हा मजकूर आम्ही लाट साहेब बहादुरासि लिहितों. तेथून जबाब येईल त्यासारखें तुम्हांस बोलवूं" असें उत्तर सेनासाहेबांनी ऐकून नंतर साहेब बहादुरासी निरोप दिला. याजवरून सेनासाहेबांनीं मनांत आणिलें की, आपलेकडूनही कोणी गृहस्थ कलकत्त्यास पाठवून दोस्तीची बेहेतरी टेवावी. याजवरून बाळाजी अनंत याजला वकिलाचे कामावर रवाना केलें.

तिकडेस नबाब सिदक अल्लीखान याजला सेनासाहेबांचीं पत्रें गेलीं की, "भोपाळवाले याजकडेस फौज पाठवून त्याचें पारपत्य करावें." याजवरून नबाब याणीं गोविंदराव त्रिंबक याजला फौजेसहीत रवाना केलें. येशवंतराव दत्ताजी याजसमागमें फौज देऊन चैनपुर बाडीचे जिल्ह्यांतून पुढें भोपाळास उद्योग करावा असें सांगून हुसंगाबादेचे मुकामास आले होते, नंतर कर्नल साहेब यांनी नबाब सिदक अल्लीखान याजला नागपुरास येण्याविषयी निरोप देऊन कर्नल साहेब कूच करून जालन्याचे सुमारें गेले.

नंतर नबाब मशारनिल्हे नागपुरास सेनासाहेबांकडे आले. ते समयीं सेनासाहेब इंदोऱ्या[१] पर्यंत जाऊन भेट घेऊन नबाबास शहरांत घेऊन आले. तिकडून अवग्र जाहला मजकूर सरकारांत निवेदन केला. सन १२२० सालीं खान महंमद पेंढारी याजकडून विसाजी पांडुरंग पेशजी जाहागिरीचे

१. हें खेडें नागपुरानजीक दोन कोसांवर आहे.

बोलण्याकरितां आले होते, त्याजवर सेनासाहेबांची मर्जी मीरखान प्रकरणावरून प्रसन्न होऊन सिंगपूर खाडेबर वगैरे लाख रुपयांची जहागीर त्याजला देवविली.

बादबरसाद व्यंकाजी भोंसले सेनाधुरंधर यांणीं मातोश्री चिमाबाई साहेबांची गयावर्जनाकरितां श्री काशीयात्रेस जाण्याची तयारी केली. याजवरून सेनासाहेबांनीं त्यांजला निरोप दिला. ते यात्रेस गेले व दौलतराव शिंदे याजकडून रुकसत होऊन बापूजी निंबाळकर वाटलकर सुभेदार व निंबाळकर कासीराव खंडागले व कदम व आंबरेकर व फडतरे व गोंदाजी सिंदे व सदाशिवराव भास्कर वगैरे मंडळी आपले जमीयतीसुद्धां आले. त्याजला सेनासाहेबांनी चाकर ठेवून घेतलें. त्याची वहिवाट कारभार नरसिंगराव हे बरे शाहणे पाहून पोक्त त्या कामी सरकारांनी नेमिले. नंतर वाघोडे[1] यास शिकार खेळावयास सेनासाहेब गेले होते. तेथून बोरगांवचे मुक्कामीं बरसात चार महिन्यांची छावणी केली. तेथें मीर अमीर बेग याणीं सेना साहेबासी बेकैदी केली. याजवरून मीर मजकूर याजवर फौजा पाठविल्या. तेथें लढाई जाहली. त्या प्रसंगीं खास रिसाल्यासुद्धां आपाजी आनंदराव हेही होते. त्यानी कामकाज चांगलें केलें. ते वेळेस मशारनिल्हेस जखम तलवारीची लागली, व गुलाम हैदरबक्षी याचा पुतण्या कामास आला. अमीर बेगाचें पारपत्य करून धरून आणिलें.

तशांत नारायणराव बाजी घाटगे याचे रिसाल्याचा बखेडा जाहला, सबब त्या रिसाल्याचा बंदोबस्त करून बापू गणेश याजकडेस त्या रिसाल्याचें काम सांगितलें. पुढें कांहीं एक दिवसांनीं बापू गणेश याचा काल झाल्यावर, तोच रिसाला व तेच जाहगीर बैतूल अंमल वगैरे सिंदराव महिपत याजकडेस दिले. व रिसालदाराचीं वस्त्रें सरकारांनीं दिलीं. नारायणराव बाजी दक्षिणेंत कोलापुरास गेले. सन १२२१ चे सालीं गोविंदराव त्रिंबक व मालजी अहिरराव वगैरे कोटयास गेले होते. तेथें हल्ला करून यांनीं शहर घेतलें. तेथें गढे–कोठेवाला मर्दनसिंग याजला गोळा मारला गेला. नंतर त्याचे चिरंजीव शिंद्याकडील जान्बत्तीस[2] याकडेस संधान करून घेऊन आले,

१. गांवाचें नांव.
२. जॉन बाप्टिस्त.

व दग्याचे पोटीं सेना साहेबांकडून गोविंदराव त्रिबक व मालजी अहिरराव यांजवर गर्दी करून फौज उधळून दिली. तेथून उभयतां मशारनिल्हे नागपुरास आले. त्याचे अगोदर सरकार स्वारी बोरगांवीं छावणी करून राहिली होती.

**व्यंकोजीचा काशीस मृत्यु,** इ. स. १८११:––या उपरि पेशजी काशीस व्यंकाजी भोंसले सेनाधुरंधर गेले होते तेथें प्रकृति मांदी जाहली. हें वर्तमान सेनासाहेबांस समजलें त्याजवरून त्याचें येणें व्हावें याजकरितां, सेनासाहेब याणी दोनचार वेळां येण्याविषयी लिहिलें. परंतु त्याचें येणें न झालें. सबब त्याजला घेऊन येण्यास्तव गुजाबादादा[1] गुजर याची रवानगी श्रीरामक्षेत्रास केली. हे मार्गांत आहेत तों व्यंकाजी भोंसले सेनाधुरंधर याचा काल सन १२२१ चे श्रावण मासीं वाराणशीस जाहला. हें वर्तमान नागपुरास आलें तेव्हां याची स्त्री मैनाबाई, स्त्रीची जात, व त्याचे पुत्र मुधोजी भोंसले ऊर्फ आपासाहेब, मुलाची जात, तेव्हां याजला आणावया-करितां नारायण येशवंत याची रवानगी केली.

नंतर नबाब सिंदक अल्लीखान याची रवानगी दक्षिण तीरांत पेंढारी याचा उपद्रव जाहला सबब केली. सेनासाहेबांचे येथें बातमीचे वरोबर सिद्धू व राजा पेंढारी यांचा जमाव भारी होऊन शिंदे याजकडील प्रांतास उपद्रव केला व सांप्रदाय होता जे, सिंदे बहादराची आज्ञेची येहती–याद[2] करवीत तें सोडून गैरचाल केली याजवरून खातरवतीनें सिंदे यानें करीमखान व बसन पेंढारी याजला नेऊन कैद केलें. त्याची फौज त्यांणीं लुटली. तेव्हां करीमखानाचा जमाव तसनस जाहला. व बसनपैकीं दोस्तमहंमद यांनीं भोपाळ व रायशेन व गुजबोर वगैरे माळवे प्रांतीं फिरून जमियत बांधून रेवा उत्तर तीरास व सिंदेबहादूर याचेही प्रांतांत उपसर्ग करूं लागला.

**पेंढारी:**—याजवरून सेनासाहेबांनीं सरकार नबाब सिंदक अल्लीखान दक्षिण तीरास व मालजी अहीरराव याजला त्रिबकराव कोठेकर असे फौजेनिशीं हुशंगाबादेकडे रवाना केले. भालचंद्र–राव दाजी कोठेकर याजला वर्धातटी सांवळी वगैरेचे बंदोबस्तास पाठविलें व आनंदराव कोठेकर नागपुरास ठेविले.

१. लेखांक २ टीप ४३ पाहा.
२. काळजी, फिकीर, बंदोबस्त.

नबाब दक्षिण तीरास जाऊन पोहोंचत आहेत. तशांत दोषमहमद पेंढारी यानें दाहा हजारांची जमीयत पेंढारी मिळोन इकडील सेनासाहेबांचे प्रांतांत उत्तर तीरीं उपसर्ग करूं लागले व शिंदे याजकडील रायगड वगैरे यांतही उपद्रव केला तेव्हां सेना साहेबांनीं सखाराम महिपत या समागमें फौजेचे खर्चास देऊन नबाब सिदक अल्लीखान याजकडेस रवाना केलें, आणि सांगितलें कीं आतां उतरून जाऊन दोषमहमद याचें पारपत्य करावें, म्हणून नबाबास सांगावें. याजवरून नबाब मशारनिल्हेनी जाऊन सांगितलें की, रेवा उतरून जात आहेत. इतक्यांत शिंदे याजकडील जगन्नाथराव फौजेसहित शिंदे बहादुराचे इशाऱ्यावरून येऊन दोषमहमद याचें पारपत्य केलें. नंतर होळकर शाई पैकीं पेंढारी खुशालकुवर व नामदारखान पेंढारी यानें जमाव करून नागपुरावर आले. स्वारींत सेनासाहेबांचे पुत्र होते. त्यांनीं आमृतराव पांडुरंग याजबरोबर भगवंत बाजी घाडगे याजला देऊन हुकूम केला. याजवरून मशारनिल्हे कांही जमाव घेऊन गेले. तों पेंढारी वारणा शहराभोंवती होते. त्या समयी जागजागीं पेंढारी याशी शहरचे आसपास लढाई झाली. त्याजवरून पेंढारी शिताबर्डीचे रुखावर एकंदर जमले. जमाव पेंढारी याचा भारी व हे थोडके जमावानी असतां त्याजवर घोडे चालवून पेंढारी हटविले. त्या प्रसंगीं कामकाज चांगलें केलें, आणि आमृतराव पांडुरंग याजला गोळीची जखम लागली. तशांत सारेगांवाहून सरकार स्वारी ही फौजा सुद्धां येऊन पोहोंचली पेंढारी निघोन गेले. नंतर सेनासाहेबांची स्वारी बागांत राहिली ती तशीच कांही दिवस तेथें होती.

तशांत शिवराम महिपत दफतरवाले महायात्रेस गेले. व त्याचे चिरंजीव भोजराजपंत पेशजी निवर्तले होते. तेव्हां बक्षीगिरीचे दफतरचें काम विश्वासुक व शहाणा पाहून सेनासाहेबांनीं त्या कामी खंडो हैबतराव पहिले पासून होते, हे उभयतां मिळोन दफतरचें कामाची वहिवाट करूं लागले. तों श्री काशीक्षेत्राकडून गुजाबादादा गुजर व नारायण येशवंत व मैनाबाई साहेब आपासाहेबांसहित घेऊन आले. त्याजला आणावयाकरितां सेनासाहेब छत्तीसगडचे सुमारें श्रीरंगपुरा पावेतों जाऊन नागपुरास घेऊन आलें. सेनाधुरंधराचे दवलतीचा बंदोबस्त आपण करून, आपासाहेबांचे स्वाधीन त्याचा बंदोबस्त करावा. त्याचे कामांत कामदारापासून मोहसब समजून घ्यावा,

याजकरितां व्यंकाजी नाईक पिदडी याजकडे सेनासाहेबांनीं बोलणें लाविलें. याजवरून त्यांनीं विचार केला कीं, सरकार मोहसब आपले आंगीं आहे व हिशेबाचे राईनीं आपलेकडेस पैका निघेल तो हे घेतील. हें समजोन मोहसुफ याचे धाकांनी त्यानी जहर खाऊन प्राण दिला. नंतर सन १२२२ चे सालीं नागो त्रिंबक याजला सेना साहेबांनीं आपासाहेबांस तरतबेत[1] करण्यास व चाल धारणा चांगली सांगावयास नेमिलें असतां पुढें कांहीं एक दिवसांनी रामचंद्र वाघ व हे एकत्र होऊन सर्व कारभार आटोपून, आपासाहेबांचे प्रीतिपात्र झाले.

याजवर शिंदेसाहेबांकडून जगन्नाथराव यांनीं फौजेचे जमावानिशीं माळवे प्रांतीं येऊन सेनासाहेबांस पत्रें पाठविलीं की, भोपाळ घेऊन वाटणी प्रमाणें अंमल आपलाले बसवावे. याजकरितां आपलेकडून फौजेचा जमाव रवाना करावा. याजवरून नबाब शिदक अल्लीखान व मालजी अहिरराव गंगेश्वरीं मार्गे नर्मदा उतरून जाऊन जगन्नाथराम याच्या भेटी घ्याव्या म्हणून आज्ञा गेली. याजवरून उभयतां मशारनिल्हे यांच्या भेटी नर्मदेपलीकडे झाल्या. इतक्यांत छावणीचे दिवस समीप आले तेव्हां जगन्नाथराम व नबाव सिदक अल्लीखान याणीं मसलत केली कीं, "चार महिने छावणी दौलतपुरावर करून बाद बरसात भोपाळावर चलावें." असा निश्चय करून जगन्नाथराम यासहित नबाब सिदक अल्लीखान याची छावणी दौलतपुरावर झाली. तेथें नबाब सिदक अल्लीखान पांच हजार फौजेसहित राहून मालजी अहिरराव व नबाबाकडील सदाशिव गोविंद याजला रेवा दक्षण तीरांत शिवणी छपाऱ्यावर छावणीकरितां रवाना केलें.

तशांत इकडे यशवंतराव रामचंद्र याजविषयीं गंभीरजी देशमुख यांनीं सेनासाहेबांस सुचविलें की," ठाणें कोठ्याचे प्रकरणांत मजपासून मशारनिल्हे फार लाभ इच्छितात." सबब सेनासाहेबांचे मनांत विकृति येऊन श्रीधर लक्ष्मण याजपाशीं प्रस्तावा केला. तेव्हां श्रीधर लक्ष्मण यांनीं हें दर्शविलें कीं पेशजी जनरल वेलजली साहेब याजकडेस यांजला पाठवून, साहेब इंग्रज बहादुराचा व आपला तह झाला.[2] ते वेळेस यांनीं नारायणराव वैद्य याचे

---

१. माहीतगार. २. हा देवगांवचा तह.

जहागिरीचे गांव होते ते व अवसरही आणीक कितीकाचे गांव आपले नांवें करून घेतले आहेत, तशी वर्तणूक याची आहे त्यापेक्षां याजला हरदो सरकारचे वागणुकींतून काढून बगाजी रघुनाथ नेमावे. याजवरून सेनासाहेब बोलले कीं "या वागणुकींतून याजला काढिलें असतां दोस्ताचे* मनांत विकृति न यावी." त्याचें उत्तर श्रीधर लक्ष्मण यांनीं केलें कीं, "तावेदार आपला आहे, यास पेंच नाहीं." तेव्हां सेनासाहेबांनीं यशवंतराव रामचंद्र तगीरसे§ करून घरीं बसविले, आणि बगाजी रघुनाथ नेमिले. याजवर कांहीं एक दिवसांनीं कलकत्त्याहून खलिते आले की, "हरदो सरकारची दोस्ती आहे तेव्हां वागणुकींत मनुष्य चांगला असावा. सांप्रत जे नेमिले आहेत हे पेशजी कलकत्त्यास आले होते, यांजकडून दोस्तीची वृद्धि व्हावी यालायक नाही." असें आल्यावरून त्या खलित्याचा जबाब मागावयास जंकीन साहेब बहादुराकडून महंमदसाहेब मुनशी आले. ते परभारें श्रीधर मुनशी यांचे येथें बसले. याजवरून श्रीधरपंत यांनीं सेनासाहेब यांस सांगून पाठविलें कीं "याचा जबाब कसा द्यावा?" तेव्हां सेनासाहेबांनी विठोबा आण्णा उपाध्ये व नारायण यशवंत याजबरोबर सांगून पाठविलें कीं, "सरकारचेच आक्षेपांनीं काढिले असें नाही. तुमचेच सल्यांनी झालें आहे. यास जबाब तुम्हास काय देणें असेल तो द्यावा." असा निरोप महंमदसाहेब मुनशी याचे समक्ष सांगितला. तेव्हां श्रीधर लक्ष्मण यांनी महंमदसाहेबांस सांगितलें कीं, "आतां तुम्हीं जावें. मागाहून जबाब पाठवून देऊं." असें होऊन मुनशी मजकुर आपले मकाणास जात असतां मार्गांतून सेनासाहेबांनीं त्यांजला बोलावून आणून बोलण्यांत आणिलें की "हा दोष कोणाकडे आहे? तुमचे लक्षांत आलेंच असेल" असें बोलून त्याजला रुकसत केलें व हरदो सरकारचे दोस्तीवर लक्ष देऊन सेनासाहेबांनीं विचार केला कीं, "ज्याच्यापाशीं खातर दोस्तीस आहे तेंच आपल्यास जरूर करणें." जाणोन यशवंतराव रामचंद्र यास वकिलीवर नेमिलें.

तशांत पेशजी आपासाहेबाबरोबर रावजी परशराम कांहीं एक दिवस फारशी पढत होता त्याजला कांहीं एक दिवस गुजरल्यावर व्यंकोजी भोंसले सेनाधुरंधर काशीस जाते समयीं यांचे मनांत रावजी परशराम याज-

---

* इंग्रज.

§ तगीर–बडतर्फ.

विषयीं विक्षेप आला. याजवरून आपासाहेबांनी सेनासाहेबांस विनंति करून चाकर ठेवून दिले. व घड्याळ नीट करण्याविषयींचें काम याजला सांगितलें असतां तो सिताबर्डीवर जाऊन इंग्रजी लिहिण्याचा अभ्यास करूं लागला; तेव्हां तेथें त्यांनीं आकार पाहून त्यांतील, वर्तमान सेनासाहेबांस सांगत जावें. तेव्हां सेनासाहेबांनी त्यास आज्ञा केली की, "ज्या साहेबाकडून तुम्हास आकार समजून एकलास जाहला, त्याशीं बोलण्यांत सरकारतर्फेनी आणावें कीं, हरदो सरकारची दोस्ती आहे याची मजबुती अधिक व्हावी आणि वऱ्हाड व कटक या दोन्ही मुलखांतून एक मुलूख मिळेल असे करावे." याविषयींचा उद्योग त्याचे हातें चालला होता.

तशांत इकडे मालजी अहिरराव सिवणी नजीक मजंदरवाडें येथें छावणी चार महिने करून बादबरसात हिवाळ्याचे सुमारास नर्मदा किनाऱ्यास अहिरराव मजकूर फौजेसुद्धां गेल्यावर तिकडेस त्याचा काल झाला. नबाब सिदक अल्लीखानसाहेबाकडील आणि जगन्नाथराम शिदेवाले हे उभयतां सरदार फौजेसहित दौलतपुरावरून कूच करून भोपाळास जाऊन मोर्चे बसविले आणि एक दोन हल्ले करून पक्का पुल टांकेचा ( ? ) घेतला ते वेळेस नबाब मशारनिल्हे यांनी जाहामर्दी[१] चांगली केली. नंतर कांही एक दिवसांनीं जगन्नाथ यांचा काल जाहला. तेव्हां फौज शिंदेशाईवाले बहदारसिंग व रामलाल आणि गंगाजीराम व कृष्णा भांड व जोतिबा माने वगैरे सरदार आपसांत कलह करून लढून जाऊं लागले.

तशांत वजीर महंमदखान भोपाळवाले यांनीं नबाब महंमद सिदक अल्लीखान यांशी संदर्प केला की, "तुम्हीं कूच करून जावे, तुमचा या प्रांताचा हिस्सा तुम्हांस मिळेल." असें सखाराम महिपत व शंकराजी दिवाकर यांचे विद्यमाने बोलणें जहालें. तेव्हां नबाब यांनीं विचार केला कीं, "छावणीचे दिवस समीप आले त्याचेंही बोलणें असें पडत आहे," याजवरून कूच करून हुशंगाबादेवर येऊन, रेवा दक्षिण तीराहून नागपुरास सेनासाहेबांकडेस दसऱ्याचे संधींत आले.

तों इकडे सेनासाहेबांनीं आपासाहेबांस सेनाधुरंधरचे पदाचीं वस्त्रें आणावयाकरितां पुण्यास जाण्याची तयारी केली. पुढें परसोजी भोंसले

१. शौर्य, पराक्रम.

बाबासाहेब यांची प्रकृति मांदी होती याकरितां गहणें झालें. माहे सन १२२३ चे सालीं गुजाबा दादा गुजर याशी जरीपटका देऊन त्याचे वागणुकींत शाहणा हुषार पाहून सेनासाहेबांनीं रंगो रघुनाथ रिसाल्यासुद्धां व्यंकटरावजी याजकडेस नेमून दिले. व बक्षिगिरी त्याजकडील गणपतराव माधव तिखे याजला नेमिलें. व चंदाजी भोंसले याजला जरीलगी देऊन नरसिंगराव हयबत यांस त्याचा कारभारी नेमिला. असे दोन सरदार उभे केले. कारण गणपतराव सुभेदार रुसून गेले होते व मालजी अहिरराव पूर्वी मृत्यु पावले. सबब उभयतांकडील फौजेस कोणी मालक नाही यास्तव केला व आणखी पुष्कळ लोक यांचे ताब्यांत केले.

शिंदे याजकडील सरदार यशवंतराव शिवाजी यांनी फोजेचा जमाव करून माळवे प्रांताहून भोपाळ सुमारें आले. सबब चंदाजी भोंसले याची रवानगी केली. जाऊन बैतुलानजीक हामलापुरास छावणी करून राहिले. श्रीधर लक्ष्मण सिहस्थाचे स्नानाकरितां श्रीगोदेवरून गेले. सेनासाहेबांनीं विचार केला की, "पेंढारी शिंदे यांचे म्हणून भोपाळवाल्याच्या आश्रयांत राहून सन १२१४ चे सालापासून आपले प्रांतास व पंतप्रधानाचे मुलखास आणखी जागजागी उपसर्ग देतात त्यास यांचा बंदोबस्त करितों असें शिंदे वारंवार म्हणतात परंतु कांहीच होत नाही; व भोपाळ प्रकरणी तह करून दिला असतां शिंदे यांनीं नादीं लावून लाखों रुपये खर्च जाहले. परंतु, अमलांत येत नाही. त्यास येविषयीं इंग्रज बहादुर दोस्तीचे मार्गें बोलतात की, पेंढारी यांचे पारिपत्य खातरखां करून बंदोबस्त करितों, भोपाळची मसलत सिद्धीस नेऊन अमलांत आणून देऊं. असे दोस्तीचा पास ठेवून आहेत व मीरखान पुनः इकडे येण्याची तयारी करून आहेत. अशा अडचणी आहेत. त्या इंग्रजसाहेब दोस्त याजपासोन दूर होतील. सबब शिंदे याशीं परिनिविष्ट बोलण्याकरितां शहाणा मनुष्य योजून पाठवावा." सारे प्रकार बोलण्यांत आणण्याकरितां शिवराम महिपत याची रवानगी शिंदे यांजकडेस सन १२२४ सालीं केली. हे तेथें जाऊन शिद्यांशीं उद्‌घाटण केलें. याजवरून शिंदे यांनीं नेम केला कीं, "पेंढारी यांचा उपद्रव आजपर्यंत जाहला खराच, कारण आतां प्रांतास उपसर्ग न लागूं देतां, हे पेंढारी यांची निवड करून, जितके पेंढारी आहेत त्यांजला दर वारास चार आणे प्रमाणें पोटास देऊन,

नोकरीस ठेवून घेतों, व मीरखानाचे बंदोबस्ताकरितां, होळकराचे वकिलास सांगितलें व माधवराव तात्या आळेकर यांजला होळकराचे येथे पाठवितो; तोंपर्यंत मीरखानानी हालचाल केल्यास कर्नल जानबत्तीस याजलाच नेमितों, म्हणजे बंदोबस्त होण्यास कटीण पडत नाही. याचे सामलातीस समागमें राहण्याकरितां तुम्ही आपलेकडील पांच हजार फौज पाठवावी, म्हणजे आता भोपाळ घेतलेंच आहे, तेव्हां आपलाले हिस्सेरसीप्रमाणें ठाणें वसवावें." असे प्रकारे पेंढारी व मीरखान व भोपाळवाले हे तिन्ही प्रकरणें नेमांत आणून, शिंदे यांनी आपला जिमा करून सांगितले की, "कर्नल जानबत्तीस माळवे प्रांती जातात, तुम्हांकडील फौज यांपाशी यावी." असा निश्चय ठरून शिवराम महिपत यास बहुमान वस्त्रें देऊन रवाना केले. ते येऊन नागपुरास पोचले.

त्याचे अगोदर सन १२२३ चे साली खुशाल कुवर व नामदारखां, पेंढारी होळकरशाईपैकी करीम कैदेंत पेशजी होता, त्यानी सुटून येऊन होळकराकडील इषारावर सिदू व रांजण* यांजला लुटून जमाव हलका केला. पेंढारी मजकुरांचा आपसांत कलह होऊं लागला. हे वर्तमान शिंदे महाराजांस समजलें व येशवंतराव शिवाजी नामें सरदार यांशीं अनुसंधान सिदूनीं व रांजण यांनी लावून त्याचे बगलेत शिरून पुन: आपली जमीयत केली, व माळवे प्रांतीं राहून लूट लुबाड करून खावें, असे एक वर्ष झालें. शिवराम महिपत नागपुरास आले. त्यानी शिंदे बहादुरांकडील मजकूर अवग्र सेनासाहेबांस निवेदन केला. त्यानंतर सेनासाहेबांनी नबाब सिदक अल्लीखान यांची रवानगी केली व चंदाजी भोसले बैतुलानजीक होते, त्याजला लिहिलें कीं, "नबाबाचे तैनातीस राहून ते सांगतील तसें ऐकावें." असें होऊन नबाब व चंदाजी भोंसले तवा नदीचे मुक्कामीं गेले. तेथून कूच करून, नर्मदा उतरून जावें.

**भोपाळचा नबाब इंग्रजांचे आश्रयास जातो**:—तशांत वजीर महंमदखान यांचा सांप्रदाय साहेब लोकांपाशीं हमेषा फिर्याद करीत असावी कीं, "सेनासाहेबांचे फौजेचा उपद्रव लागतो, याचा बंदोबस्त व्हावा." याजवरून लाटसाहेब बहादुर याजपाशी वजीर महंमदखान यांची दरखास्त कबूल होऊन, मिस्तर जंकिन साहेब बहादूर यांनीं सेनासाहेबांस सवाल केला कीं,

* राजमहमद यास रंजन, राजन असेंही म्हणत.

"नबाब वजीर महंमदखान भोपाळवाले यांचे खर्चाविषयीं दरखास्तीप्रमाणें लाटसाहेब बहादुरांचे हुजुरांत या दिवसांत अर्ज कबूल पडोन खानमजकूर सरकार कंपनीचे बासालविचे शिलशिल्यांत दाखल जहाला आहे, त्यास राजेसाहेबांनीं महाराज दौलतराव शिदे बहादूर यांचे शराकतीनें आपली फौज तैनात केली आहे. मुलूख भोपाळचा आपले कबजांत आणावा. परंतु मुनासब आहे जे आपले सरदारांस या इराद्यापासोन मना करावें हा अर्थ लाट साहेब बहादुराचे हुकमाप्रमाणें श्रीमंत महाराजांचे खिजमतीस अर्ज करितों." याजवरून त्याचा जबाब देण्याचा करार सेनासाहेबांनीं एका महिन्याचा केला. आपलेकडील फौजेचें सरदारास लिहून पाठवावें आणि फौज भोपाळ प्रांतीं जाण्याची मनाई करविली.

इतक्यांत येशवंतराव शिवाजी व कर्नल जान्बत्तीस यांजकडील हरदूल्ला साहेब माळवा प्राती येऊन या दोघांचा बेबनाव जाहला. नंतर आपसांत लढाई होऊन येशवंतराव शिवाजी पळाले. ते हुशंगाबादेजवळ रेवा उत्तर तीरास येऊन पोहोचले आणि हुशंगाबाद प्रगण्यांत उपद्रव करूं लागले. तेव्हां सेनासाहेबांनीं हा मजकूर जंकीनसाहेब बहादूर यास समजाविला. याजवरून साहेब बहादूर बोलले की, "असे मनुष्याचे पारपत्याकरितां फौजा उतरून जाण्यास चिंता नाही, जाऊं द्यावें." याजवरून सेनासाहेबांनीं आपलेकडील सरदारांस लिहून पाठवावें कीं, "फौजा उतरून जाऊं देणें." याजवरून नबाब सिदक अल्लीखान व चंदाजी भोंसले यांणीं गंगेश्वरी मुक्कामी नर्मदा आलीकडे राहून मिरनदिल्ला साहेबासमागमें चार हजार फौजांचा जमाव होऊन उत्तर तीरास रवाना केलें. असें देऊन एका महिन्यानंतर मिस्तर जंकीनसाहेब बहादूर याचे सवालाचा जबाब सेनासाहेब सुभा यांनीं दिला कीं, "भोपाळ नजीक याची मालकी पंतप्रधान यांणी तिकडील मालकी शिंदे बहादुरास दिली आहे. त्यांची व होळकराची शराकत हिंदुस्थानांत आहे, तेव्हां हें बोलणें त्या सरदाराकडेस आहे. आमचा लाजीमदार तीन पिढ्यां-पासून, परंतु केलेले करार शिंदे बहादुरांचे शराकतींत आहेत. याजकरितां आपण तिकडेस बोलावें. ते जसें करतील तसें करावें. नऊ दहा वर्षे आमची फौज त्याचे फौजेची सामलातीस राहून लाख रुपये खर्चाची नुकसानी होऊन क्रोडो रुपयांचे खिसाऱ्यांत आलों आहों. त्यास इकडील नुकसानी होईल

तीं त्यांस समजून देतां येईल. जेथवर नुकसानी साधून जाईल तेथवर साधून घेऊं. जर नच साधल्यास दोस्तदार याजला आपली पास खातर आहे, तेव्हां नुकसान द्यावयाचें नाहीं, आपले आपणास समजून आहे. पहिलेपासून खर्च आहे तो बहालच आहे आणि जमा कमी."

**शिंदे व भोंसल्यांनीं भोपाळचा नाद सोडला**:—तेव्हां हा विचार पोटांत आणिला आणि सवाल केला की, "कोणी एखादा खांसा लाटसाहेब बाहादुरचे हामरांईत ठेवावा आणि ही रियाशत पेचांत आली आहे, न जाणों बहुत कठिण पडेल तेव्हां असें करून रियाशतीची सरव्हा नीट व्हावी, हा लवाजमा रीयासती निभावा. दुसरा प्रकार आणखी कोणता एक नाहीं व आजचे काळीं ही गोष्ट करण्याची बक्षिमी साहेब लोकांस हालातालीनी दिली आहे. असें असता ते सवाल या मोकदम्यांत करतात. तेव्हां लाच्यार. कंपनी सरकारचा कौलकरार पहिलाच आहे की, दोस्ताचे लाजीमदार त्यास बोलणें हरवक्त व्हावयाचे नाहीं. व तो बोलू लागल्यास त्याचा पास व उपराळा बिलकुल घडावयाचा नाहीं. असेही आहे."

याप्रमाणे जबाब दिल्याचे आगाऊ मिस्तर नंदीक साहेब उत्तर तीरास कर्नल जान्‌बत्तीस याजकडेस माळवे प्राती गेले. त्यांनी जाऊन भेटी झाल्या. रतन्यापर्यंत जाऊन तेथून माघारे फिरून ते उज्जनीस कांहीं एक दिवस राहून पुढें अखेर साली छावणीचे दिवस आले, तेव्हां कर्नल जान्‌बत्तीस याचा निरोप घेऊन नंदीक साहेब फौजेसुद्धां आपले मुलखास आले.

अखेर साली छावणी नबाब सिदक अल्लीखान यांचे फौजेची दक्षिण तीरास झाली. व आपण जातीनें नागपुरास आले. चंदाजी भोंसले यांचे फौजेसहित छावणी शहापूर नजीक सावलीगड येथे होऊन सन १२२५ चे साली भाद्रपदमासी होळकराकडील रोशनबेग व तुकोजी कंक होते. माळवे प्रांताहून नर्मदा उतरून सेनासाहेबांचे मुलखांत येऊन उपद्रव केला. याजवरून सेनासाहेबांनी चदाजी भोंसले यांजला लिहून पाठविले की, "आपले प्रांतांत उपसर्ग लाग् देऊं नये." याजवरून चंदाजी भोंसले कूच करून गेले व रोशनबेग व तुकोजी कंक चालून आले. हरदो फौजेशी गांठ पडोन भालूगांवचे मैदानांत लढाई होऊन रोशनबेग वगैरे शिकस्त झाले. ते निघोन गेले.

**रघूजीचा मृत्यु,** इ. स. २२-३-१८१६:---इकडेस दसऱ्याचे दिवशी रात्रीस सेनासाहेब सुभा रघोजी भोंसले यांचे प्रकृतीस एकाएकीं झाक मानगीची आली. ते चार घटकांपर्यंत मूर्छित राहून सावध झाले. तेथून त्यांचे शरीरास दिवसेंदिवस मानगीची पैरवी होत चालली. तितक्यांत सेनासाहेबांस हत्तीचे लढाईचा व शिकारीचा शोक पेशजीपेक्षां बहुतच उत्पन्न झाला. कांही एक दिवसांनी लखनौवाले नबाब नामें * * * * व त्रिंबकराव खुर्देकर आले. त्याजला आणावयाकरितां सेनासाहेबांची स्वारी मंगळवारीं पेठेचे गंजापर्यंत इस्तकबिलाकरितां जावून त्याजला घेऊन आले. त्याचा बंदोबस्त करून देऊन ठेवून घेतलें. पुढें फाल्गुन शुद्धपक्षीं द्वितीया* आपासाहेबांची मातोश्री मैनाबाई साहेब यांचा काल झाला. त्यांच्या आशौच्यांत सेनासाहेबांच्या शरीरास मानगी जास्त होऊन फाल्गुन व० ९ रोज शुक्रवार सन १२२५ चे साली सेनासाहेब रघोजी भोंसले यांस देवआज्ञा होऊन कैलासवासी झाले. ते समयी पुढें दौलत प्रकरणी कोणी कसें वागावे याची यादही ठरली. नंतर काल झाला.

---

# भाग ६ वा

# परसोजी भोंसले

पुढें मुधोजी भोंसले ऊर्फ आपासाहेब यांचा व सेनासाहेबाचा लेकवळा धर्माजी भोंसले यांचा आपसांत कलह उभा राहिला. कारण धर्माजी भोंसले मातोश्री बांकाबाईसाहेब यांचे चित्तांत. मालक परसोजी भोसले ऊर्फ बाबा-साहेब (बाळासाहेब) सेनासाहेब यांचे चिरंजीव. शरीर प्रकृतीचे योगानें भ्रमिष्ट होतें, तेव्हां दौलतीचा बंदोबस्त करून मातोश्री साहेबाचे आज्ञेनें कारभार चालवावा. या सल्ल्यांत नारायण यशवंत होते. तेव्हां आपासाहेबांचे चित्तांतील वर्म काय असतील तीं असोत, परंतु बोलतांना बाह्यात्कारी हेच बोलले होते की, "मालक बाबासाहेब आहेत परतु कारभार आम्ही करावा."

---

* तृतीया असें लेखांक ३६ पृष्ठ ७९ यांत आहे.

याप्रमाणें वरपंगी बोलून अंतस्थांत कलमज्या री करून नवीन फौज ठेवली आणि सेनासाहेबांकडील मुत्सद्दी नारायण यशवंत व यशवंत रामचंद्र व गुज्याबा दादा गुजर व नबाब महमद सिदक अल्लीखां व नारायण गोपाळ पंडतजी आणखी कित्येक लहानमोटे व परसोजी भोंसले बाबासाहेब यांजकडील प्रेमांतील माणसें, रावजी सखाराम व मनु भालदार व महबुला इत्यादि, यांजला गंगाजल तुलसी इमान प्रमाण देऊन बोलण्यांत आणिले. "कारभार मजकडेस द्यावा. मी असतां धर्माजी भोसले यांणी कारभार करावा हें चागलें नाही. मी एकनिष्ठेनी बाबासाहेबांची सेवा चाकरी करीन, यांत अंतर पडणार नाही." याविषयी अनेक प्रकारच्या शपथा वाहून आपल्या आपल्यांत सर्वत्रांस मिळविलें आणि धर्माजी भोंसले याजला दगा करून कैद केलें. ते समयी नारायण यशवंत पळाले, त्याची खातरतसली करून शपथ देऊन आणिलें. नतर मातोश्री बांकाबाई साहेब यांची सफाई करून मालक बाबासाहेब व आपासाहेबांनी कारभार करावा, असा नेम करून लिहिलें. परसोजी भोसले बाबासाहेब यांचे नांवें करुन दिले. नतर बाबासाहेब गादीवर बसविले. चैत्रमासी नजरा झाल्या. आपासाहेब कारभारी झाले.

**आप्पासाहेबाचा इंग्रजांशीं तैनाती तह** ता. २८–५–१८१६:—तसे दिवसांत इंग्रज बहादुर याजकडेस संधान करून पलटणें चाकरीस ठेवलीं. व त्याजला नर्मदे ऐलपार राहून पेंढाऱ्यांचा बंदोबस्त ठेवण्यास सांगितलें. दौलतीचा कारभार कुल आपासाहेब करूं लागले. नंतर जुनी माणसें, कैलासवासी रघोजी भोंसले सेनासाहेब यांचे वेळचीं व परसोजी भोंसले यांजकडील, असे सर्वत्रांवर इतराजी करून, कोणास कैद करावें, कोणास दोष ठेऊन मारावें, असे उपद्रव होऊं लागले. तशांत मातोश्री बांकाबाईसाहेब यांजला नवे हवेलींत कैद ठेऊन बंदोबस्त पक्का ठेविला, आपण तेलंगखेडीस जाऊन राहिला. आणि गुज्याबा दादा गुजर याजवर रोष केला. त्याजवरून ते आपले घरीं वाडा बळकावून आरब लोक चाकर ठेवून घेतले. नारायण यशवंत याजला तेलंगखेडीस नेऊन कैद केलें. व त्याचे घरावर मोठा बलवा करून गर्दी केली. व सखाराम महिपत याजवर इतराजी करून कैद केलें. व विटोबा आपा याजलाही बहुत इतराजी करून निकटचे पाहरे

बसविले. व रामचंद्र दलाल याजवर इतराजी करून कांहीं एक दिवस त्याजवर पहारे ठेवून त्याजपासून कांहीं द्रव्य घेऊन जबलपूरचा सुभा त्याजकडे सांगितला. व नाना गुजर याची स्त्री बनूबाई इचे येथें पाहरे कैददाखल ठेविले. व रावजी सखाराम हे आबासाहेबांकडील चिटणवीस त्याजवर इतराजी करून घरी बसविलें. असेच बहुतेक मुत्सद्दी वगैरे यांजवर उपसर्ग झाला. व यशवंतराव रामचंद्र याजवर प्रथम सफाई दाखवून पंधरा दिवस वहिवाटीस इंग्रज बाहादूर याजकडील बोलण्यांत येऊन, मागाहून खबगी* त्याजवर करून तसेच त्याला ठेविले, व मनु भालदार याजला मारहाण करून चंद्रपुरास बेहुरमत करून ठेविले. असा उपद्रव बहुत सुरू झाला.

**परसोजीचा मृत्यु** ता. १–२–१८१७:—ते वेळेस आपासाहेबांजवळ कारभारी दिवाण मुखत्यार नागो त्रिंबक व मुसाहेब रामचंद्र वाघ त्याचे मुतालिक नारायण सखाराम व मनभट व नारायण नागरे यांचे हातें कारभार होऊं लागला. व सेनासाहेबांकडील फौजेचें काम नबाब सिदक अल्लीखान याजकडेस होते. तशांत आपासाहेब सरंजाम पाहावयाकरितां चंद्रपुरास गेले. पाठीमागें परसोजी भोंसले ऊर्फ बाबासाहेब याजपाशीं मनभट त्याचे प्रेमांतील माणसे साधक अरबांचा जमादार व मनु भालदार व जानुबनसोड असे बंदोबस्ताकरितां हुषारी ठेवावी म्हणून ठेविले. त्यांतून अपाय होऊन सन १२२६ चे साली माघमासी शु.।। १५ स बाबासाहेब मृत्यु पावले; हे ऐकून मिस्तर जंकीन साहेब बाहादूर यांणी कसे झालें ते पाहावयाकरितां गुडो लक्ष्मण याजला पाठविलें. ते सरकारी हवेलीत येऊन पाहून गेले. नंतर मातोश्री बाईसाहेब व बाबासाहेबांची स्त्री काशीबाई व दुर्गाबाई यांसि शोक होऊन काशीबाई सती गेली.

हे अवघ्र तपसील इंग्रज बहादूर यांणी ऐकून मनांत विकृति मानली. नंतर गुजाबादादा गुजर याजवर सक्ती झाली. सबब ते आपले हवेलींतून निघोन नागोपंत याचे घराजवळ येसाजी रामचंद्र गुजर मशार निल्हेचे कदीम दिवाण, यांचें घर अडचणीत होतें सबब तेथें कांही दिवस ऋमून मशारनिल्हेनीं इंग्रज बाहादूराकडेस संधान लाविलें. तेथील आश्रय करून नागपूरचे, शहरांतून बाहेर रात्रौ निघून सिताबर्डीस गेले. जंकीन साहेब बहादुरानें

* रोष, ( खफा )

त्यांची खातर तसली करून प्रयागास त्यांजला रवाना केलें. इंग्रज बाहादुराकडील पलटनें चाकर ठेवून नर्मदेच्या ऐलीकडेस राहण्याकरितां पेशजी बिदा केले होते. ते कर्नल वाकर साहेब यांणी कोठाऱ्यास मुक्काम करून राहिले. त्याचे तैनातीस नंदीकसाहेब व सदाशिव गोविंद व शिवराम महिपत व मुकुंदरावजी बालकर असे सरदार नेमिले. हे तिकडेस आपलाले जमावानिशीं त्याजपाशी असतां पेंढारी यांणी ऐलपार येऊन उपद्रव केला. याजवर कर्नल वाकर साहेब बाहादूर यांणी दौड करून पेंढारी यांजकडील घोडीं पाडाव करून माणसें बारगीर धरून आणिलीं व त्या प्रांतांत बंदोबस्त चांगला ठेविला. नंतर कर्नल वाकर साहेब यांची बदली होऊन जनरल आदमसाहेब बहादूर त्याच साली हुशंगाबादेवर आले.

नंतर आपासाहेब यांजला वस्त्रें सेनासाहेब सुभा यांचीं मिळाली. याजकरितां त्यांणीच पुण्यास बाजीराव पंतप्रधान यांजकडेस नागोपंत याचे विद्यमानें खंडो गोविंद याजला पाठविलें. दौलतीचा बेत, जमा किती व खर्च किती काय पाहिला. तो झडती ज्यास्त दिसू लागली. हें पाहून बहुतेक कारखाने याचे खर्च तोडले. व सेनासाहेबांपैकी फौज व रिसाल्यापैकी शिपाई लोक बडतर्फ, नबाब सिदक अल्लीखान याचे हातें करविले. कारभारी नागोपंत होते. हे राजगतीमुळें आपले घरीं राहिले. ते तसेच गल्रूल होते.

तशांत कारभारी रामचंद्र वाघ व नारो सखाराम व नबाब सिदक अल्लीखान आदिकरून असता सन १२८७ चे साली नबाब सिदक अल्लीखान याजविषयी आप्पासाहेबांचे पोटांत दुष्मानी येण्याचे कारण की, इंग्रज बहादूर यांनी कोठीकरितां जागा हुशंगाबाद येथें मागितली. याजवरून खान मजकुरास सल्ला आपासाहेबी विचारिली की, "कसें करावें?" याजवरून त्यांनीं उत्तर केले की, "दोस्ती हरदो तर्फेची आहे, तेव्हां देण्यास पेंच नाही." ही सल्ला दिली म्हणून मनभट व रामचंद्र वाघ व नारो सखाराम यांनी मनांत भरविले की, "हुशंगाबाद किल्ल्याची जागा नबाबाचे इषाऱ्यावर साहेब बहादूर मागतात यांची व त्यांची ऐक्यता आहे." असे आपासाहेबांस भासवून नबाबावर इतराजी करविली. बादबरसात त्यांजला कैद टेवून त्यांचा अजबाब त्यांचे घरांतून आणून लुटून घेतला. व दक्षिण तीरचा सुभा होता तो काहाडून बगाजी भातवणे यांजला बदोबस्तास पाठविलें. ते समयीं

दिवाणगिरी व फौजेचें काम रामचद्र वाघ करूं लागले. त्यांचे नायब नारो सखाराम व मामलत वगैरे मनभट त्यांचे मुतालिक नारायण काशी कालीकर नेमिले.

तशांत इंग्रज बहादूर यांजकडून बोलणें पडले की, "आम्हाकडील मालकम साहेब बाहादूर रेवा तीरास जातात, त्यांचे समागमें ५ हजार फौज तैनात द्यावी." याजवरून फौज देण्याचा सिद्धांत केला.

तशांत बाजीराव रघुनाथ पंतप्रधान यांजकडून खंडो गोविंद संधान घेऊन आले की, "त्रिबकजी डेंगळे यांणी जमाव केला आहे व तुम्ही आम्हास अनुकूळ असावे व सिंदे होळकर ही अनुकूळ आहेत. इंग्रज बहादुरांवर मसलत करावी लागती." याप्रमाणें खंडो गोविद यांचे विद्यमानें समजलें. याजवरून आपासाहेब यांनी रामचंद्र वाघ व मनभट व नारो सखाराम व नारायण नांगरे यांसि मसलत केली व इंग्रज बहादुरांवर तयारी करावी व बाजीराव याजला अनकूळ व्हावे, असा बेत करून फौज पाठविण्याचा निश्चय केला. व कलमज्यारी केली. आणि इंग्रज बहादुरांकडे बोलणें सांगून पाठविले की, "जुने फौजेची बरतर्फी पेशजी केली असतां कार्याकारण जमाव आहे. त्यास पांच हजार फौज नवी ठेवून साहेब बहादुरांबरोबर देतो." असें म्हणून परवानगी घेतली. व फौज ठेवणें सुरू केलें. व रंगो रघुनाथ, नरहरराव दत्ताजी हे दोघे सरदार नमूद केले. फौज ठेवणें सुरुवात झाली. परंतु या कार्यास द्रव्यांश पाहिजे, तेव्हां नागोपंत पेशजी कामातून रहित केले होते त्यांनी आपासाहेबांशी शंकरभट भावे ( भदे ) यांचे विद्यमाने बोलण्यांत आणिलें की, "खर्चाची अडचण सरकारांत आहे, त्यास आज्ञा झाल्यास घरपटी करून द्रव्य पाहिजे तितके उत्पन्न करून देतों." याजवरून नागोपंतावर सरफराजी होऊन कारभारांत घातले. घरपटी सुरू झाली. या कामी नागोपंतानी माहादाजी मखलगी व नारायण नांगरे असे उभयतां वसूल करण्याकरिता नेमिले. घरपटी कृत्यामळें बहुत हाहाकार होऊन अवग्र प्रजा श्राप देऊं लागली. फौजेचा जमाव आंबाझरीचे तळावर करविला होता. कलमज्यारी करून मालकमसाहेब बहादुरांस नवी फौज तयार करून दाखविली. पुढें मालकमसाहेब बाहादूर कूच करून हुशंगाबादेचे मार्गानें गेले. मागाहून मराठी फौज जाण्याकरितां रंगो रघुनाथ व नरहरराव दत्ताजी

यांस रंगारीचे तळ्यावर मुक्काम करविला. इतक्यांत पुण्याहून सेनासाहेबांचीं वस्त्रें घेऊन, खंडो गोविंद इंग्रज बहादुरावर मसलत करावी हा सिद्धांत ठरवून आले. ती वस्त्रें देण्याचा सिद्धांत महूर्त पाहून दिवस नेमिला व मिस्तर जंकीन साहेब बहादुरास इतल्ला केला कीं, "सेनासाहेबांचीं वस्त्रें घेतों. प्रसंगीं तुम्हीं यावे." तेव्हां त्याजकडील जबाब आला की, "आम्हांकडील साहेब लोकांची व बाजीराव पंतप्रधान याचे वांकडें आहे लढाई जाहली. त्यास वस्त्रें घेण्यास चार दिवस सबुरी करावी;" हें आपासाहेबांनी न ऐकून बातमी पुण्याकडील लढाई झाल्याची आली. तेव्हां आपासाहेब यांनीं हा लढाईचा बेत करून फौजा आंबाझरीवर होत्या त्यांस सकरदऱ्याचे मैदानात आणून तीन जमाव निरनिराळे करून तिघांचे जिमेस केले. एक जमाव गणपतराव सुभेदार, दुसरा जमाव अमृतराव पांडुरंग व तिसरा जमाव रामचंद्र वाघ या नक्षानी फौजेचा मुक्काम करविला. आणि वस्त्रे सेनासाहेबांचीं मुहूर्तानी घेऊन आपासाहेब फौजेंत डेरेदाखल झाले.

---

## भाग ७ वा

# मुधोजी भोंसले ऊर्फ आप्पासाहेब

आपासाहेबांकडील तयारी फौजेच्या लढाईचा डौल पाहून मिस्तर जंकीन साहेब बहादुर यांनीं आपले ठिकाणी विचार केला की, "आम्ही वकील लोक लढाई आम्हांशी करणार नाही; तथापि हुषारी शर्थ आहे" म्हणून तेही आपले जागे हुषारीत राहिले. हें समजून आपासाहेबांकडील मनभट व रामचंद्र वाघ व सुभेदार निबाळकर अव्वलपासून या समलतीचे बाणीकर, व नारो सखाराम यांनीं बसून विचार करून इंग्रज बहादूर तयारीत आहेत, तेव्हां आपण हुषारीची चांगली बळकटी ठेवून जलदी करावी, म्हणून सिता बर्डीचे व नागपूरचे दरम्यान नाकेबंदीवर अरब लोकांचे पहारे ठेविले. व मसलती होऊं लागल्या.

असें होतच आहे; मध्यंतरी साहेब बहादुराकडेस नारायण गोपाळ पंडतजी व नारायण नागरे बोलावयास आले. व मनभट यांचे जिम्मेस अरबांचा रिसाला केला होता. तेव्हां यांनी अरब लोकांस इषारा केल्यावरून कार्तिक वद्य ४ स सायंकाळी गोळा चालला. पंडतजी सिताबर्डीवरच आहेत, तशांत नारायण नागरे निघून आले.

**सीताबर्डीची लढाई,** ता. २७–११–१८१७:—रामचंद्र वाघ व नारो सखाराम व मनभट यांनी फौजा तयार करून रात्रभर सिताबर्डीचे आसपास राहून प्रातःकाळी लढाई सुरू जाहली. आपासाहेब लढाईचे वेळेस फौजेंत सकरदऱ्यावर होते. आणि सिताबर्डीचे आसपास रामचंद्र वाघ जमियत सुद्धां व नारायण सखाराम व मनभट व गणपतराव सुभेदार असे असतां लढाईचे प्रसंगी, इंग्रज बहादुराकडील सोदबी साहेब बहादूर कामास आले. मिस्तर जंकीन साहेब बहादूर याजवळ जमीयत जुजबी असतां, आपासाहेबांकडील फौजेचे सरदारांनीं तोफेच्या गोळ्याचा मारा साहेब बहादुरावर सुरू केला व वारवार हल्ले करावे. अरबाकडील मनभट यांचा हल्ला व स्वारांपैकी रामचंद्र वाघाचा हल्ला व माधवराव खळतकर, सुभेदार निबाळकरासहित हल्ला जाहला. परंतु साहेब बहादुर बिलकुल जुजबी फौज असतां जातीची खबरदारी मोठी व ज्याहामर्दी विशेष आणि हिमतीचे मजबूत. सबब आल्लातालाचे मदतीनें चोंहोकडून हल्ले आले ते मारून चालविले; फौजा माघाऱ्या फिरल्या. तेव्हां इंग्रज बहादुराकडून सहा जणांनीं येऊन शुक्रवार वाड्याचे आघाडीस तोफेचे कानांत खिळे मारले, व आँपासाहेबांकडील फौजेची शिकस्ती झाली. त्या वेळेस रामचंद्र वाघ जागजाग बसून मसलत करूं लागले कीं, हल्ला करतों. परंतु कारागीर होत नाहीं. साहेब बहादूर जुजबी असतां यांची सरसी होऊन आपलेकडील फौजेची सिकस्ती झाली. अशी मसलत रामचंद्र वाघ करीत असतां, इकडे आपासाहेबांनीं नबाब महंमद सिदक अल्लीखान याजला कैदेंतून आणून, रामचंद्र वाघ खपा होऊन बसले होते हें पाहून, नबाबानीं त्याजला निषेध केलें कीं, "लढाई साहेब बहादुराशीं करणेस सल्ला नव्हती. हें काय केलें? असो. झालें तें समर्थ. आतां तरी समेट करावी." असें होऊन वाघ मजकुरास घेऊन आपासाहेबांकडेस नबाब आले. आणि आपासाहेबांस

व रामचंद्र वाघ यांस नबाब बोलले की, " लढाई करणें कांहीं चांगलें नाहीं, अपाय होईल, सल्ला करणें उत्तम आहे. " असे झालें तों सिताबर्डीहून साहेब बहादुरांनी पंडितजीस रवाना केलें. ते येऊन आपासाहेबांशीं खलबत होऊन, सहा घटका दिवस राहतांना कवाइतीचे पहारे होते ते उठवून घेतले व समेटीच्या बोलण्यांत नारायण पंडितजी बोलत होते. परंतु मर्जीन्यामुळें श्रीमंत मातोश्री बांकाबाईसाहेब समागमें समस्त जनानखाना व जामदारखाना व सिल्लेखाना आदी करून अजवाब सहित भानाऱ्यास रवाना केले. बरोबर फौजेसुद्धां सुभेदार निंबाळकर व चांदाजी भोंसले व नारायण नांगरे दोन हजार फौजेनिशी गेले. व काही कांही अजवाब चंद्रपुरास पाठविला. तसे दिवसांत आपासाहेबाजवळ वागणुकीत माणसें होती, त्यांनी बुद्धीस भ्रंश केला व साहेब लोकांशी समेट होऊ देईनात सबब ती माणसें कैद करावी असें ठरल्या-वरून जाहीरदारीस नारो सखारामास कैद केले. व बोलणें पुढें होतच आहे, तों दपटीण* साहेब बहादूर पलटणीसुद्धां सिताबर्डीस येऊन पोहोंचले. त्या सल्ल्याचे बोलण्यांत इंग्रज बहादूर यांणी बोलण्यांत आणिलें की, " तुमचे फौजेचे सरदार तुमचे हुकमांत नाहीत व कामदार मन मानेल त्या वर्तणुकी करितात. त्यास सल्ला करणें असल्यास तोफखाना आमच्या स्वाधीन करून द्यावा व नागपूर शहरची नाकेबंदी चार दिवस आमचे स्वाधीन करावी म्हणजे आम्हास सफाई दिसेल. हे करावें. मर्जी नसल्यास आपले फौजेंत जावें आणि लढाईस सिद्ध व्हावें. याचा जबाब उदयीक प्रहर दिवसाचे पोटांत मिळाला पाहिजे."

**आप्पासाहेब इंग्रजांचे स्वाधीन होतो**, ता. १७-१२-१८१७:— हें बोलणें साहेब बहादुरांकडून नारायण पडतजी घेऊन आले. याजवरून रात्रौ तमाम फौजेचे सरदार यांजला वाघ मजकुरांनी बोलावून लढाईचा सल्ला केला. दुसरे दिवशीं प्रातःकाळी पुनः मसलत पंडितजी यांजला बोलावून केली व त्यांजला साहेब बहादुरांकडे पाठविलें. ते सिताबर्डीस जाऊन बोलल्याप्रमाणें तेथील मजकूर साहेब बहादुराशीं बोलून आपण तेथें राहिले. विनायकराव तेथून आले आणि आपासाहेबांशीं बोलण्यांत आणिलें कीं," साहेब बहादुरांच्या पोटांत तुमचे जातीविषयीं मैल बिलकूल नाहीं. " येविषयींची शफथ पुरस्सर खातरतसली करून आपासाहेबांस जंकीन साहेबां-

* Doveton.

कडे घेऊन गेले. मग आपासाहेबांकडील फौज सक्करदऱ्याचे मैदानांत जागा बजागा तयार होती. तशांत साहेब बहादुरांकडील फौज दपटीन साहेब बहादूर तयार होऊन सिद्ध होते. आपासाहेब साहेब बहादुरांजवळ पोहोंचतांच त्यांनीं सवाल पहिला केला होता तोच केला कीं, "सफाईच्या पोटांत सल्ला करणें असल्यास तोफखाना आमचे स्वाधीन करावा, नाहीं तर हरदो सरकारचे फौजेची तयारी आहेच. फौजबंद तुमचे कह्यांत नाहींत, काय करतील न कळे." यावरून आपासाहेब तेथेंच राहून तोफखाना दपटीन साहेब बहादुराकडील जमावाचे स्वाधीन करण्याकरितां सांगितले. व परवानगी दिली. ते घेण्याकरितां जमियत येत होती. हे पाहून गणपतराव सुभेदार यांजकडील व अमृतराव पांडुरंग यांजकडील जमावाच्या तोफा सुरू झाल्या. साहेब लोकांकडील जमीयत चालून येऊन यांजकडील जमीयत उधळून दिली. व त्या तळ्यावर तोफखाना वगैरे सरंजाम आटोपून मुक्काम केला.

**शहर इंग्रजांचे स्वाधीन,** ता. ३०–१२–१८१७:—हे आरबांनीं पाहून दुसरे दिवसापासून शहरचा बंदोबस्त केला. व नागपूरचे किल्ल्याची लढाई सुरू झाली. दररोज गोळागोळी होऊन हल्ले करूं लागले. तेव्हां आरब लोकांनी इंग्रज बहादुरचे हल्ले फिरवून लढू लागले. त्या वेळेस बडे साहेब बहादूर यानी आरबासी बोलणें केले कीं, "राजेसाहेब आम्हांपासी असतां तुम्ही लढतां याचें कारण काय ?" तेव्हां आरब लोकांचें बोलणें पडलें कीं, "आम्ही आपल्या ताब्याकरितां लढतो." यावरून साहेब बहादूर यांनी नबाब सिदक अल्लीखान याचे विद्यमानें आरबाचे ताब्यांत फैसल्ला करून देऊन, ठाणें नागपूरचे किल्ल्यावर दाखल करून बावटा चढविला. नंतर मिस्तर जेंकीन साहेब बहादूर यांची दोस्ती पहिलेपासून चालत आली होती. त्या दोस्तीवर लक्ष देऊन बांकाबाई साहेब यांस आणावयास गुंडो लक्ष्मण व बाजीराव एव्हारे भानाऱ्यास पाठवून बोलावून आणिली व आपासाहेब यांचे खातरतसली करून सल्लेचा तह केला. सदहूं तह होऊन नागपूर शहरांत जातीनें साहेब बहादूर येऊन आपासाहेबांस गादीवर बसविलें. आणि आपल्या मकानास गेले. पुढें आपासाहेब शहरांत असतां बाजीराव पंतप्रधान व गणपतराव सुभेदार* चंद्रपूरचे सुमारें आले.

---

* विठ्ठल बल्लाळ यांचा पुत्र. वंशज वऱ्हाडांत पातूर नंदापूर येथें आहेत.

**आप्पाहेबास कैद व त्याचें पलायनः**—त्या प्रसंगी सेनासाहेबाकडील प्रांतांत जागजागीं मंडळें वगैरे किल्ले बदलवून तिकडील कांहीं फंदफितूर आपासाहेबांनीं केला. असें साहेब बहादुराचे समजण्यांत आलें. याजवरून आपासाहेबास नागपुराहून सीताबर्डीवर नागोपंत व रामचंद्र वाघ यासहीत घेऊन गेले.* व प्रांतांतील बैदा उठावा व दाब बसावा याजकरितां आपासाहेब यांची रवानगी नागोपंत व रामचंद्र वाघ यासहित श्रीकाशीकडे केली. तों आपासाहेब जातीनें मार्गातून पळून† कांहीं दिवस ठिकाण लागला नाही. तेव्हां

**बाजीराव गुजर दत्तकः**—साहेब बहादुरांनीं मेना साहेबांचा दोस्तीचा प्रकार लक्षांत आणून आपासाहेब गेले, त्यांचा ठिकाण नाही. राज्यास अधिकारी असल्याशिवाय सेनासाहेबांचे दौलतीचा बंदोबस्त होऊं पावणार नाही. असें समजोन मातोश्री बांकाबाईसाहेब यांची खातरतसली करून परसोजी भोंसले ऊर्फ बाबासाहेब यांची स्त्री दुर्गाबाई यांचे ओटींत दत्तक घेऊन सेनासाहेबांचे दौलतीचा बंदोबस्त व्हावा असा सल्ला योजून कैलासवासी रघुजी भोंसले सेनासाहेब सुभा यांची कन्या सौभाग्यवती बदुबाई यांचे चिरंजीव बाजीबा नामें याजला दुर्गाबाईचे ओटींत देऊन दत्त विधान केलें आणि त्यांचें नांव रघोजी सेनासाहेब सुभा ठेविलें. व ऊर्फ बापूसाहेब म्हणूं लागले. याप्रमाणें करून जितकी लहान मोठी जुनीं माणसें सरदार मंडळी वगैरे पैकी आदिकरून राहिले होते तितक्यांच्या खातरतसल्या करून मिस्तर जंकीन साहेब बहादूर यांनीं बंदोबस्त करून दौलतीचा कारभार चालविला, व गुज्याराव गुजर याजला प्रयागाहून आणून सेनासाहेबांचे दौलतीचा बंदोबस्त सांगितला. आणि त्याच्या तैनातीस बच्याराव रघुनाथ आपले तर्फेनें नेमून तमाम कारखाना वगैरे मुत्सद्दी मंडळी आटोपून वहिवाट करून असावें म्हणून सांगितलें. सदर्हू मजकूर वडिला वडिली ऐकिण्यांत आला व पाहिला याजवरून विनंति लिहिली आहे.

**समाप्त**

---

* ता. १५–३–१८१८
† ता. १३–५–१८१८

# भाग ८ वा

# उपसंहार

## (संपादकीय)

[ बखरीतील मजकूर आपासाहेब याच्या पलायनापर्यंत व बाजीराव गुजर यास तिसरा रघूजी म्हणून गादीवर बसवीपर्यंत आला आहे. पुढील माहिती वाचकांस कळावी म्हणून संक्षेपानें खालीं दिली आहे. --संपादक ]

आपासाहेब ता. १३-५-१८१८ रोजीं पहाटेचे रात्रीं पाहरेकऱ्यांस फितवून व पाहरेकऱ्याचेच कपडे आंगावर घालन पळाला तो पंचमढीच्या डोंगरांत गेला. तेथील गोंडांनीं त्यास बरेच दिवस आश्रय दिला. नागपुराहून त्यास बरेच दिवस पैशाचा पुरवठा होत होता. शेवटीं इंग्रजी लष्कराच्या टोळ्यांनी त्याचा पाठलाग चालविला. अखेरीस आपासाहेब पळन अशीरगडच्या किल्ल्यांत व बऱ्हाणपुरांत लपून राहिला. इंग्रजांनीं अशीरगडचा किल्ला लढून घेतला. पण आंत आपासाहेब नव्हता. आपासाहेबास धरून देईल त्यास एक लाख रुपये बक्षीस देण्याबद्दल इंग्रजांनीं जाहीरनामे लावले व ती रक्कम पुढें दोन लक्षांपर्यंत वाढली. आपासाहेबानें बाजीरावाप्रमाणें मालकम साहेबांशीं बोलणें लावलें होतें व मालकम साहेबानें बाजीरावाप्रमाणेंच शर्ती कळवून आपणाकडे येण्याबद्दल त्यास कळविलें होतें पण आपासाहेब त्याच्या स्वाधीन झाला नाहीं.

बऱ्हाणपुराहून आपासाहेब उत्तर हिंदुस्थानांतील बहुतेक संस्थानिकांकडे गेला. पण कोणीही त्यास आश्रय दिला नाहीं. शेवटीं तो लाहोरास गेला. रणजितसिंगानें कांहीं दिवस त्यास आश्रय दिला. परंतु इंग्रजांस बातमी लागतांच त्यांनीं रणजितसिंगाचे मागें तगादा लावला. त्यामुळें, आप्पासाहेब तेथून निघन हिमालयांत मंडी, टेहरी, गढवाल या संस्थानांत कांहीं दिवस राहून शेवटीं जोधपुरास गेला. तेथें तो इ. स. १८२९ मध्यें सांपडला. परंतु जोधपुरच्या राजानें स्वतः त्याचेबद्दल हमी घेऊन त्यास

इंग्रजांचे स्वाधीन न करितां आपण ठेवून घेतलें व त्याचा परामर्ष घेतला. जोधपुरासच असतांना आपासाहेब ता. १५–७–१८४० रोजीं मरण पावला.

आपासाहेबाचे साथीदारापैकी मनभट यास इंग्रजांनी नागपुरास कैदेंत ठेविलें व तो कैदेंतच मरण पावला. त्याचे वंशज नागपुरांत आहेत. दुसरा साथीदार गणपतराव सुभेदार ( परांजपे ) हा सीताबर्डीच्या लढाई-नंतर पळाला तो बाजीरावास घेऊन चंद्रपुराकडे आला. पण बाजीरावाचा मोड झाल्यानंतर त्यास इंग्रजांनीं पकडन नगरचे किल्ल्यांत कैदेंत ठेविलें. त्याचे वंशज वऱ्हाडांत पातूर नंदापूर येथें राहतात. रामचंद्र वाघ व नागोपंत यांस आपासाहेबाबरोबरच पकडून प्रयागाकडे पाठविलें होतें. आपासाहेब पळन गेला परंतु वरील दोघांना प्रयागास पोंहोचविण्यांत आलें. कांहीं दिवसांनीं त्यांना सोडन दिलें असें दिसतें. वाघाचे वंशज नागपुराचे आसपास आहेत. नागोपंताबद्दल माहिती मिळत नाहीं.

आपासाहेबाची बायको उमाबाई ही लौकरच जून १८१८ मध्यें मरण पावली. दुसरी बायको सावित्रीबाई ही बरेच दिवसपर्यंत जिवंत होती. नागपुरचें राज्य खालसा झाल्यावर तिलाही पेन्शन मिळत गेलें.

तिसरा रघजी यास गादीवर बसविल्यानंतर तो अल्पवयी असल्यामुळ सर्व कारभार इंग्रज रेसिडेंटानें नेमिलेल्या अधिकाऱ्यामार्फत चालला. इ. स. १८२६ मध्यें रघूजी वयांत आल्यामुळें एक नवीन तहनामा करून राज्यकारभार राजाच्या हातीं देण्यांत आला. वरील तहांत इ. स. १८२९ मध्यें कांहीं फेर-फार करण्यांत आला. जेन्किन्स हा १८२६ मध्यें विलायतेस गेला व त्याचे-नंतर दुसरे रेसिडेंट आले ते राज्य खालसा होईपर्यंत बदलत गेले. राजा-कडन राज्यकारभार रेसिडेंटाच्या तंत्राप्रमाणें चालत असे.

तिसरा रघजी निपुत्रिक असतांना ता. ११–१२–१८५३ रोजीं मरण पावला. त्या वेळीं त्याचें वय ४७ वर्षांचें होतें. राजा निपुत्रिक मरण पावल्यास काय व्यवस्था करावयाची याबद्दल गव्हर्नर जनरलाकडून रेसिडेंटास पूर्वीच हुकम आला होता. त्याप्रमाणें रेसिडेंटानें खजिना व राजवाडा ताब्यांत घेतला व राजास औरस अगर दत्तक पुत्र नसल्यामुळें वारस कोणी नाहीं या सबबीवर सर्व राज्य खालसा केलें. बांकाबाई व इतर राण्या यांनी राज्य खालसा होऊं नये म्हणन पुष्कळ खटपट केली व तिसरे रघूजीचे

एका राणीस जानोजी अहीरराव यास दत्तक देऊन त्यास राज्य मिळावें म्हणून मागणी केली. परंतु त्या वेळीं डलहौसीची कारकीर्द असल्यामुळें गव्हर्नर जनरल व कंपनीचे डायरेक्टर यांची प्रवृत्ति सर्व हिंदुस्थानी संस्थानें खालसा करण्याकडे होती. म्हणून वरील प्रयत्नास यश आलें नाहीं.

इ. स. १८५७ सालीं बांकाबाईनें इंग्रजांस मदत केली. त्यामुळें जानोजी यास दत्तक म्हणून कबूल करून "देऊरचे राजे" असा वंशपरंपरेचा किताब दिला व राजाची खाजगी इस्टेट व कांहीं पेन्शन देण्यांत आलें तें अद्याप चालू आहे.

---

# नागपूरकर भोंसल्यांची वंशावळ



- बिंबाजी
  - मुधोजी
    - १ वापूजी = बयाबाई
      - बिंबाजी = काशीबाई
        - प० रघूजी से. सु. ३
      - संताजी
        - ०
      - राणोजी (ऊर्फ सवाई संताजी) उमरावतीकर भोंसल्यांचा मूळपुरुष
    - २ परसोजी से. सु. १
      - कान्होजी
        - रायाजी
    - ३ साबाजी = रामाऊ
      - ०
  - रूपाजी
    - ०

( वंशावळ पुढें चालू )

प. रघूजी से. सु. ३ = सकवाबाई, सुलाबाई वगैरे १३ बायका.
ऊर्फ बाबासाहेब (मृ. ता. १४।२।१७५५ इ.)

जानोजी से.सु. ४
मृ.२१।५।१७७२
=दर्याबाई
दु० रघोजी ऊ.बापूसा.(दत्तक)
से.सु. ५ मृ. २३।३।१८१६
=
गोजराबाई, पार्वतीबाई,
अंबिकाबाई, बांकाबाई

मुधोजी (आप्पासा०)
सेनाधुरंधर मृ. १९।५।१७८८
=
चिमाबाई कमलजाबाई

साबाजी (नानासा०)
मृ. १७७५
=
सगुणाबाई
०

बिंबाजी (आबासा.०)
=मृ. ७।१२।१७८७
उमाबाई (सती)
आनंदीबाई
मृ. ७।१२।१७८७
०

(मुधोजी व चिमाबाई यांची संतति:)

रघूजी (जा.स दत्तक) दुसरा रघूजी पहा
खंडोजी (चिमणाबापू) मृ.१६।८।१७८९
व्यंकोजी (मन्याबापू) मृ.२०।७।१८११
बाळाबाई मोहिते
ठकूबाई गुजर
झिंगराबाई मोहिते

(दु० रघोजीची संतति:)

परसोजी ऊर्फ बाळासा०
=
काशीबाई
अहिल्याबाई
दुर्गाबाई
रघूजी तिसरा से.सु.८(द.)

बनूताई
=
व्यंकटराव गुजर
बाजीबा ( दत्तक दिला )
तिसरा रघूजी

साळूबाई

गंगाबाई

(व्यंकोजीचा पुत्र:)

मुधोजी (आप्पासा.) से. सु. ७मृ. १५।७।१८४०
=
उमाबाई, सावित्रीबाई

( वंशावळ पुढें चालू )

ति० रघूजी से. सु. ८
(दुर्गाबाईस दत्तक) = बायका ८
(मृ. ११-१२-१८५३ इ.) यानंतर राज्य खालसा

जानोजी राजेबहादुर, मृ. १८८१
(त्रिबकजी ऊ. नाना अहीरराव याचा मुलगा यशवंतराव
ति. रघूजीचे बायकोस दत्तक.)
= अंजिराबाई, काशीबाई वगैरे

मा. अंजिराबाई — मा. काशीबाई

मा. अंजिराबाई:
रघूजीराव ( राजेबहादर ) विद्यमान
- कु. फत्तेसिंगराव
- कु. जयसिंगराव

(सर्व विद्यमान)

मा. काशीबाई:
- राजे लक्ष्मणराव मृ. १९३२
  - कु. प्रतापसिंग
  - राजाराम
  - विजयसिंह
  - तेजसिंह

  ( सर्व विद्यमान )
- भागीरथीबाई मोहिते
- पार्वतीबाई मोहिते
- बनूबाई शिरके

# कठीण शब्दांचा कोश

### अ

अखबार—बातमीपत्रें.
अग्रहार—देवस्थानाकरितां उत्पन्न.
अजबाब—चीजवस्त.
अंदेशा—विचार.
अनबनाव—बेबनांव, बिघाड.
अलाहिदा—वेगळा, अलग.
अलीशान—सर्वश्रेष्ठ.
अवग्र—अवघा.
अवीट—फार, न विटणारा.

### आ

आंत्र—अंतस्थ हेतु.

### इ

इतल्ला—खबर.
इतबारी—विश्वासू.
इंतिकाल—मृत्यु.
इनायतनामा—शिफारसपत्र.
इरसाल—वार्षिक आढावा, हिशेब.
इस्तबाल-इस्तकबील—सामोरें जाणें.
इहसान (येहसान)—उपकार.

### उ

उजूर—अमान्यता.
उपराळा—मदत.
उरता—अपेक्षा, जरूरी.
उस्तवारी—दुरुस्ती.

### ए

एकलास—स्नेह.
एकांडा—कोणत्याही सरदाराच्या हाताखालीं नसून स्वतंत्रपणें लढणारा शिपाई.

### ओ

ओल, ओलीस—लढाईचा करार पाळण्याकरितां शत्रूच्या ताब्यांत दिलेला मनुष्य.

### क

कजाई, कजागी—लढाई.
कर्जादी—पराक्रम.
कदीम—पुरातन.
कबजा—१ रकमेची पावती, रसीद. २ अधिकार, अंमल.
कबन—कबूल, मान्य.
कबीला—बायकामुलें.
कमरगा—मध्यभाग ( लढाईचे वेळच्या सैन्यरचनेचे वेळचा )
कमरवाही—लढाई, हल्ला.
कलगी—पागोटयावर खोंवण्याचा रत्नखचित तुरा.
कलमज्यारी—लेख देणें, पत्रें पाठविणें.
कही (कहीकबाड)-सैन्याकरितां धान्य वगैरे जमविणारी टोळी, सामान.
काबील—हुषार.
काबू—ताबा, अंमल.
कामास येणें—लढाईत पडणें.
कायल—फजीत, निरुत्तर.
कारगीर—लागू, परिणामकारक.
किस्सा—भांडण.

कील–खिड.
कुदरत, खुदरत–सामर्थ्य.
कुल–सर्व.
कुन्हें–संशय, किल्मिष.
कैद–१ शिस्त. २ अटक.
कैददाखल–कैदेप्रमाणें.
कोतवाल (घोडा)–रिकामा (स्वाराशिवाय.)
कोरबंदी–सैन्याची रांग.
कोशीस–प्रयत्न, खटपट.
कृत्रिम–कपट.

## ख

खबगी (खफा)–रोष, अवकृपा.
खवास, खवासखाना–हत्तीच्या अंबारीतील मागची जागा (मुख्याचे बाजूस).
खलष–भांडण.
खलेल–विघ्न, अडथळा.
खातरखा–इच्छेप्रमाणे.
खातरजमा–खात्री, समाधान.
खातरतसल्ली–समजूत, समाधान.
खाली–रिकामा.
खास-दस्तुर–खाशाचे हातचें (पत्र.)
खासर–गाडी ( नाग. )
खिलत–बहुमानाची वस्त्रें.
खिसारा–नुकसान.
खिस्सा–भांडण.
खुदरत, कुदरत–सामर्थ्य.
खुरनिस, कुर्निसात–नमन, सलाम.
खुषमत–गोड (लिहिणार).
खेतांत राहिला–रणक्षेत्रावर पडला.
खैरख्वाहा–हितचिंतक
खोजलाग–पत्ता, थांग.

## ग

गंगा–गोदावरी.
गजबाग–हत्तीस टोंचण्याचा अंकुश.
गरुरी, मगरुरी–उर्मटपणा.
गल्ल–म्लान.
गायेल, गावेल–गाविलगड (किल्ला)
गारद होणें–बुडणें.
गालिब, गालिफ–छाप, वरचष्मा, फार.
गाहा करणें–जमविणें.
गुल–बातमी, गप्पा.
गोल–जमाव.

## च

चांदणी–कापडाचा मंडप (तंबूवजा).
चालधारणा–वागणूक.
चौकी–पाहरा.

## ज

जंग–लढाई.
जंगी–लढाऊ.
जंबूरा–लहान तोफ.
जंबूस–तोफखाना.
जमात, जमीयत–जमाव, सैन्य.
जरब–मोठी, फार.
जवांमर्दी, जहांमर्दी–पराक्रम.
जानपर्वर्जी-पर्वर्शी–जीवाचे पोषणास, जातीचे खर्चास ( दिलेलें उत्पन्न ).
जाबसाल–(जबाब, सवाल), करार
जाहीरदारीस–दाखविण्यापुरतें.
जिनसी–दारूगोळा आणणारी टोळी.
जुजबी–थोडें, कामापुरतें.
जें–कीं, (अव्यय ).
जेर करणें–बेजार करणें.
जोरतलबी–जबरदस्ती.

### झ

झाडून–सर्व, एकूण एक.

### ट–ण

डाली–पगडी ( राजाची ).
डेरेदाखल–डेऱ्यांत जाऊन राहणें (सैन्याचे कुचाचे वेळीं).
डौल–रंग, सुमार, तऱ्हा.

### त

तक्तनशीन–सिंहासनारूढ.
तगीरी–कामावरून काढणें, बडतर्फी, बदली.
तनावे–तंबूच्या दोऱ्या.
तलब–पगार.
तलावा–शत्रूच्या सैन्याची टेहळणी.
तरतबेत–तरबेज.
तर्फ–एक देशविभाग, तालुक्याप्रमाणें.
तसनस–खराबी, नासधूस.
तहसील–सरकारी वसूल.
ताजियत–बालंबाल, पूर्ण.
ताराज–पराभूत.
तेगा–मोठी तलवार.
तैनात–चाकरी.
तोतया–नकली पुरुष.
तौर–प्रकार.
त्यास–तरी ( अव्यय. )

### द

दफे (दफन)–समाप्त.
दांडालोंडा–संबंध, शेजार.
दाया (दावा)–हक्क, मागणी.
दिकत–अडचण.
दूरंदेशी–दूरदर्शीपणा.
दुशाख–दिवटी.
देग, देगची–मोठें भांडें.
देह–मौजा, खेडेगांव.

### ध

धडा, धाडा–टोळी, जमाव.
धाडी पोसाणी बोलणें–तोंडापुरतें बोलणें. (धातुपोषण करणें)

### न

नक्कल होणें–निर्वंश होणें.
नकुच–क्षुल्लक.
नमूद होणें–तयार होणें.
नरमीना–रेशमी कापड.
नवासा–नातू (मुलीचा मुलगा).
नशियत–शिक्षा.
नहर–नळ (पाण्याचे).
नालकी–पालखीपेक्षां उच्च दर्जाचें तसेंच एक वाहन.
निखालसता–निर्मळपणा, दिलसफाई.
नेमस्त–कायम.

### प

पतक, पथक–सैन्याची टोळी.
पाडाव–लढाईतील कैदी.
पासखातर–पक्ष, आस्था.
पुस्त–पिढी.
पेच–अडचण, लढा.
पेशजी–पूर्वी.
पैगाम–संधान, बोलणें, करार.

### फ

फडणीस–राज्याचे पैशांचा हिशेब ठेवणारा अधिकारी.
फत्तेनशीन–विजयी.
फासला, मुफासला–अंतर.

### ब

बजिन्नस–प्रत्यक्ष, वास्तविक.
बतरीख–न–प्रमाणें.

बदमामली–अपकीर्ति, बेमानी.
बदी–वाईटपणा.
बबर्ची–स्वयंपाकी.
बमै-मय–सहित.
बमोजिव–प्रमाणें.
बयदा, बैदा–बखेडा, बिघाड.
बयाण-न–हकीकत.
बलकंबल, बलकुवल–जोर, संकट.
बलवा–गर्दी.
बहाली–(अधिकारावर) नेमणूक करणें, कायम करणें.
बहीरबुनगे, बहिरा, बुलंगे, बुनगे–सैन्याबरोबरचे गैरलढाऊ लोक. (फा. बहिरबुल्गा) त्यांचा तळ.
बक्षी–सैन्याची मोजदाद व हिशेब ठेवणारा अधिकारी.
बाणीकर–पक्षपाती, चुरस धरणारे.
बाद, बाजद–नंतर.
बालाघाट–घाटमाथा.
बालेकिल्ला–सर्वांत उंच किल्ला. (वरचा). आंतील तटबंदी.
बाहदारी–बारदारी.
बाहदारींत–हाताखालीं बरोबर.
बितपशील–पुढें लिहिलेल्या वर्णना-प्रमाणें.
बिदा, बिदन–रवाना.
बेकैदी–१ शिस्त नसलेले, २ अधि-कार-भ्रष्ट.
बेचरी–तटाचा भाग.
बेरुख–विरुद्ध.
बेहुरमत–बेअब्रू.
बेहोष–धुंदीत, गाफील.

**भ**

भावगर्भ–मनांतील बेत.
भुलावा, भोलावा–भुलविणें, ठकवणें.

**म**

मजलस–सभा, दरबार.
मजीना–कलह.
मशारनिल्हे–उपरिर्निर्दिष्ट.
मरामति–दुरुस्ती.
मवसूफ–उपरिर्निर्दिष्ट मजकूर.
महकूफ, मवकूब–थांबविणें, बंद.
महाल–परगण्याएवढा प्रदेश.
मातबर–मोठा.
मानगी–आजार, दुखणें.
मुकरर–कायम.
मुकाबला–सामना, भेट.
मुजरा, मजुरा–हिशेबांत वजा देणें.
मुतालिक–हाताखालचा, नायब.
मुफसद, मुबसफ–बंडखोर.
मुलाजमत–भेट.
मुसाहेब–जोडीदार, सोबती.
मुस्तैद–तयार.
मै–मय–सहित.
मोकासा–इनाम अगर माफी जमीन.
मोहसब, मोहसुफ–हिशोब, आढावा.
मोहसल–वसूली करणारा अधिकारी.

**य**

येहतियाद–काळजी, फिकिर, बंदो-बस्त.

**र**

रसद–खर्ची, रकम.
रफ्त–चाल, राबता, वहिवाट.
राई (रुह–रहा)–रीत.

रांगडा, रांगडी—उत्तर हिंदुस्थानांतील, हिंदुस्थानी.
राशतगार—(रियासतकार) संस्थानिक, राजेरजवाडे.
रसाभास—गोडी.
रियासत—राज्य, दौलत.
रिसाला—स्वाराचें पथक.
रुकसत—रवानगी.
रुबरू—समक्ष.

### ल

लगामी—स्वाधीन, ऐकण्यांत.
लगी—निशाण.
(जरीलगी—जरीपटका).
लवाजमा—खर्चाची रकम.
लाजीमदार—अंकित.
लुकसान—हलकी, रद्दी.
लेकवळा—दासीपुत्र.

### व

वरात—रकमेची हुंडी, पैसे देण्याबद्दल हुकम.
वस्ता—दागिने.
वाकब,वाकिफ—वाकबगार,माहितगार
वारता—मरणारा, मृत. •
विभ—व्यूह (अपभ्रंश).
विक्षेप—राग, अढी.
वैराण—उजाड.

### श

शकटभेद—फितूर.
शरफ (सिर्फ)—फक्त.
शराकत—वाटणी, हिस्सा.
शहरपन्हा—शहराची तटबंदी.
शागीर्द—उमेदवारी करणारा, (कारकून).
शामलात, सामलात—दोस्ती होणें, सामील होणें, एकत्र.
शिकस्त—पराभत.
शिरस्ता—वहिवाट.
शिवबंदी, शिबंदी—मुलखाच्या अंतर्गत रक्षणाकरितां ठेवलेलें लष्कर.
शुक्का—पत्र, खबर.

### स

संदर्प-र्भ—बोलचाल.
सर्फराजी—कृपा.
संमत—एक प्रांतविभाग, तालुक्याप्रमाणें.
समला, शेमला—पागोट्याचें टोंक, मागें मोकळें सोडतात तें.
सबूरी—थांबणें.
सरंजाम—सैन्याच्या खर्चाकरितां दिलेलें उत्पन्न, सामग्री.
सला नाहीं—योग्य नाही.
सांग—टोंचण्याचें एक शस्त्र.
साथ, सात—बरोबर.
सार्थक करणें—विधिपूर्वक दहन करणें.
साहेब-नौबत—हत्तीवरील डंका, (ज्याला हा मान दिलेला असतो त्यानेंच ठेवण्याचा)
साळी—मेहुणी.
सिलसिला—क्रम, वहिवाट, संबंध.
सिलेखाना—शस्त्रागार.
सुदामत—पूर्वीप्रमाणें.
सैदोन—नगारा (विजयसूचक).
सौरस-स्य—गोडी.

### ह

हकीम, हाकम—अधिकारी.
हमराह—बरोबर, सोबत.

हरगीज–बिलकुल.
हरदो–उभय.
हरोळी, हरवळी–आघाडी, बिनी.
हागामा, हंगामा–धामधूम.
हालाताला (अल्लाताला)–परमेश्वर.
हावभरी–हावरा, आशाळभूत.
हुजुरात–खाशांची फौज.
होण निघून जाणें–घाबरणें, ठाव सोडण.
हौदा–हत्तीवरील आसन.

---

प्रथमावृत्तींतील वाचनाच्या व इतर चुका या
आवृत्तींत दुरुस्त केल्या आहेत त्यांची

## तुलनात्मक यादी +

| प्रथम आवृ. पृ. | अशुद्ध | शुद्ध | | | नवी आवृ. पृ. |
|---|---|---|---|---|---|
| ४ | लुखाजी | लुखजी | .... | .... | ६ |
| १० | भूतन | नूतन | .... | .... | १४ |
| १० | देई | देहे | .... | .... | १४ |
| ,, | कुलकाम | कुलकानू | .... | .... | १४ |
| ,, | कोलेहेर | कान्ही | .... | .... | १४ |
| ,, | दासूदाचे | जासूदाचे | .. | .... | १५ |
| १८ | नवसा | नवासा | .... | .... | २४ |
| २० | याजवरूनजाणें | याजवर न जाणें | | .... | २७ |
| २७ | बादमामली | बदमामली | .... | .... | ३६ |
| २८ | फासाक | फासला | .... | .... | ३७ |
| ,, | दूरदेशाकडून | दूरंदेशा करून | | .... | ३७ |
| २९ | इजायत नामे | इनायतनामे | | .... | ३८ |
| २९ | रमाबाई | रामाबाई | .... | .... | ३९ |
| ३२ | शोभनकृत् | शुभकृत् | .... | .... | ४२ |

+ ही दुरुस्ती एखाद्या हस्तलिखित प्रतीवरून केली नसून संदर्भावरून केली आहे. हस्तलिखित मूळ प्रत उपलब्ध नाहीं. (सं.)

| | | | |
|---|---|---|---|
| ३२ | ही तपशील | बितपशील .... | .... ४२ |
| ३५ | नांदेड वरखातीचें | नांदेड वसमतीचें | .... ४६ |
| ,, | तारान | ताराज .... | .... ४६ |
| ,, | बाबासाहेबास मोर | बाबासाहेब समोर | .... ४६ |
| ३९ | हजीपुर | हाजीपुर .... | .... ५१ |
| ,, | बर्गड | वैरागड .... | .... ५१ |
| ,, | नांदेडास वसती करून | नांदेड वसमतीकडून | .... ५१ |
| ,, | आठोळे | आटोळे .... | .... ५१ |
| ४१ | ताराण | ताराज .... | .... ५४ |
| ४२ | बोवासाहेबास | बाबासाहेबास | .... ५४ |
| ४३ | पंतप्रधान | पंत .... | .... ५५ |
| ४४ | बिरभाज | बिरभम .... | .... ५७ |
| ४६ | वेढासा | वोढसा .... | .... ५९ |
| ,, | काशीराम | काशीराव ... | .... ६१ |
| ५१ | गोवळचाचा | गावेल्याचा .... | .... ६५ |
| ५५ | जर बंगाली बजाली | जरब गालीब जाली | .... ७१ |
| ५६ | मु. साहेब | मसाहेब .... | .... ७३ |
| ५७ | कंडीचे | मंजचे .... | .... ७४ |
| ५९ | दगेंत | देगेंत .... | .... ७६ |
| ६० | सीरपुरची मुरश्री | सीरपुर चामोरसी | .... ७७ |
| ६० | व रूड | वरूड .... | .... ७७ |
| ६२ | शिपुर | शिरपुर .... | .... ७७ |
| ६३ | अजबनास | अनबनाव .... | .... ८० |
| ६५ | भगवानराव | भास्करराव .... | .... ८२ |
| ६५ | कैद ब त री खन | कैद-बतरीखन | .... ८३ |
| ६६ | येऊन | टेऊन .... | .... ८४ |
| ७० | फट | फाट .... | .... ८८ |
| ७७ | राजे | रोखे .... | .... ९७ |
| ,, | दाभाजी | दामाजी .... | .... ९७ |
| ७८ | भाऊ दणाभारी | भाऊपणा भारी | .... ९८ |
| ८० | रामजी | रामाजी .... | .... ९९ |
| ८१ | रामजीपंत | रामाजीपंत .... | .... १०१ |
| ८७ | दंगा | दगा .... | .... १०८ |
| १०३ | बमोजी व | बमोजिब .... | .... १२८ |

| | | | |
|---|---|---|---|
| १११ | आणि कही | आणिकहि .... .... | १३७ |
| ,, | पानलावणे | पानतावणे | १४० |
| १२२ | शिवाजी छपारे | शिवणी छपारे .... | १५० |
| १४० | कोळयाचे | काळयांचे .... .... | १७१ |
| १४६ | हखलीसी | हरवलीसी .... .... | १७९ |
| १५१ | कोलटलर | कोठेकर .... .... | १८४ |
| १५१ | कैदेंत दाखलच | कैददाखलच .... .... | १८५ |
| १५२ | भावगर्जा | भावगर्भ .... .... | १८६ |
| १५५ | जालसा बाब | जाबसाल-सालजाब .... | १८९ |
| १५५ | शहाबानखान | शहाबाजखान .... | १९० |
| १६० | जानदे | जामोद .... .... | १९५ |
| १६१ | दूरदर्शीचे | दूरंदेशीचे .... .... | १९६ |
| ,, | तनसत | तसनस .... .... | १९७ |
| १६४ | जेलजीचे मुकामीं | नेलनीचे मुकामीं .... | २०० |
| १६८ | मासोद | आसोद .... .... | २०५ |
| १६९ | बडी | बाडी .... .... | २०६ |
| ,, | राजे | रोज .... .... | २०७ |
| १७१ | रा ज न | राजन .... .... | २०९ |
| ,, | बर्डी | बाडी .... .... | २०९ |
| १८१ | चैंजपुर बडी | चैनपुर बाडी.... .... | २२० |
| ,, | इंदूर-पर्यंत | इंदोऱ्यापर्यंत .... .... | २२० |
| ,, | खंडा गेले | खंडागळे .... .... | २२१ |
| १८२ | येहती याद | येहतीयाद .... .... | २२२ |
| १८४ | पिंपळी | पिदडी .... .... | २२२ |
| ,, | जागू | नागू .... .... | २२४ |

# सूचि

य

# मध्यप्रांत संशोधन मंडळ, नागपूर

## माहिती व विनंति

मध्यप्रांतांत चिकित्सक आणि विद्वान् संशोधक अनेक आहेत. पण संशोधनाचा संघटित प्रयत्न करण्याकरितां, एखाद्या स्थायी संस्थेची गरज भासत असूनही आजवर त्या कल्पनेस मूर्त स्वरूप प्राप्त झालें नव्हतें. पण कार्योत्सुक स्थानिक मंडळींनीं विचारविनिमय करून शके १८५५ च्या मकर संक्रांतीस (१४-१-३४) मध्यप्रांत संशोधन मंडळाची स्थापना केली. संस्थेचे उद्देश पुढीलप्रमाणें आहेतः--

१. वाङ्मय, इतिहास, विविधशास्त्रें, पुराणवस्तु, सामाजिक संस्था, शिल्प, स्थापत्य, संगीत इ. कला व इतर संशोधनार्ह विषय यांच्या संबंधांत संशोधन करणें.

२. (अ) जुनीं ऐतिहासिक कागदपत्रें, नाणी, वस्तु, हस्तलिखित ग्रंथ, चित्रें व इतर महत्त्वाच्या संग्राह्य व संरक्षणीय वस्तू यांचा संग्रह व संरक्षण करणें.

(आ) संशोधनाला सहाय्यभत होणारे संदर्भग्रंथ व इतर साधनें यांचा संग्रह करणें.

३. प्राचीन अप्रकाशित वा दुर्मिळ ग्रंथ, ऐतिहासिक साधनें व अभ्यासकांचे संशोधनात्मक वा संशोधनाला उपकारक असे प्रबंध यांचें संपादन व प्रकाशन करणें.

४. संशोधनाच्या आधुनिक शास्त्रशुद्ध पद्धतीचें शिक्षण देणें, व वरील पहिल्या कलमांत आलेल्या विषयांसंबंधीं चिकित्सक अभ्यास व संशोधन यांना उत्तेजन देणें.

५. सभा, व्याख्यानें, संमेलनें इ. च्या द्वारां वरील कार्याविषयीं जनतेंत अभिरुचि उत्पन्न करणें.

६. वरील उद्देश अमलांत आणण्याकरितां आवश्यक व शक्य असलेल्या सर्व उपायांची योजना करणें.

## सभासद

(१) सभासदांचे वर्ग पुढीलप्रमाणें राहतील:—

(अ) आश्रयदाते ( Patrons ) ५०० रु. किंवा अधिक देणारे
(आ) हितकर्ते (Benefactors) २५० रु. ,, ,, ,,
(इ) साहाय्यक (Sympathisers) १००रु. ,, ,, ,,
(ई) तहाहयात सभासद (Life-members) ५० रु. ,, ,, ,,
(उ) सभासद (Members) ३ रु. वार्षिक वर्गणी देणारे
(ऊ) सन्मान्य सभासद (Honorary members) विशेष योग्यते-साठीं नियामक मंडळाकडून निवडण्यांत आलेले.

(२) वरीलपैकीं पहिल्या तीन वर्गांतील सभासदांना मंडळाचें सर्व प्रकाशन फुकट मिळेल, व बाकीच्या वर्गांतील सभासदांना सवलतीनें देण्यांत येईल.

(३) वीस वर्षांवरील कोणाही व्यक्तीस मंडळाचा सभासद होतां येईल.

(४) प्रौढ विद्यार्थ्यांना दरसाल १ रुपया वर्गणी देऊन सभासद होतां येईल.

वरील उद्देशांवरून मंडळाचें विस्तृत कार्यक्षेत्र स्पष्ट होईल. अजून मंडळ बाल्यावस्थेंत आहे आणि म्हणूनच कार्याचा व्याप ज्यास्त वाढविणें अजून शक्य झालें नाहीं. मंडळास स्वत:ची जागा नाहीं, सिटी कॉलेजच्या अधिकाऱ्यांनीं मंडळाची कचेरी येथें ठेवूं दिली व वेळोवेळींच्या कार्यक्रमास जागेचीही मदत ते देतात म्हणून सर्व चाललें आहे. आजपर्यंत नानाप्रकारच्या विषयांवर अनेक अभ्यासकांकडून संशोधनपर निबंध मंडळापुढें वाचण्यांत येऊन त्यांवर चर्चा करण्यांत आली. हें मंडळाचें नित्य कार्य आहे व त्याचा वृत्तांत वर्तमानपत्रांच्या वाचकांस वेळोवेळीं ज्ञात झालाच असेल. गेल्या तीन वर्षांच्या अल्पावधींत मंडळानें प्राचीन नाणीं, नंदिवर्धन येथील अवशेष, प्राचीन हस्तलिखित ग्रंथ व कागदपत्रें यांचा बराच संग्रह केला आहे.

मंडळानें गेलीं कांहीं वर्षें काम केल्यानंतर मध्यप्रांतांत संशोधन कार्याचें क्षेत्र बरेंच विस्तृत आहे, ह्याबद्दल त्याची खात्री झाली आहे. विद्वान् सभासदांची मदत व सहानुभूति लाभल्यामुळें संशोधनाच्या महत्त्वाच्या प्रांतांत मंडळ यशस्वी व भरीव कार्य करून दाखवूं शकेल

याबद्दल शंका वाटण्याचें कारण नाहीं. परंतु संशोधनकार्य ही जशी अत्यंत जिकिरीची व दीर्घोद्योगाची बाब आहे तशीच ती द्रव्यसहाय्यावरही अतिशय अवलंबून आहे. निदान मध्यप्रांत संशोधन मंडळास वाण मनुष्यांची नाहीं, पैशाचीच केवळ आहे. तेव्हां ज्या मध्यप्रांतांतून द्रव्याची मदत होऊन इतर प्रांतांतील संस्था पोसल्या जातात व भरभराटतात त्यांत प्रस्तुत मंडळासारख्या उपयुक्त संस्थेला आवश्यक सहाय्य मिळणार नाहीं, अशी निराशा वाटण्याचें कारण नाहीं. उलट मंडळाची लोकप्रियता वाढत असून त्याचें कार्य लोकांच्या निदर्शनास दिवसेंदिवस अधिकाधिक येत आहे. यंदा मंडळाचे अध्यक्ष न्या. मू. नियोगी, व श्रीमंत बाबासाहेब घटाटे हे मंडळाचे अनुक्रमें आश्रयदाते व यावज्जीव सभासद झाले ही गोष्ट मंडळानें आजपर्यंत मिळविलेल्या यशाचें गमकच होय, असें म्हणावयास हरकत नाहीं. परंतु याच उदारधी सद्गृहस्थांप्रमाणें इतर अनेक लोकांनी पुढें येऊन शक्यतेनुसार मंडळाचे कोणत्याही वर्गाचे सभासद होऊन वा देणगी देऊन मंडळास द्रव्यसहाय्य करून उपकृत करावें अशी विनंति आहे. तसेंच ऐतिहासिक माहिती, ग्रंथ, वस्तु इत्यादींच्या मदतीची देखील अपेक्षा आहे.

मंडळाच्या कार्यकारी व नियामक मंडळांत फार वजनदार, प्रतिष्ठित, विद्वान् व उत्साही लोक आहेत. तेव्हां मिळालेल्या देणग्यांचा सर्वतोपरि सदुपयोगच होईल ह्याबद्दल खात्री बाळगावी.

मंडळास आतांपर्यंत नाणीं, पुस्तकें, इतर ऐतिहासिक वस्तू वगैरे देऊन सहाय्य केल्याबद्दल वि. भू. कृष्णशास्त्री घुले, श्री. नागोराव पोषट्टी, श्री. दा. के. ओक, प्रो. मिराशी, प्रो. बनहट्टी, श्री. लोचन प्रसाद पांडेय, खैरागड संस्थानचे अधिपति, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, श्री. य. खु. देशपांडे, प्रो. द. वा पोतदार, श्री. कृ. दा. वऱ्हाडपांडे, वगैरे सद्गृहस्थांचें मंडळ ऋणी आहे.

विशेष माहितीकरितां मंडळाचें विस्तृत घटनापत्रक मागवावें.

---

# मध्यप्रांत संशोधन मंडळ, नागपूर



## नियामक मंडळाचे सभासद

**अध्यक्षः**—(१) न्या. मू. श्री. भवानीशंकर नियोगी, एम्. ए., एल्‌एल्. एम्., हायकोर्ट जज्ज (आश्रयदाते).

**उपाध्यक्षः**—(१) विद्वद्रत्न के. ल. दप्तरी, (२) वि. भू. कृष्णशास्त्री घुले, (३) प्रो. नी. ब. भवाळकर.

**सभासदः**—प्रो. वा. वि. मिराशी, श्री. गो. अ. ओगले, श्री. दा. के. ओक, श्री. ह. ना. नेने, श्री. आ. रा. देशपांडे, प्रो. शं. दा. पेंडसे, प्रो. श्री. ना. बनहट्टी, श्री. गोपाळराव दळवी, श्री. श. वा. रानडे, श्री. दि. वा. वर्णेकर, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, श्री. पु. दि. ढवळे, श्री. वा. वा. फडणवीस, श्री. शं. वा. शास्त्री, श्री. त्र्यं. ना. वझलवार, प्रो. मा. अ. मोघे, श्रीमंत मा. गं. चिटणवीस, श्री. शं. गो. चट्टे, प्रो. पां. कृ. सावळापूरकर, प्रि. श्री. ल. पांढरीपांडे, श्री. ल. रा. कुळकर्णी, प्रो. दि. का. गर्दे, प्रो. चतुर्वेदी, प्रो. गो. व. बापट, श्री. द. रा. गोमकळे, श्री. गो. चि. तांबे.

## कार्यकारी मंडळ

**अध्यक्षः**—प्रो. वा. वि. मिराशी.

**कोषाध्यक्षः**—श्रीमंत मा. गं. चिटणवीस.

**सभासदः**—श्री. दा. के. ओक, प्रो. शं. दा. पेंडसे, प्रो. श्री. ना. बनहट्टी, (प्रो. मा. अ. मोघे यांचे ऐवजीं) श्री. आ. रा. देशपांडे.

**मुख्य कार्यवाहः**—प्रि. श्री. ल. पांढरीपांडे.

**सहकार्यवाहः**—प्रो. पां. कृ. सावळापूरकर, श्री. शं. गो. चट्टे.

## हिशेबतपासनीस

श्री. दे. गो. लांडगे.

## सल्लागार

श्री. द. वा. पोतदार, पुणें

श्री. य. खु. देशपांडे, यवतमाळ

## सन्मान्य सभासद

श्री. या. मा. काळे, बुलढाणा

## इतर सभासद

श्रीमंत बाबासाहेब घटाटे (तहाहयात), प्रो. स. बा. बेलेकर, रा. सा. द. कृ. मोहनी, प्रो. के. एम्. वैद्य, श्री. वा. गो. मंडपे, श्री. द. त्रि. धवसे, श्री. के. बा. पळसुले, श्री. वि. कृ. राजवाडे, श्री. रा. दा. जोग, श्री. र. दा. भगाडे, श्री. शं. अ. साठे, श्री. शं. ना. वीरकर, श्री. भा. द. कठाळे, श्री. कृ. वि. सरंजामे, श्री. डी. एन्. जोशी, श्री. ज. रा. देशमुख, श्री. दि. के. बोकील, श्री. म. गो. इनामदार, श्री. के. एन्. लोकस, श्री. मु. रा. पाठक, श्री. शंकरराव देशमुख (आर्वी), श्री. दत्तोपंत पाध्ये, श्री. का. के. मराठे, श्री. ह. कृ. तेलंग, श्री. भा. द. कठाळे, प्रो. व्ही. एन्. थत्ते.

---